मुद्रकः—लक्ष्मण भाऊराव कोकाटे,
हनुमान छापखाना, ३०० सदाशिव पेठ, पुणें शहर.



प्रकाशकः—श्रीनिवास नारायण बनहट्टी,
मयूरमंडळ कार्यालय; ६०२ सदाशिव पेठ, पुणें शहर.

पुस्तकें मिळण्याचें ठिकाणः—
रा. शंकर आत्माराम पराडकर, चिटणीस मयूरमंडळ,
६०२ सदाशिव पेठ, पुणें शहर.



वैकुंठवासी

मातुःश्री

# ती. सौ. लक्ष्मीबाई कनहट्टी

जिचें अंतःकरण सदैव भक्तिरसानें परिपूर्ण असे

व

जुन्या संतकवींच्या कवितेवर जिचें विशेष प्रेम असे

तिच्या प्रेरणेनें व प्रसादानें प्राप्त झालेलें
जुन्या कवींच्या अभ्यासाचें

**हें पहिलें फल**

**तिच्या स्मृतिपूजित चरणकमलांवर**
**अर्पण केलें आहे.**

**लेखक.**

# निवेदन.

**असे तादृक् चेतोहर गुण जरी साधु तरि या**
**वरू, चूडारत्नीकृत विधुहि जैसा धुतरिया ।**

प्रस्तुत पुस्ततकाचें मूळ, येथील मयूर मंडळानें नेमलेल्या 'मूळ श्रीमद्भागवत व पंतकृत मंत्रभागवत ( इतर भागवती प्रकरणांसह )' या विषयावर प्रस्तुत लेखकानें लिहिलेला निबंध होय. हा निबंध प्रथम १८४३ सालीं लिहिला गेला. त्याच्या पुढच्या वर्षी त्यावर बरेचसे संस्कार करून तो पुन: मयूर मंडळाकडे पाठविला गेला. मंडळानें नेमलेल्या परीक्षकांनीं तो छापावा अशी सूचना केली. त्यामुळें आणि पंतकवितेविषयींचे आपले विचार महाराष्ट्र वाचकांपुढें व्यवस्थित स्वरूपांत मांडावे अशी इच्छा लेखकाच्याही मनांत प्रादुर्भूत झाल्यामुळें, त्या निबंधावर पुन: एकदां संस्करण करून, तो प्रसिद्ध केला आहे. या पुन:संस्करणाच्या योगानें मूळ निबंधाच्या स्वरूपांत पुष्कळ पालट झाला व आकारांतही फार वाढ झाली. तथापि रसिक वाचकांच्या आश्रयाच्या भरंवशावर केलेले हें साहस विशेषशी कातडी सोलून न निवतां निभावून नेतां येईल अशी उमेद वाटत असल्यामुळेंच त्यानें स्वत: हें प्रसिद्धीकरणाचें साहस केलें आहे.

महाराष्ट्र कवींपैकीं मोरोपंतांवर आजपर्यंत जितका ऊहापोह झाला आहे तितका दुसऱ्या कोणत्याही कवीवर झाला नसेल. असें असतांना पुन: हें येवढें भारूड लिहून प्रसिद्ध करण्याचें प्रयोजन काय असा प्रश्न कित्येकांच्या मनांत उभा राहील. प्रस्तुत पुस्तकाचा बीजभूत जो भागवतावरील निबंध तो प्रथम लिहिण्यास कोणतें आनुषंगिक कारण झालें हें वर निवेदन केलेंच आहे. तथापि पंतकवितेच्या बाबतींत आपणास कांहीं नवीन सांगावयाचें आहे अशी जाणीव लेखकास नसती तर त्यानें या मजकुरांतलें अक्षरही प्रसिद्ध होऊं दिलें नसतें. प्रस्तुत पुस्तकांतील प्रतिपादन आजपर्यंत झालेल्या चर्चेहून निराळ्या तऱ्हेचें, नवीन प्रश्नांचा ऊहापोह करणारें व सर्वस्वी स्वतंत्र असेंच महाराष्ट्रकाव्यवाचकांस वाटेल अशी आशा आहे.

मयूरमंडळाचे अध्यक्ष श्री. न. चिं. केळकर यांनीं प्रस्तुत प्रयत्नाविषयीं कौतुक व्यक्त करून प्रस्तावनेदाखल चार शब्दही लिहून दिले, याबद्दल लेखक त्यांचा अत्यंत आभारी आहे. पंतवंशज श्री. रामकृष्णपंत पराडकर यांनीं अत्यंत आस्थेनें

पंतलिखित पोथ्यांचा संग्रह दाखविला व पंतांची अप्रसिद्ध भागवती काव्यें छापण्यास ( पहा, परिशिष्ट १ ) परवानगी दिली याबद्दल त्यांचाही ऋणभार लेखकाच्या शिरावर आहे. मूळ निबंधाचें विकसन होत असतां भ्रातृकल्प मान्य-मित्र आचार्य अ. बा. गजेंद्रगडकर यांच्या सूचनांचें व उपदेशाचें अमूल्य साहाय्य झालें. या जुन्या उपकारांची फेड करण्याचा मार्ग म्हणजे आणखी नवीन उप-कारांचे बोजे लादून घेणें होय व तसाच क्रम चालू ठेवण्यांत प्रस्तुत लेखकास तरी आनंद वाटेल हें उघड आहे. मयूरमंडळाचे उत्साही चिटणीस रा. शं. आ. घराडकर यांचेंही प्रस्तुत पुस्तकाच्या बाबतींत साहाय्य झालें याबद्दल त्यांचे आभार मानिले पाहिजेत. सरतेशेवटीं, अनेक अवस्थांतून प्रस्तुत कृतीला सध्यांचें स्वरूप प्राप्त होत असतांना जे सदैव तिला ' प्रेमें सिंचित होते ' अशा अनेक ' सख्यांचा ' त्यांच्या अंतःकरणासच समजेल असा मूक उल्लेख करून पुढें जाणें भाग आहे. यांपैकीं प्रियमित्र व्यंकटेश शामराव दलकुन्दी यानें तर जी मदत केली ती सर्वथा अपूर्वच होय. तिचें वर्णन करतां येण्यासारखें नाहीं व माझ्यानें तें करवणारही नाहीं. या सर्व सुहृत्समुदायाचा कृतज्ञताभार असाच शिरावर वाढत गेल्यास तो केवळ असह्य होईल अशी धाकधुक वाटत असतां-नाच त्यांच्या कृपाछत्राखालीं या कृतीची कंपित हृदयानें पाठवणी करितों.

हनुमज्जयंति ( मयूरपुण्यतिथि ) शके १८४८. } लेखक.

---

# अनुक्रमणिका.



---

* हे आंकडे पुस्तकांतील परिच्छेदांचे आहेत.

१. भागवती काव्यांची पद्यसंख्या. २. मंत्रभागवताचें बाह्यस्वरूप; तीन माळा. ३. स्कंधवार पद्यसंख्येचें कोष्टक. ४. कृष्णविजयाचें बाह्यस्वरूप. ५. भागवती स्फुट प्रकरणांचें परिगणन; बाह्यस्वरूपनिदर्शक कोष्टक. ६. पांगारकरांची याद अपूर्ण; नूतनसंशोधित दोन काव्यें. ७. पांगारकरांचें विस्मरण व गैरसमज. ८. भस्मासुराख्यानाबद्दलचा घोटाळा; पांगारकरांची फसगत. ९. त्यामुळें इतरांचीही फसगत. १०. भस्मासुरकथा आहे कोठें ? समालोचन. ११. उणें दारूविण्याचा हेतु नाहीं.

## विभाग ३. पंतांची भूमिका, उद्दिष्ट हेतु व काव्यरचनेचें धोरण. पृ० ३४ ते ६१.

१. प्रास्ताविक. २. पंतांची विस्तरभीरुता, आटोपशीरपणा. ३. इतर कवींचा पाल्हाळ; त्याचें कारण-भक्तीचा उमाळा. ४. उद्दिष्ट हेतूच्या भिन्नतेमुळें पडणारा फरक. ५. श्रीमद्भागवताची भूमिका व उद्दिष्ट हेतु. ६. भागवताची काव्यविषयक योग्यता. ७. मूळ भागवताच्या उद्दिष्ट हेतूंचें परिगणन. ८. पंतांची भूमिका व उद्दिष्ट हेतु—स्वोन्नत्यर्थ भगवद्यशोगान; ९.—काव्यनिर्मिति;—कथाकथन. १०. संकलन. ११. अनुपयुक्त भागांचा त्याग. १२. विस्तार न करण्याच्या कारणांची पांगारकृत मीमांसा फारशी बरोबर नाहीं. १३. पंतकाव्यनिरीक्षणाची योग्य दृष्टि. १४. कालिदासादिकांच्यासारखी काव्यरचना पंतांनीं कां केली नाहीं ? १५. कथानकें विकृत करण्याची प्रवृत्ति; मयूरमुक्तेश्वरादि कवि व अलीकडील नाटककार यांमधील भेद. १६. पंतांची व कालिदासादिकांची संस्कारभिन्नता. १७. तीन भिन्न संस्कारांचें मिश्रण. १८. मिश्रणामुळें आलेली न्यूनता. १९–२०. पंतांची विद्वत्ता; भिन्न मतांचा उपन्यास; पंतांनीं लिहिलेल्या ग्रंथांची वर्गवारी. २१. वेदान्ताचें ज्ञान. २२. मालाकारांच्या मतांतील सत्याचा अंश. २३. पंतांची ज्ञान लालसा.

## विभाग ४. पंतांच्या भागवतीकाव्यांचें स्कंधानुक्रमानें तुलनात्मक अंतरंगनिरीक्षण. ... ... पृ. ६२ ते १८७.

१. पुढील अंतरंगनिरीक्षणाचें धोरण. २. पंतांनीं श्रीधरी टीकेची घेतलेली मदत. [**स्कंध १**] ३. भागवताचा प्रारंभ, नारदाचें पूर्ववृत्त. ४. त्याचें पंतकृत रूपांतर; 'नारदाभ्युदय.' ५. अश्वत्थाम्याचा पराभव; कुंतीची कृष्णस्तुति. ६. त्यांचें पंतकृत रूपांतर. ७,८. भीष्मनिर्याणाचा प्रसंग; ' भीष्मभक्तिभाग्य ' ९. अ०

## उतरार्ध:–पंतकवितेचें सर्वसामान्य विवेचन. पृ. १९०ते३८८.

### विभाग ५. पंतकाव्यांचा कालनिर्णय–पृ. १९० ते २५४.

**विभाग ७. पंतकवितेतील दोषांचें विवेचन. पृ. २८१ ते ३१९.**

आढळतात. [ ३ ] ३९. उच्च वाङ्मयाचें जीवनाधारभूत तत्त्व. ४०. भाषांतरा-भाषांतरांत फरक. ४१. तन्मयता हाच उच्च वाङ्मयाचा व काव्याचा प्राण. ४२, ४३. तुकारामादि संतांच्या व मयूरमुक्तेश्वरादि कवींच्या वाङ्मयांत दिसून येणारी तन्मयता. ४४. काव्यांतील कथावस्तु स्वतंत्र व स्वकल्पित असणें आवश्यक आहे काय ? ४५. पौराणिक कथाच कां लिहिल्या व अलीकडील राष्ट्रीय इतिहासांतील कथानकें कां वर्णिलीं नाहींत ? ४६ आधुनिक सुशिक्षितांच्या उपेक्षा बुद्धींचें खरें कारण. ४७. जुन्या कवींच्या उद्गारांची उदात्तता व पवित्रता. ४८. हें वाङ्मय निष्क्रियतेस पोषक आहे ही व्यर्थ समजूत.

———





# प्रस्तावना.

कविवर्य मोरोपंत यांजविषयीं चरित्रात्मक व चर्चात्मक असे अनेक ग्रंथ आजवर झाले आहेत. त्यांत आज एका नव्या ग्रंथाची भर पडत आहे हें पाहून मनाला अतिशय संतोष होतो. ही भर फारच मौल्यवान आहे. कारण चरित्र नव्हे पण निवळ चर्चेच्या दृष्टीनें लिहिल्या गेलेल्या मोरोपंतविषयक कोणत्याहि ग्रंथापेक्षां हा ग्रंथ अधिक पूर्ण, भरदार, चिकित्सक व सिद्धांतसंपन्न झाला आहे असं मला वाटतें.

ग्रंथकारानें घेतलेली मूळ भूमिका बोलून चालून मर्यादित आहे. श्रीमद्भागवताच्या आधारें मोरोपंत कवीनें जी निरनिराळीं काव्यें लिहिलीं त्यांचेंच केवळ अंतर्बाह्य निरीक्षण करणें हा ग्रंथकर्त्याचा मूळ हेतु, निदान त्यानें आखून घेतलेलें कार्य होतें. परंतु या काव्यग्रंथाचें सूक्ष्म खोल व तुलनात्मक परीक्षण करण्यास कोणीही मनुष्य प्रवृत्त झाला असतां, अनिच्छेनेंहि त्याची कार्यमर्यादा वाढावी व मूळ न योजिलेल्या अशाहि विषयांच्या चर्चेंत त्यानें प्रथम न कळत शिरावें पण मग तेथेंच हौसेनें रमावें, असें होणें अगदीं स्वाभाविक आहे. नदीमुखानें समुद्रांत शिरण्याचाच हा एक प्रकार होय. याच्या उलटहि प्रकार वाङ्मयसेवेंत आपल्या दृष्टीस पडतात ! म्हणजे आरंभीं मांड चौफेर विस्तृत मांडावयाचा. पण शेवटीं अपूर्ण एकांगी व मोडकें तोडकें असेंच विवेचन निष्पन्न व्हावयाचें. अशा प्रकारापेक्षां प्रस्तुत ग्रंथांत आढळून येणारा प्रकार अधिक अनुकरणीय ठरेल.

ग्रंथाच्या प्रथमार्धांत चार विभागांत मिळून ग्रंथकारानें प्रारंभीं उद्देशिलेलें कार्य समाप्त केलें आहे. पैकीं पहिल्यांत भागवताची योग्यता व भागवताचे अनेक मराठा अवतार, दुसऱ्यांत भागवती काव्यांचें बाह्यांग निरीक्षण, तिसऱ्यांत भागवतविषयक काव्यें लिहितांना पंतांनीं स्वीकारलेली भूमिका व मनांत धरलेला उद्दिष्ट हेतु हे विषय आहेत; आणि चौथ्यांत मूळ संस्कृत ग्रंथ व त्याची प्राकृत काव्यमय प्रतिकृति यांचें तुलनात्मक अंतरंगनिरीक्षण स्कंधानुक्रमानें करण्यांत आलेलें आहे. भागवत ग्रंथ हा अगदीं आधुनिक आहे असा जो अपसिद्धांत कित्येकांनीं काढलेला आहे तो खोडून टाकून त्याचें प्राचीनत्व ग्रंथकारानें प्रथम विभागांत निदर्शनास आणलें आहे. नंतर भागवताला जनतेवर

प्रेमसाम्राज्य कां स्थापितां आलें व त्याच्या स्फूर्तींचा उपयोग अनेक भक्तसांप्रदायाला कसा झाला हें त्यानें दर्शविलें आहे. भागवताच्या मानानें श्रीमद्भगवद्गीतेला लोक अधिक महत्व देतात ही गोष्ट ग्रंथकर्त्याला सयुक्तिक वाटत नाहीं असें दिसतें. परंतु भगवद्गीता हा ग्रंथ लहान असला तरी तो किती व्यापक आहे, आणि श्रीमद्भागवतानें पुरस्कृत केलेला भक्तिमार्ग हा गीतेनें परामृष्ट केलेल्या अनेक मार्गांपैकीं किंवा साधनांपैकीं फक्त एक साधन आहे. शिवाय गीतेनें अध्यात्म व व्यवहार या दोहोंची संगति लावण्याचा केलेला प्रयत्न हा भागवतांतील केवळ भक्तिरसवर्णनापेक्षां तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें अधिक श्रेष्ठ कां ठरतो हें ग्रंथकाराचे लक्षांत सहजच आलें असतें. किंबहुना गीता व भागवत यांची भूमिका व उद्देश हे वेगवेगळेच असल्यानें, भगवद्गीतेला शिरीं धरून सुशिक्षित लोक भागवताला त्यापेक्षां कमी महत्त्वाचें कां मानितात याचा तुलनात्मक विचार उपस्थित होतच नाहीं असें मला वाटतें. बाकी भक्तिरसाचें प्रेमळ खुलासेवार वर्णन, सगुण हरिकथानिरूपण, व आख्यानोपाख्यानें यांची गोडी सामान्य मनुष्याला सहजच विशेष असते या दृष्टीनें भागवताचा उपयोग प्राकृत कवींनीं गीतेपेक्षां अधिक करून घ्यावा हें स्वाभाविकच आहे.

भागवताचा उपयोग आपल्या काव्याला करणाऱ्या कवींमध्यें मोरोपंत हे अधिक श्रेष्ठ आहेत हें दुसऱ्या विभागांत ग्रंथकारानें सिद्ध केलें आहे. नंतर प्रत्येक स्कंध घेऊन मूळचा ग्रंथसंभार व तद्विषयक मोरोपंती काव्य यांचें परस्पर प्रमाण किती पडतें, व त्यावरून मूळ ग्रंथांतील तात्पर्य तर सोडावयाचें नाहीं पण त्याची प्राकृत प्रतिकृति शक्य तितकी आटोपशीर व प्रमाणबद्ध करावयाची, ही गोष्ट मोरोपंतांनीं कशी साधली हें ग्रंथकर्त्यानें दाखविलें आहे.

तिसऱ्या विभागांत भागवताच्या आधारें काव्य लिहिण्यांत मोरोपंतांचा उद्देश काय होता याचें विवेचन करितांना ग्रंथकारानें असें सांगितलें आहे कीं, तारीफ करावयाची ती मोरोपंतांनीं इतकी पुष्कळ कविता लिहिली याची करावयाची नसून त्यांच्या संक्षेपचातुर्याचीच करावी लागते. भागवत हें जरी पुराण या दृष्टीनें, व त्याची व्याख्या सार्थ होईल अशा रीतीनें, लिहिलें असलें तरी मोरोपंतांनीं आपलें काव्य लिहितांना भागवताचीं पौराणिक अंगें विशेष न नटवितां भगवद्भक्तीचें प्रतिपादन व परमेश्वराचें यशोगान हा हेतु मुख्य ठेऊन काव्यनिर्मिति व कथाकथन हें दुय्यम हेतु म्हणून त्यांनीं डोळ्यापुढें ठेविले आहेत. आपली कविता

रसाळ व्हावी व अर्पण सांगितलेली कथा पाल्हाळिक नसावी, असें धोरण त्यांनीं ठेविलें होतें यामुळें राजवंशवर्णनें, आध्यात्मविवेचन वगैरे अवांतर गोष्टी त्यांनीं संक्षेपांत आणिल्या. उलट भक्तिसुखाचा आनंद मनसोक्त मिळावा म्हणून कित्येक ठिकाणीं त्यांनीं मूळ ग्रंथांहूनहि अधिक विस्तार केला आहे. एकंदरीनें मोरोपंतांनीं कवींचा निरंकुशत्वाचा अधिकार फारसा गाजविला नाहीं. पण मूळ सांभाळून मर्यादित क्षेत्रांत त्यांनीं आपली काव्यबुद्धि हवी तशी खेळविली आहे, तथापि लोक समजतात इतकें मोरोपंतांचें शास्त्राध्ययन खोल नव्हते असा अभिप्राय ग्रंथकारानीं व्यक्त केला आहे.

चौथा विभाग हा सर्वांत मोठा असून त्यांत स्कंधानुक्रमानें मूळ भागवतांत काय मजकूर आहे व मोरोपंतांनीं त्यांत घेतलें सोडलें काय किती याचा निर्देश ग्रंथकारानें केला आहे. या विभागांत सर्व भागवताचें तात्पर्यच एक प्रकारें दिलें गेलें आहे. दशमस्कंधाची चर्चा विशेष विस्तारानें केलेली असून कवीनें मुळांतील वर्णनें वगैरे घ्यावीं तितकीं घेतलीं नाहींत व या ठिकाणीं संकोचाचा दुरुपयोग झाला असें म्हटले आहे. “ नैसर्गिक सृष्टिशोभेनें किंवा मानवनिर्मित नगरादि स्थलांच्या शोभेनें मोरोपंतांचें चित्त आकृष्ट करून घेतलें होतेसें दिसत नाहीं, ” मात्र याचा वचपा अलंकारादि साधनांनीं आपल्या काव्यांत पंतांनीं काढला आहे असें ग्रंथकारानें म्हटलें आहे. एकंदरीनें ग्रंथकाराच्या मूळ उद्देशाप्रमाणें चौथा विभाग हा समर्पक झाला असून भागवत व मोरोपंती काव्य या दोहोंचाहि त्यांत घ्यावा तसा परामर्ष घेतला गेला आहे.

पण पंतकाव्यांचा इतका सूक्ष्म अभ्यास ज्यानें केला त्याचें समाधान केवळ भागवतीकाव्याचें निरीक्षण करून संपणें शक्य नव्हतें. याकरितां ग्रंथाच्या उत्तरार्धांत त्यानें इतर अनेक दृष्टींनीं पंतांचीं एकंदर काव्यें जमेस धरून तत्संबंधीं इतर अनेक विषयांची चर्चा केली आहे. पांचव्या विभागांत पंतकाव्यांचा कालनिर्णय व त्यावरून अनुमानितां येणारा पंतांच्या काव्यशक्तीचा विकास हा विषय आहे. यांत नवशिकेपणा, प्रौढावस्था, परिपक्वता, व उतारवय असे चार कालखंड करून त्यांतल्यात्यांत प्रौढावस्थेचा काल हाच पंतांच्या कवित्वशक्तीच्या बहराचा काल असें ग्रंथकर्त्यानें म्हटलें आहे; पण या विभागांतील विषय बराच वादग्रस्त असल्याचीहि जाणीव त्यानें ठेवलेली आहे. सहाव्या विभागांत प्रथम पंतांची भाषाशुद्धि व पंतभाषेचें व्याकरण हे विषय आहेत. पैकीं भाषाशुद्धिसंबंधानें ग्रंथकारानें मोरोपंतांचे जे

अपप्रयोग दाखविले आहेत ते अपवादात्मक ठरून पंतांची काव्यरचना प्रायः शुद्ध असते असेंच कोणासहि म्हणावें लागेल. पंतांच्या काव्यांना व्याकरणाचे नियम लागू करतांनाहि हें लक्षांत ठेवावें लागतें कीं, मराठी भाषेचें तत्कालीन असें व्याकरण निश्चित कोणीं बनविल्याचें आढळत नाहीं; यामुळें जे अनपेक्षित प्रयोग पंतकाव्यांत आढळून येतात ते विशिष्ट नियमाशीं ताडून पाहतां येणें कठीण, उलट या प्रयोगांच्या आधारानेंच त्याकाळीं अमुक प्रयोग हें व्याकरण शुद्ध मानले जात, असेंच कोणी प्रतिपादन करूं लागल्यास त्याला खोडून काढणें कठीण जाईल ! सातव्या विभागांत पंतांच्या काव्यांतील गुण व दोष या दोघांचीहि सूक्ष्म चर्चा ग्रंथकारानें केली आहे. पंतांचे मुख्य दोष म्हणजे क्लिष्टता, दुर्बोधता, अवघड संस्कृत शब्दांचा उपयोग, दीर्घसमास, दूरान्वय, संदिग्धता, कृत्रिमपणा, बोजडपणा, संस्कृत शब्दप्राचुर्य, श्रुतिकटुता, यमकलालसा, मतनियंत्रण, औचित्यहानि, ग्राम्यता, अश्लीलता हे होत; ही यादी बरीच मोठी आहे यांत शंका नाहीं. तथापि दुसऱ्या बाजूस माधुर्य, पदलालित्य, ओजस्विता, संवादचातुर्य, कथाकथनकौशल्य, भाषाप्रभुत्व, अलंकारवैचित्र्य वगैरे ठळक गुणहि पंतांच्या काव्यांत आढळतात. ही गोष्ट ग्रंथकारानें सोदाहरण व समर्पक सिद्ध केलेली असून ही चर्चा त्यानें कवीविषयीं योग्य अभिमान न सोडतां पण दोष दाखविण्यास न कचरतां केली आहे. आठव्या विभागांत काव्यतत्त्वाच्या दृष्टीनें पंतकवितेची चर्चा करण्यांत आलेली असून, या निमित्तानें जुन्या कवितेच्या सामाजिक परिणामाविषयीं असलेल्या प्रचलित मताची चर्चाहि ग्रंथकारानें केलेली आहे.

असो; प्रस्तावना म्हणजे परीक्षण नसल्यानें ग्रंथकाराची व माझीं कोणचीं मतें जुळतात व कोणचीं जुळत नाहींत हें खुलासेवार सांगण्याचें येथें कारणच नाहीं. शिवाय प्रस्तुत ग्रंथ वाचीत असतां चिकित्सकतेपेक्षांहि माझें मन कौतुकानेंच अधिक भरून गेलें होतें हें स्पष्ट नमूद करण्यास मला आनंदच वाटतो. कारण इतक्या ताज्या पदवीधरानें इतका विद्वत्तापूर्ण व विवेचक ग्रंथ लिहिलेला माझे पाहण्यांत नाहीं. विशिष्ट विषयावर संशोधक व चिकित्सक निबंध लिहिणाराला एम्. ए. ची पदवी देण्याचा प्रघात आजपर्यंत मुंबई विद्यापीठांत नव्हता. तो तसा असता व ग्रंथकर्त्यानें हा निबंधग्रंथ त्या परीक्षेकरितां म्हणून सादर केला असता तर त्याला त्याकरितां एम्. ए. ची पदवी सहज मिळाली असती असें मला वाटतें. या ग्रंथाचें सूक्ष्म अध्ययन करणारास हें तेव्हांच दिसून येईल कीं

ग्रंथकारानें भागवत व मोरोपंतांचे ग्रंथ यांचें बरेंच खोल अध्ययन केलेलें आहे. प्रत्येक अनुमान व सिद्धांत सिद्ध करण्याला जो ग्रंथकार प्रत्यक्ष उदाहरणें देऊं शकतो त्याचा पंतकाव्याचा अभ्यास पद्धतशीर रीतीनें केला गेला असला पाहिजे. मतासंबंधानें पाहतां हंस चिपळूणकर पांगारकर परांजपे पराडकर वगैरें ज्या ज्या लोकांनीं मोरोपंतांविषयीं चर्चा केलेली आहे त्यांच्याशीं जेथें मतभेद झाला तेथें ग्रंथकारानें तो धीटपणानें बोलून दाखविला आहे. अनादर बुद्धि न बाळगतां मतभेद सविनयपणें स्पष्ट बोलून दाखवून आत्मसमर्थन करणें हें कोणाच्याहि विवेचक बुद्धीला शोभेतेंच, पण तरुण व होतकरू ग्रंथकारांना तें विशेष भूषणावह आहे. असा कोणताहि ग्रंथविभाग नाहीं कीं ज्यांत ग्रंथकारानें स्वतःचें मतस्वातंत्र्य राखलें नाहीं. असो; ग्रंथकाराच्या परिश्रमक्षमतेचें मला फारच कौतुक वाटतें. बाह्यांग निरीक्षणांत कवितांच्या ओळींची संख्या मोजण्यापासून तो अंतरंगांतील शब्दध्वनी, शब्दरीती, शब्दव्याकरण, काव्यगुण, अलंकार इत्यादिकापर्यंत कोणत्याहि बाबतींत बारीक पाहण्याचें ग्रंथकारानें सोडलें नाहीं. आणि कवि मोरोपंतांवर जें चर्चात्मक वाङ्मय आजवर प्रसिद्ध झालें आहे त्यांत या ग्रंथाला जो अग्रमान द्यावासा मला वाटतो तो वरील गोष्टिमुळेंच. शेवटीं मराठी वाङ्मयाचें भक्त व भोक्ते, विशेषतः अधिकारी विद्यापीठ, यांजकडून या ग्रंथाचा योग्य तो परामर्ष घेतला जाईल अशी आशा व्यक्त करून व ग्रंथकाराचें मनःपूर्वक अभिनंदन करून ही प्रस्तावना पुरे करितों.

पुणें, ता. २० मे १९२६. न. चिं. केळकर.



# संक्षिप्त अक्षरांचें स्पष्टीकरण.

अ.—अध्याय.
अ.म.—अमृतमथन.
अ. व.—अनेकवचन.
आदि.—आदिपर्व.
इ.—इत्यादि.
इ. स.—इसवी सन.
उ., उदा.—उदाहरणार्थ.
ए. व.—एकवचन.
का. प्र.—काव्यप्रकाश ( आंकडे उल्ला-सांचे ).
का. सं.—काव्यसंग्रह.
कृ. वि.—श्रीकृष्णविजय. ( आंकडे अनुक्रमें अध्याय व पद्य यांचे. )
द्वि. पु.—द्वितीय पुरुष.
ध्रु. च.—ध्रुवचरित्र.
नं.—नंबर.
ना. भ्यु.—नारदाभ्युदय.
ना. र.—नामरसायन.
पृ.—पृष्ठ.
पृथु.—पृथुकोपाख्यान.
भा.—भागवत ( आंकडे अनुक्रमें स्कंध, अध्याय व श्लोक यांचे ).
भी. भा.—भीष्मभक्तिभाग्य.
भीष्म.—भीष्मपर्व.
म. भा.—महाभारत.
मं. भा.—मंत्रभागवत. ( आंकडे अनुक्रमें स्कंध व आर्या यांचे ).
मो. च.—लक्ष्मण रामचंद्र पांगारकरकृत ' मोरोपंत चरित्र आणि काव्य-विवेचन. '(अनिर्दिष्ट अंक पृष्ठांचे).
रु. गी.—रुक्मिणीगीत.
वा. च.—वामनचरित्र.
सभा.—सभापर्व.
सुदाम.—सुदामचरित.
स्कं.—स्कंध.

*** ज्या काव्यामध्यें अंतर्गत विभाग नाहींत त्यांच्या नांवापुढें येणारे आंकडे त्यांतील पद्यांचे अनुक्रमांक आहेत असें समजावें.

# कविवर्य मोरोपंत यांचें अल्प चरित्र



महाराष्ट्र भाषादेवीचा हृदयंगम सखा, साहित्यशास्त्राचा मित्र आणि रामभक्तशिरोवतंस मोरोपंत पराडकर हा पन्हाळगड येथे शके १६५१ सौम्य नाम संवत्सरीं जन्मला.

मोरोपंत कऱ्हाडे जातीचे ब्राह्मण होते. त्यांचें गोत्र जामदग्न्य. त्यांच्या बापाचें नांव रामचंद्रपंत व आईचें नांव लक्ष्मीबाई. पंतांच्या बायकोचें नांव रमाबाई. मोरोपंतास रघुनाथपंत आणि रामकृष्णपंत असे दोन पुत्र आणि एक कन्या होती. रघुनाथपंतास ग्वाल्हेरी येथे नोकरी होती, त्याचा वंश तिकडे आहे. रामकृष्णपंतास त्याचा चुलत सासरा विठ्ठल उपाध्याय याने निजामाचे दिवाण चंदूलाल यांजकडून एक गाव इनाम देवविला, तो कित्येक वर्षें त्याजकडे चालत होता.

मोरोपंतांचे पूर्वज रत्नागिरी जिल्ह्यांतील राजापूर तालुक्यापैकी मौजे सौंदळ या गावीं राहत होते. तेथून पंतांचे वडील रामाजीपंत हे कोल्हापूर संस्थानची त्या वेळची राजधानी पन्हाळगड येथे निघून आले व तेथेंच त्यांनी घर करून संसार थाटला.

पंतांचे वडील रामाजीपंत यांना कोल्हापूर दरबारीं चाकरी मिळाली. रामाजीपंताने आपल्या मोतद्दारास कांही अपराधास्तव पैसा तापवून डाग दिला; तेव्हा राजाने मात्र करावयास योग्य असा दंड आपण आपल्या सेवकास केल्याबद्दल आपणास शासन होईल या भीतीने त्याने पन्हाळगड सोडला आणि तो बारामतीस आला. तेथे बाळाजी विश्वनाथ भट पेशवे यांचा जामात बाबूजी नाईक जोशी जहागिरदार होता त्याजकडे तो पागेच्या कामावर राहिला. तोंपर्यंत मोरोपंत पन्हाळगडासच होते. मोरोपंतहि पुढे पन्हाळगडाहून निघून बापास भेटण्याकरिता बारामती येथे गेले. मोरोपंत

पन्हाळा सोडून बारामतीस कायमचे राहण्यास केव्हा गेले याविषयी पंत-चरित्रावर लिहिणाऱ्यांचें एकमत नाही. कै. ल. रा. पांगारकर हे आपल्या मोरोपंत चरित्रांत पंत शके १६७५ च्या सुमारास आपल्या वडिलांची भेट घेण्याकरिता म्हणून पन्हाळा सोडून बारामतीस गेले असें वर्णन करितात. पंतवंशज श्री. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर हे करवीर संस्थानच्या अंदाधुंद व जुलमी राजवटींत पंतांवर कांही तरी प्राणघातक संकट आल्यामुळे ते पन्हाळा सोडून गेले असावे असें सुचवितात. कोल्हापूरचा छत्रपति संभाजी हा शके १६८२ मध्ये मरण पावल्यानंतर त्याची बायको जिजाबाई व दासी-पुत्र येसाजी यांची जुलमी झोटिंगपाच्छाई सुरू झाली, असें इतिहास सांगतो. तेव्हा पंतांवर जें संकट आलें तें शके १६८३ ते १६८७ या अवधींत आलें असावें असा पराडकर तर्क करितात. अर्थात् या चार वर्षांत केव्हा तरी पंत पन्हाळा सोडून बारामतीस आले असा त्यांचा अभिप्राय दिसतो.

बारामतीस आल्यानंतर पंतांचा बाबूजी नाइकाशीं परिचय झाला. पंतांचे गुण पाहून बाबूजी नाईक यास फार संतोष झाला. त्याने सालीना ५०० रुपयांची नेमणूक करून देऊन पंतास आपल्या घरीं पुराण सांगण्या-करिता ठेविलें. याखेरीज लग्नकार्य वगैरे प्रसंगीं विशेष द्रव्यसाहाय्यहि तो करीत असे. नाईक हा पंतांस कांही जहागीर करून देत होता, परंतु ती घेण्याचें पंतांनी नाकबूल केलें. बारामतीस मोरोपंत बाबूजी नाइकांच्याच एका वाडयांत राहत असत. तो वाडा शके १६९९ सालीं नाइकांनी पंतांना दान दिला.

पन्हाळगडचे केशव पाध्ये व गणेश पाध्ये हे बंधु मोरोपंतांचे गुरु होत. त्यांच्यापाशीं पंतांनी काव्य, व्युत्पत्ति, अलंकार, वेदान्त इ० विषयांचें अध्य-यन केलें. पाध्यांच्या घराण्यास पंत फार पूज्य मानीत असत. पुढे पंढरपूरचे काशीनाथबाबा पाध्ये यांची कन्या सुंदराबाई ही मोरोपंतांचा चिरंजीव रामकृष्णपंत यास दिली, तेव्हा तर त्यांचा पाध्यांच्या घराण्याशीं शरीरसंबंधच घडून आला. यामुळे परस्पर स्नेह दृढतर झाला.

प्रतिदिवशीं रात्रीं धुळीची पाटी, संस्कृत पोथी व सदीप समई इतकी तयारी चाकराने करून ठेवावी. इकडे सर्व नित्य कृत्य आटोपल्यावर पंतांनी सर्व पाटीभर ग्रंथ लिहावा आणि नंतर निजावयास जावें असा त्यांचा

पूरिपाठ होता. दुसरे दिवशीं सकाळीं पाटीवरील ग्रंथाची प्रत शाईने करून ठेवण्याचें काम लक्ष्मणभट्ट बाईकर याजकडे होतें. एके दिवशीं चाकराच्या हातून पाटी उधळली, तेव्हा नष्ट झालेला ग्रंथ स्वतः भगवान् रामचंद्रानें कागदावर लिहून ठेवला असें म्हणतात.

बारामतीकर जहागिरदार जोशी यांना पुराण सांगणें आणि रसिकजन-संतोषाकरिता व परमेश्वरप्रसादाकरिता काव्यरचना करणें हेच दोन उद्योग पंतांनी नाइकांच्या आश्रयास आल्यानंतरच्या आयुष्यांत केले. कांही थोडीं काव्यें त्यांनी बारामतीस येण्यापूर्वी लिहिलीं होतीं, परंतु आपल्या प्रचंड ग्रंथसंभारापैकी बहुतेक सर्व महत्त्वाचे काव्यग्रंथ त्यांनी बारामतीस आल्या-नंतर लिहिले. त्यांच्या लेखनाचा कालक्रमवार आराखडा पुढे दिला आहे. (पृ. १९० ते २५४)

पंतांचा स्वभाव प्रेमळ पण एकमार्गी व मितभाषी होता. पुराण-कथन, सद्ग्रंथावलोकन आणि काव्यग्रथन यांखेरीज अन्य व्यवसाय त्यांनी आजन्म केला नाही. कोणाच्याहि कसल्याहि व्यावहारिक भानगडींत ते पडले नाहीत. अर्थात त्यांस विरोधक किंवा शत्रु कोणीच नव्हते. पंतांचा ज्यांच्याशीं परिचय झाला त्यांच्या मनांत पंतांविषयी प्रेमादरच उत्पन्न झाला. त्यांचें मित्रमंडळ फार मोठें नव्हतें; पण त्यांना जे मित्र व आप्त लाभले ते त्यांच्यासारखेच सत्त्वशील, प्रेमळ, भक्तिप्रवण, विद्यावान आणि रसिक होते. ही मित्रमंडळी पंतांना काव्यरचनेच्या कामीं प्रोत्साहन देत असत आणि त्यांचें काव्य रचून होतांच त्याचा आस्वाद घेण्यास उत्सुक असत.

श्रीमंत बाबूजी नाईक व त्यांचे चिरंजीव पांडुरंगराय हे पंतांचे आश्रयदाते असले तरी प्रत्यक्ष वागणुकीच्या दृष्टीने त्यांच्या सुहृदांतच गणले पाहिजेत. या दोघांचा, विशेषतः पांडुरंगरावाचा पंतांविषयी फार आदरभाव होता. पुढे ज्या आख्यायिका दिल्या आहेत, त्यांत बाजीरावाशीं बोलतांना पांडुरंगरावाने पंतांविषयी 'ते आमच्या आश्रयानें आहेत असें नाही, तर आम्हींच त्यांच्या आश्रयाने आहों' असे उद्गार काढल्याचें नमूद केलें आहे. त्यावरून पंतांविषयी त्यांची केवढी पूज्य भावना होती, हें स्पष्ट होतें.

पाध्येकुलाशीं . पंतांचा, निरनिराळ्या वयांत निरनिराळ्या रीतींनी, पण निकट असा संबंध आला. पंतांचे विद्यागुरु पन्हाळगडचे केशव पाध्ये यांचा मुलगा सदाशिव हा पंतांचा सहाध्यायी होता, तो पुढील आयुष्यांत त्यांचा जिव्हाळ्याचा मित्र बनला. पण पंतांचा दृढतम स्नेह आणि नंतर आप्तसंबंध जडला तो पंढरपूरच्या पाध्यांशीं. कोकणांतील वृत्तिच्छेदामुळे पंढरपुरास येऊन राहिलेले अनंत पाध्ये हे परमवैराग्यशील आणि भगवद्भक्त होते. हे पंतांचीं काव्यें वाचून त्यांना प्रोत्साहन देत. पंतांनी आपल्या आर्याभारताच्या अखेरीस दोन आर्यांमध्ये त्यांचें स्तवन करून 'सूर्य ज्याप्रमाणे कमळाला प्रफुल्लित करतो त्याप्रमाणे त्यांनी माझ्या कवनांना उत्तेजित केलें' असें म्हटलें आहे.

अनंत पाध्यांचे चिरंजीव विद्वच्छिरोमणि धर्मशास्त्रपारंगत विठ्ठलोपासक काशीनाथोपाध्याय उर्फ बाबा पाध्ये हे होत. हे पंतांपेक्षा वयाने लहान; पंतांविषयी त्यांना मोठा पूज्यभाव असे. पंतांचें नवीन काव्य तयार झालें की तें बाबांकडे अवलोकनार्थ जावयाचें, हें ठरल्यासारखें असे. त्यांच्या अभिप्रायाचा व सूचनांचा पंत आदर करीत. हे पंतांचे गाढ स्नेही होतेच; पुढे व्याही झाले.

बाबा पाध्ये पट्टीचे शास्त्री, तर विठोबादादा चातुर्मासे अनवेकर हे भगवद्भक्तशिरोमणि, साक्षात्कारी संत! तथापि दोघेहि पंतांचे व संतकाव्याचे सारखेच चाहते. पंतांचें प्रकरण पुरें होतें केव्हा व आपल्याला वाचायला मिळतें केव्हा, अशी उत्कंठा यांना लागलेली असायची. विठोबादादा हे प्रेमरंगाने अंतर्बाह्य रंगून गेलेले आत्मानुभवी साधुपुरुष होते. पंतांनी त्यांच्यावर एक स्तोत्र रचलें आहे त्यांत ते दादांची खुद्द तुकोबारायांशीं तुलना करितातः —

वश जयासि सदा भगवान् हरी
कुतुक या तुकयापरि भूवरी

बाबांप्रमाणे दादांचा व पंतांचाहि गाढ स्नेह होता. दादा पंतांच्या आर्यांचा आपल्या कीर्तनांत उपयोग करीत. विठोबादादांचे पुत्र भैराळबुवा हे देखील सुप्रसिद्ध कीर्तनकार असून पंतांच्या काव्यांचे भक्त होते. त्यांनी पंतांच्या आर्यांचा प्रसार केला.

विख्यात शाहीर रामजोशी सोलापूरकर यांचा व पंतांचा परिचय कसा झाला याविषयी जी आख्यायिका प्रचलित आहे ती पुढे दिली आहे. उत्तर आयुष्यांत रामजोशीबोवा वैराग्यशील बनले आणि त्यांनी डफ तुणतुणें टाकून देऊन चिपळया तंबोरी धारण केली. कीर्तनकाराच्यां पेशामध्ये ते पंतांच्या आर्यांचा सररास उपयोग करीत. पंतकाव्यांच्या प्रसारकांमध्ये हे प्रमुख होत.

कांही काव्यें आपल्या मित्रांच्या सूचनेवरून पंतांनी लिहिलीं. पण यासंबंधांत ज्या आख्यायिका प्रचलित आहेत, त्या सर्व खऱ्या आहेत असें म्हणवत नाही. काशीनाथ उर्फ बाबा पाध्ये यांच्या सांगण्यावरून 'बृहद्दशम' भागवताच्या दहाव्या स्कंधाच्या आधारें लिहिला, परंतु तो फार बिकट झाला असें पाध्ये यांचें म्हणणें पडल्यावरून मंत्रभागवत म्हणून सगळया भागवतावर सुलभ ग्रंथ लिहिला, अशी आख्यायिका आहे; पण इतर पुराव्यावरून ताडून पाहतां हिच्यांत कांही सत्यांश दिसत नाही. ब्रह्मोत्तरखंड, मदालसाख्यान आणि कृष्णमाहात्म्य हीं काव्यें पंतांनी आपला मित्र व गुरुबंधु सदाशिव पाध्ये याच्या सांगण्यावरून लिहिलीं असा त्या काव्यांतच स्पष्ट उल्लेख आहे. तसेंच हरिवंश बाबूजी नाइकांचे चिरंजीव पांडुरंगराव यांच्या सांगण्यावरून केला असें त्या ग्रंथाच्या आरंभींच्या पुढील आर्येवरून दिसून येईलः—

श्री पांडुरंगरायें असकृत् प्रेमेंकरूनि सांगावें ।
भगवन्निदेश जाणुनि सुयश यथाबुद्धि मग न कां गावें ॥

अशा तीन चार उल्लेखांखेरीज इतरत्र कोठे दुसऱ्याच्या सूचनेवरून काव्य लिहिलें असल्याचे उल्लेख आढळत नाहीत. पंतांची वृत्ति पूर्ववयांतच 'हरिध्यानासक्त' झालेली होती व 'चरितचि. तुझें भावें गावें असें मज वाटतें' अशा तऱ्हेचे उद्गार त्यांनी वारंवार काढले आहेत. तेव्हा पंतांनी आपलीं बहुतेक सर्व काव्यें स्वप्रेरणेने लिहिलीं आहेत हें सत्य आहे.

गीतेच्या भाषांतराचे पहिले सहा अध्याय मात्र पंतांनी लिहिले, बाकीचे बारा अध्याय त्यांचा पुतण्या बाळाजीपंत उर्फ आपा पराडकर म्हणून ब्रह्मावर्ती राहत होता त्याने केले असें म्हणतात. यांतहि तथ्य कितपत आहे हें सांगतां येत नाही.

शके १७१० च्या कार्तिक शुद्ध प्रतिपदेस, म्हणजे आपल्या वयाच्या ६० व्या वर्षी, मोरोपंत बारामतीनजीक असलेल्या माळेगावचे जहागिरदार अमरसिंग जाधव यांजबरोबर महायात्रेस गेले. त्यांनी आपली कविता बरोबर नेली होती, ती काशींतील पंडितांस दाखविली. त्या समयीं पंतांच्या ग्रंथांची शलाकापरीक्षा करावी असा तेथील पंडितांचा विचार ठरला. त्याप्रमाणे एके दिवशीं सभा भरून परीक्षा झाली, त्या समयीं कविता निघाल्या त्यांत खाली दाखल केलेल्या आर्या होत्या असें ऐकण्यांत आहे.

वदवि मयूराकरवीं श्रीराम विराटपर्व चवथें बा ।
स्वल्प म्हणोनि न सोडी अमृताची शक्ति सर्व चव थेंबा ॥
रामघन सत्प्रसादामृत जों जों बहु वळूनि वर्षतसे ।
तों तों भक्तमयूर स्वार्याकेका करूनि हर्षतसे ॥

'ह्या विराटपर्वाच्या शेवटल्या आर्या आहेत. यांत कथानकाचा कांही एक संबंध नसून ह्या केवळ पंतकवीच्या स्वतंत्र वा निर्मल प्रतिभानिर्मितच आहेत. भगवत्प्रसादाने परीक्षेच्या वेळीं अशाच सुंदर कविता काशींतील पंडितांच्या प्रेमावलोकनास पात्र झाल्या ही मोठी आनंदाची गोष्ट झाली. ह्या आर्यांमधील साधें अनायासें साधलेलें सरल पदलालित्य, काश्मिरांतील वसंत ऋतूच्या गुलाबाप्रमाणे किंवा निरभ्रपूर्णिमेच्या शरच्चंद्राप्रमाणे अथवा सज्जनमानसाप्रमाणे प्रसाद, भागीरथीच्या स्फटिकरचित अगाध प्रवाहाप्रमाणे अर्थगांभीर्य आणि रसिकांस मोहून टाकणारे सुभग अलंकार पाहून काशींतील महापंडित फार प्रसन्न झाले आणि पंडितांची प्राकृतावर स्वाभाविक अप्रीति असतांहि, प्राकृतांतील वरच्यासारख्या आर्यांचें अपूर्व लावण्य अवलोकन करून त्यांनी पंतांच्या कवितेची मोठी वाहवा केली.'

याच गोष्टीस अनुसरून पंतांचे व्याही काशीनाथ बाबा पाध्ये यांनी म्हटलें आहे की —

ज्या उपजतांचि गेल्या काशीरामेश्वरा नमायाला ।
आर्या या प्रौढपणीं जगतीतल हें पुरे न मायाला ।

आर्यधर्मीयांच्या रिवाजाप्रमाणे पंतांनी प्रयाग, काशी व गया ही त्रिस्थळी यात्रा केली व ते शके १७१२ च्या प्रारंभीं बारामतीस परत आले.

काशीहून परत येतांना नर्मदेच्या काठीं चोळीमहेश्वर येथें श्रीमंत कैलासवासी अहल्याबाई होळकर यांच्या भेटीचा योग आला, तेव्हा सालीना पांचशें रुपये घेऊन आपले पदरीं राहण्याविषयी बाईंनी पंतांस पुष्कळ आग्रह केला; परंतु पंतांचें प्रेम नाइकांवर फार असल्यामुळे तें बोलणें कबूल न करिता ते बारामतीस परत आले.

सन १७४८ पासून १७९४ पर्यंत पेशवाईच्या भरभराटीचा काळ मोरोपंतांनी पाहिला. खर्डे येथे पेशव्यांनी शेवटचा विजय मिळविल्यावर बहुतेक महाराष्ट्रीय राजकार्यधुरंधर पुरुष हा भूलोक सोडून गेले; महाराष्ट्र कविमुकुटमणि मोरोपंतहि त्याच सुमारास, म्हणजे शके १७१६ राक्षस नाम संवत्सरीं (इ० स० १७९४) चैत्र शुक्ल १५ रोजीं स्वर्गस्थ झाले.

आपलीं मातापितरें, यजमान, यजमानाचे चिरंजीव, आणि शेजारी इष्टमित्र यांजविषयी पंतांनी आपल्या ग्रंथांत कोठे कोठे उल्लेख केलेला आहे, त्यांपैकी कांही पद्यें येथे दाखल केलीं आहेत.

धन्य श्रीराम पिता धन्या लक्ष्मी प्रसू जगीं झाली ।
आली सत्यवतीची की भारतकीर्ति सुतमुखीं आली ॥
जो धीर वीरहीर श्रीसिद्धेश्वरमहादयापात्र ।
श्रीमान् बाबूराय प्रभु ज्याचें शोभलें यशें गात्र ॥
शीलजितामरचंदन तन्नंदन पांडुरंगरायहि तें ।
यश मिरवितो प्रजांचीं करि दशरथसा न राम काय हितें ? ॥
श्री बाबूराय प्रभु माझा अत्यंत सदय अन्नद हा ।
अर्थिजना न म्हणों दे तैसा तप्तास जेवि सन्नद हा ॥

## आख्यायिका

मोरोपंत हे लहानपणीं एके समयीं पाध्ये यांजकडे द्वादशीच्या दिवशीं जेवावयास गेले. भोजनोत्तर त्या दिवसाच्या प्रसंगास उद्देशून एक आर्या करून ती त्यांनी पाध्यांच्या ओटीच्या भिंतीवर लिहून ठेविली आणि आपल्या घरीं निघून गेले. ती आर्या पाध्यांच्या दृष्टीस पडली तेव्हा तींत अर्थगौरव असून ती त्या दिवसाच्या प्रसंगास अनुलक्षून लिहिली आहे असें पाहून, त्यांनी ती कोणी लिहिली याविषयी चौकशी केली; तेव्हा ती

पराडकरांचा मुलगा मोरोबा याने लिहिली असें समजलें; त्यावरून त्या मुलाच्या बुद्धिमत्तेविषयीं खातरी झाल्यामुळे रामाजीपंतास सांगून त्यांनी त्या मुलास आपल्याकडे संस्कृत भाषा शिकण्याकरिता ठेविलें.

× × ×

महीपतिकृत भक्तिविजयाचे पंचेचाळिसावे अध्यायांत असें लिहिलें आहे की, एका अडक्याची चूक हिशेबांत लागल्यामुळे पुष्कळ रात्र होईपर्यंत दिव्याशीं चुकीचा पत्ता लावण्याकरिता एकनाथ जागत बसला. नंतर पुष्कळ वेळ एकाग्र चित्ताने तपास केल्यावर चूक सापडली तेव्हा त्यास परमानंद झाला. तें पाहून एकनाथाचे यजमान जनार्दनपंत म्हणाले की, ईश्वराकडे असेंच लक्ष लागलें तर किती कल्याण होईल बरें ? तें ऐकतांच एकनाथाने यजमानाच्या पायावर लोळणी घातली आणि तेव्हापासून तो भक्तिमार्गांत शिरला. हीच गोष्ट कित्येक लोक मोरोपंतांविषयी सांगतात व ती जुळविण्याकरिता मोरोपंत हे बारामतीस जाण्यापूर्वी पन्हाळयास मुजुमदारीवर होते असें कल्पितात.

× × ×

पंत आठ पंधरा दिवस बाबूजी नाईक यांजकडे राहिल्यावर एके दिवशीं बायका दळीत असतां ओंव्या म्हणत आहेत असें त्यांनी ऐकलें; तेव्हा मी तुम्हांस राम व कृष्ण यांच्या चरित्रावर ओंव्या करून देतों त्या तुम्ही म्हणाल काय ? असें त्यांनी त्या बायांस विचारलें. बायांनी होय म्हणून उत्तर दिल्यावर पंतांनी सीतागीत व रुक्मिणीहरणगीत अशीं दोन प्रकरणें बायकांच्या ओंव्यांच्या चालीवर रचिलीं. त्यांतून दोन ओंव्या मासल्याकरिता पुढे दाखल केल्या आहेत.

मांडीवरीं मज घेतलें स्वामींनी । घनीं सौदामिनी जना वाटे ॥
श्रीराम दयेचा मेघ त्यासमोर । प्रेमें दास मोर नाचताती ॥ सीतागीत
श्रीमूर्ति श्रीगंगा या देहा ओहळा । स्वीकारी सोहळा पुरवाया ॥
मयूरासी वर्षा सज्जना हे तथा । स्वयंवरकथा रुक्मिणीची ॥ रुक्मिणीगीत

या ओंव्या, बायका दळतांना म्हणतात त्या ओंव्यांच्याच चालीच्या आहेत. पंतांच्या ओंव्या दळते समयीं बायका म्हणूं लागल्या त्या यजमानांचे

कानीं पडल्या. त्यावरून त्यांनी ह्या नव्या ओव्या कोठल्या म्हणून विचारपूस केली, तेव्हा रामचंद्रपंताचे चिरंजीव मोरोपंत यांनी त्या केल्या असें त्यांस कोणी कळविलें. तें ऐकून यजमानास संतोष झाला. यजमानास आपली कविताशक्ति कळविण्याची ही मोठी चमत्कारिक शक्कल पंतांनी काढली यांत संशय नाही.

× × ×

बाबूजी नाईक यांजकडे प्रथम पंत कांही दिवस जाऊन राहिल्यानंतर, जवळच्या मंडळीने, रामचंद्रपंताचे चिरंजीव मोठे विद्वान असून ते आज आठ पंधरा दिवस पंक्तीस असतात, असें कळविल्यावरून संध्यावंदनसमयीं पंतांस नाइकांनी बोलावून आणिलें आणि पाट बसावयास देऊन सर्व हकीकत विचारून घेतली. नंतर जवळ रुद्राची पोथी होती ती पुढे करून याचा अर्थ तुम्ही आम्हांस सांगा असें नाइकांनी म्हटलें. त्यावर, रुद्र हा वैदिक ग्रंथ आहे, याचा अर्थ सांगण्यास पूर्वी भाष्य पाहून ठेविलें पाहिजे, दुसरा एखादा संस्कृत ग्रंथ दिल्यास त्याचा अर्थ यथामति सांगेन, अशी पंतांनी विनंती केली. ती ऐकून जवळ शिवकवचाची पोथी होती ती नाइकांनी पुढे केली. तेव्हा मूळ श्लोक वाचून त्याचा अर्थ तत्क्षणींच मराठी श्लोक रचून पंत सांगू लागले. याप्रमाणे सर्व शिवकवचाचा अर्थ सांगितला. तेणेंकरून नाईक फार प्रसन्न झाले आणि सालीना ५०० रुपये नेमणूक करून आपल्या घरीं पंतांस पुराण सांगण्याकरिता त्यांनी ठेविलें. रामरक्षेचाहि अर्थ असाच मराठींत श्लोक रचून पंतांनी नाइकांस सांगितला असें म्हणतात.

× × ×

रामाजीपंताचा मुलगा मोरोबा चांगला विद्वान असून कविहि आहे असें बाबूजी नाइकांच्या दृष्टोत्पत्तीस आलें, तेव्हा त्यांचे ठिकाणीं मोरोबाविषयी आदर उत्पन्न झाला. नाइकांच्या पंक्तीला जे आश्रित जेवायला बसत त्यांत ५० वा नंबर रामाजीपंताचा व ५१ वा नंबर मोरोबाचा असे. वरील प्रसंग घडला त्या दिवशीं रात्रीं भोजनप्रसंगीं मोरोबाला ५१व्या नंबरावरून आपल्या शेजारीं दुसऱ्या नंबरच्या पाटावर नाइकांनी जेवावयास बोलाविलें. पण 'मी येथेच बरा आहें' असें म्हणून मोरोबा आपल्या जागेवरून उठेनात. दोनतीनदा आग्रह केला

तरी तोच प्रकार. नाइकांचे कारभारी दाजीबा हे फार चाणाक्ष होते. त्यांनी पंतांच्या हट्टाचें कारण हेरलें. त्यांनी दुसऱ्या पाटावर रामाजीपंतास नेऊन बसविलें व तिसऱ्या पाटावर मोरोबा जाऊन बसले. वडिलांचें अतिक्रमण होऊं नये म्हणून थोर व कुलीन पुरुष असेंच जपत असतात.

× × ×

एके समयीं रामजोशी बोवा सोलापूरकर हे तमाशा घेऊन बारामतीस गेले, तेव्हा त्यांचा तमाशा करण्याचा बेत ठरला. परंतु नट पाहणें अशास्त्र असल्यामुळे पंतांनी तमाशास येण्याचें नाकबूल केलें. आपण माडीवर बसून जोशीबोवांचें कवन ऐकावें म्हणजे झालें, असा मंडळीने आग्रह केला. त्यास पंतांनी रुकार दिला. इकडे कवन ऐकावयास पंत माडीवर बसले आहेत ही गोष्ट मंडळीने जोशीबोवांस कळविली होती. यामुळे डफावर थाप मारिल्यापासून जोशीबोवांनी वैराग्य व बोध यास अनुलक्षून लावण्या म्हणण्याचा एकसारखा सपाटा चालविला. तें पाहून पंतांस फार संतोष झाला व ते माडीवरून खाली येऊन जोशीबोवांस म्हणाले की, तुमची वाणी फार रसाळ आहे परंतु तुम्ही या नटास पुढे उभें करून आपण स्वतः मागे उभे राहतां हें बरोबर नाही. तुम्हीच पुढे उभें राहून कीर्तन करावें हें चांगलें. त्यावर जोशीबोवा म्हणाले की कीर्तनाचें साहित्य मजजवळ नाही. तें ऐकून पंत म्हणाले की, मी काव्य करीत आहें तें कोणाकरिता? तुमच्यासारखे जे कीर्तन करतील त्यांजकरिताच माझी खटपट चालली आहे. तेव्हापासून जोशीबोवांनी तमाशा करण्याचें काम सोडून दिलें व कीर्तन करण्यास आरंभ केला.

× × ×

वरील आख्यायिकेंत सांगितल्याप्रमाणे पंत व जोशीबोवा यांचा स्नेह झाल्यावर एके समयीं पंत काय करीत आहेत याचा शोध करून येण्याविषयी एका मनुष्यास जोशीबोवांनी सांगितलें. त्याप्रमाणे तो पंतांस भेटून त्यांचा परत निरोप घेऊन आला की, 'यावेळीं मी रघुनाथचरित लिहीत आहें,' असें पंत बोलले; तें ऐकून, जे पंत मोठे विस्तरभीरु व संक्षेपाने सुरस ग्रंथ लिहिण्याविषयी ज्यांचा बाणा त्यांनी रामकथा असें एखादें लहान नांव न योजितां रघुनाथचरित्र इतकें लांबट नांव कां सांगितलें याविषयी

जोशीबुवा विचार करूं लागले. बराच वेळ विचार केल्यावर जोशीबुवांनी अटकळ केली की, पंत या समयीं निरोष्ठ रामायण लिहीत असतील म्हणून त्यांनी रघुनाथचरित अशा लांबट नांवाचा प्रयोग केला असावा. नंतर समक्ष गाठ पडल्यावर विचारून पाहतां आपण केलेली अटकळ खरी असें जोशीबुवांस समजून उभयतांस सानंदाश्चर्य झालें.

× × ×

दुसरे बाजीरावसाहेब पेशवे यांची बहीण दुर्गाबाई ही पांडुरंगराव नाईक यांस दिली होती. एके वर्षीं बाजीराव साहेब भाऊबिजेकरिता बारामतीस आले. तेथे नाईक यांचे पदरीं मोरोपंत पराडकर मोठे विद्वान गृहस्थ आहेत असें पाहून ते आपल्या जवळ असावे अशी आपली मनीषा बाजीराव साहेबांनी नायकांस कळविली. त्याजवर नायकांनी उत्तर दिलें की, 'ते आमचे येथे आहेत असें नाही, तर आम्हीच त्यांच्या आश्रयाने आहों; यास्तव आपण पंतांसच विचारावें. ते कोणत्याहि कामीं स्वतंत्र आहेत.' त्यावरून पंतांस विचारतां ते नायकांस म्हणाले की, 'आपले पाय सोडून जाण्याची माझी तर इच्छा नाही; पण माझा आपणास कंटाळा आला असल्यास ईश्वर जिकडे वाट दाखवील तिकडे जाईन.' नंतर आम्हांस निदान एकदा तरी आपण पुराण सांगावें असें बाजीराव साहेब म्हणाले. त्यावर पंत आपल्या यजमानांस म्हणाले की, 'आपण पुराणास असल्यावर मग दुसरें कोणी असलें तरी चिंता नाही.' एवढ्यावरून बाजीराव साहेब यांस फार राग आला व त्यामुळे ते पंतांचा व त्यांच्या काव्याचा फार द्वेष करूं लागले. पुढे बाजीराव गादीवर असतांना व पदच्युत झाल्यावर ब्रह्मावर्ती असतांहि कोणा हरदासाची कथा करावयाची असल्यास जीं पांच चार कलमं यजमानांचे आज्ञेवरून कारभारी हरदासास कळवीत असत त्यांपैकी मोरोपंतांची आर्या कथेंत म्हणूं नये हें एक असे.

× × ×

मोरोपंत मोठा रसिक कवि आहे, याविषयी तो जिवंत असतांनाच प्रख्याति झाली होती. त्यासंबंधाने पद्यस्वरूप उद्गार जे आढळले त्यांपैकी कांही या ठिकाणीं दाखल केले आहेत.

श्रीमन्मयूरकविची देते संतोष मानवां कविता ।
असता जरि भूमीवरि सुरगुरु तरि तोहि मान वांकविता ॥
आर्या कविता कीजे एका बारामतींत मोराने ।
अन्य कवी ते करिती फिरती बारा मती तमोरानें ॥
बा राम तींत आहे म्हणउनि बारामती असें नांव ।
तींत वसे तो मोरोपंत भवाब्धींत जीत नव नांव ॥
आर्याछंदे जोडुनि रामायणभारतादि आयकवी ।
नायक वीरकवींचा ऐसा होईल अन्य काय कवी ॥

## वृत्ति, स्वभाव आणि चारित्र्य

पंतांची जीवनकथा, त्यांच्या विषयीच्या आख्यायिकांसह, वर वर्णिली आहे, त्यावरून त्यांच्या व्यक्तित्वाची थोडीबहुत कल्पना येईल. पंतांचा संसार सरळ, सीधा, एकमार्गीपणाचा होता. त्यांत भानगडी, उलथापालथी होण्याचा कधी प्रसंग आलेला दिसत नाही. तथापि सांपत्तिक स्थिति बेताची असल्यामुळे व कुटुंबपरिवार मोठा असल्यामुळे त्यांच्यामागे प्रापंचिक विवंचना व काळज्या बऱ्याच असल्या पाहिजेत. ते प्रकृतीने अशक्त होते व क्वचित चिडखोर होत. 'मी बहु अशक्त निर्धन कोपी' असें त्यांनी स्वतःविषयी म्हटलें आहे. पण त्यांच्या कोपाचे प्रसंग फार दुर्मिळ असले पाहिजेत.

रागेजणें सुदुर्मिळ, तेंहि जिचें ज्वाळसें गगनिं जावें

हें त्यांनी द्रौपदीविषयी म्हटलें आहे, तें त्यांना स्वतःला चांगलें लागू पडत होतें यांत शंका नाही.

पंतांचा स्वभाव प्रेमळ आणि सत्त्वशील, वृत्ति निःस्पृह आणि मानी, आणि चारित्र्य उदात्त आणि थोर होतें. पतिपत्नी, पितापुत्र, बंधु बंधु, सास्वासुना, नवविवाहित दंपती, इत्यादि कौटुंबिक नात्यांचें व तद्गत प्रेम-संबंधांचें वर्णन त्यांनी इतक्या समरसतेने केलेलें आहे व या संबंधांमधील रहस्यें इतक्या मार्मिक रीतीने काव्यांत दृष्टान्त व अर्थांतरन्यास यांच्या द्वारा

ग्रथित केलेलीं आहेत, की मराठी काव्यवाङ्मयांत असे उल्लेख इतरत्र फारच विरळा आढळतील. कौटुंबिक संबंधांतल्या सर्व प्रकारच्या प्रेमभावांचा, सुखदुःखांचा 'लिप्यन्नपि लिप्यते' या भूमिकेवरून आस्वाद घेणारे ते सौजन्यपूर्ण कुटुंबनायक होते, 'प्रपंचांत अनासक्त असून आसक्ताप्रमाणे व्यवहार करणारे' ते आदर्श गृहस्थाश्रमी होते. "मोरोपंतांचें चित्त फार प्रेमळ, कोमल व निर्मळ होतें...गुरुजनांविषयी व साधुसंतांविषयी पूज्य बुद्धि, बंधुमित्रांविषयी सौहार्द, कन्यापुत्रादिकांविषयी वात्सल्य, धर्मपत्नी-विषयी प्रीति, अन्य सर्व जीवांविषयी अनुकंपा, हे प्रेमभावाचेच प्रकार होत व हे सर्व त्यांच्या आचरांत व विचारांत—चरित्रांत व ग्रंथांत—इतके ओत-प्रोत भरले आहेत की त्यांचें चरित्र व ग्रंथ प्रेमरसाच्या मूर्तीतूनच काढले आहेत असें वाटतें" असे उद्गार पांगारकरांनी त्यांच्याविषयी काढले आहेत. (मो. च. ८२)

पंतांना मुलाबाळांविषयी फार प्रेम होतें. लहानमुलांच्या लीलांचें व बोबडया बोलांचें वर्णन त्यांनी आपल्या काव्यांमध्ये अनेक ठिकाणीं फार आवडीने आणि हृदयंगम रीतीने केलें आहे. पिता आणि पुत्र, माता आणि बालक यांच्यामधील परस्पर प्रेमाची भावना तर त्यांनी इतक्या रीतींनी आणि इतक्या ठिकाणीं आळविली आहे की त्याला गणतीच नाही. "स्वानुभवास्तव वत्सलरस त्यांच्या कवितेंत फारच बहारीचा उतरला आहे." (पांगारकरकृत मोरोपंत चरित्र पृ. ८३).

## पंतांची विनोदबुद्धि

प्रपंचांतील सर्व भावभावनांचा अनासक्त बुद्धीने आस्वाद घेणाऱ्या प्रेमळ आणि सहृदय मनुष्याच्या ठायीं विनोदवृत्ति बहुधा असतेच. तशी ती पंतांच्या ठायीं पण होती. त्यांच्या काव्याचा विषय भगवंताचीं आणि भगवद्भक्तांचीं चरित्रें हा असल्यामुळे मुख्य कथावर्णनामध्ये विनोदाला अवसर क्वचितच मिळतो. पण उपमादृष्टांतादिकांच्या द्वारें त्यांची विनोदबुद्धि अनेक ठिकाणीं प्रकट झाली आहे. जेथे पौराणिक कथाभाग आधारार्थ घेतलेला नाही अशीं जीं त्यांचीं स्फुट काव्यें आहेत, त्यांत

त्यांच्या विनोदबुद्धीला अधिक अवसर मिळालेला दिसतो. पंत परमेश्वराविषयी लडिवाळपणे सलगीचे उद्गार काढतात, तेथे कित्येक वेळां विनोद निर्माण होतो. ही 'नामरसायनां' तील आर्या पहा—

> आर्या मुक्तामाला दावीन, परंतु जरि न मागाल
> लागाल प्रभुकंठीं घालूं, फुगवील की रमा गाल.

'सन्मनोरथराजि' आणि 'संशयरत्नमाला' हीं पंतांचीं स्फुट प्रकरणें तर रम्य विनोदाचीं भांडारेंच आहेत. 'सन्मनोरथराजी' मध्ये एकामागून एक जे चमत्कृतिजनक दृष्टान्त दिलेले आढळतात, ते पंतांच्या विनोदबुद्धीची, तसेंच त्यांच्या मार्मिक अवलोकनशक्तीची साक्ष देतात.

> कर्णयुगांत भरावें हें हरिहरिजनयश प्रचुर म्यां तें
> जैसा दोंदीं कोंदी गुर्जरदेशस्थ विप्र चुरम्या तें.

यांत वर्णिलेली अन्यदेशीयांची वर्तनरीति, किंवा

> १ स्वप्रियलब्धरसकथन करिती स्वसखीजनीं जसी बाला,
> प्रेमळ जनीं कथूं निजसुख रसना स्तवुनि आपल्या भाला.
>
> २ साध्वी स्त्रीने न ढळों द्यावा हा सुमतिने जसा पदर.

या वचनांमध्ये व्यक्त झालेला स्त्रीस्वभाव पंतांच्या प्रतिभेंत मार्मिक अवलोकन, योजकता आणि विनोदपरता यांना महत्त्वाचें स्थान होतें हें सिद्ध करावयास पुरेसा आहे.

पंतांना विनोदाचें अंग होतें; तथापि त्यांच्या स्वभावांत छचोरपणा, उच्छृंखलपणा, ग्राम्यतेची आवड यांचा लवलेशही नव्हता, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. विनोद हें मुख्य विषयाचें उपांग म्हणूनच त्यांनी योजिलें आहे. त्याला कोठेही मुख्यस्थानापन्न होऊं दिलेलें नाही. संयम, मर्यादशीलपणा, संभावितपणा हे त्यांच्या स्वभावाचे, तसेच काव्याचे स्थायी गुण होत. पाल्हाळ, पुनरुक्ति, भडकपणा, अतिरेकीपणा, इ० दोष मुक्तेश्वर प्रभृति इतर कांही कवींच्या रचनेंत आढळतात. पंतांचें काव्य या दोषांपासून अलिप्त आहे.

## निरिच्छ वृत्तीचा साधुपुरुष

पंत हे 'तनुनिर्वाहापुरता संग धरून' निरिच्छ वृत्तीने धर्माचरणांत आणि भगवद्भक्तींत काळ कंठणारे साधुपुरुष होते. मानसन्मान, द्रव्य, किंवा इतर व्यावहारिक लाभ यांची त्यांना चाड नव्हती. मागे दिलेल्या आख्यायिकांमध्ये दुसऱ्या बाजीरावाच्या संबंधाची जी आख्यायिका आहे तिजरून त्यांचा मानीपणा व निःस्पृहपणा दिसून येतो. पुण्यश्लोक अहल्याबाई होळकर यांनी बोलावल्यावरून पंत त्यांच्या आश्रयास गेले असते तर त्यांना गजान्तलक्ष्मीचा लाभ झाला असता. पण धनलोभ त्यांच्या मनास शिवला नसल्यामुळे त्यांनी त्यांची विनंती मान्य केली नाही. त्यांचे आश्रयदाते बाबूजी व पांडुरंगराव नाईक यांची दौलत फार मोठी होती असें नाहीं; पेशव्यांच्या विरोधामुळे त्या दौलतीला उत्तरोत्तर पडती कळा येत चालली होती. तरी अशा मालकाच्या आश्रयास राहून त्यांनी चाळीस वर्षें काढली, दुसरीकडे कोठे जाण्याचें स्वप्नींही मनांत आणलें नाही, यांत दिसून येणारी त्यांची निष्ठा, कृतज्ञता व निर्लोभता अपूर्व होय. बरें नाईकांच्या आश्रयास ते होते, म्हणून त्यांची कोठे वारेमाप स्तुति केली आहे अगर त्यांवर कवनें रचलीं आहेत असाही खुशामतीचा खाक्या त्यांनी वटविला नाही 'चाळीस वर्षें ज्याच्या आश्रयाने काढलीं त्याचीही स्तुति त्यांनी १०–५ आर्यांतच आटोपली आहे'. ( पांगारकरकृत मोरोपंत चरित्र पृ. १०१ ). स्तुति करावी तर परमेश्वराचीच.

मन हेंचि फार इच्छी की आतां सेवणें तुझे पाय,
तुजवाचुनि इतरांच्या भजनीं मजलागि होय फळ काय !

अशी त्यांची वृत्ति होती.

पंत हे धर्मनिष्ठ होते आणि आचारशील होते. त्यावेळच्या सामाजिक रूढीस अनुसरून खाण्यापिण्याच्या व स्पर्शास्पर्शाच्या बाबतींतील जातिनिर्बंध ते पाळीत असले पाहिजेत. पण ते कर्मठ व कर्मकांडी नव्हते. सोवळयाचा व पूजा आन्हिकाचा दंभ माजविणारे तर नव्हतेच नव्हते. त्यांची काव्यरचना कथानकांच्या बाबतींत आणि शब्दयोजना, शैली, वर्णनरीति यांच्या बाबतींत संस्कृताचा आश्रय करणारी असली,

तरी त्यांची मनोभूमिका उदारधी भगवद्भक्तांच्या आणि संतांच्या शिकवणुकीने तयार झालेली होती. सर्वांभूतीं भगवंत असल्यामुळे परमेश्वरापुढे सर्व मानव सारखे आहेत, तेथे जाति, धर्म, वय, लिंग यांची मातब्बरी नाही, हें तत्त्व त्यांच्या मनांत बिंबलें होतें. मोक्षाचा किंवा आत्मोद्धाराचा मार्ग सर्वांस सारखाच मोकळा आहे व असला पाहिजे; भगवद्भक्त, मग तो कोणच्याही जातीचा असो, ब्राह्मणांसुद्धा सर्वांस पूजनीय आहे, हा भाव त्यांच्या काव्यांत अनेकवार व्यक्त झालेला आहे. उच्च जातींत जन्मल्याने सुसंस्कारांची अनायासाने प्राप्ति होते, हें खरें. पण ईशभक्तीचा गुण त्या सर्वांपेक्षा श्रेष्ठ होय. जातिप्राप्त गुण त्यापुढे रद्द होत.

विप्राद् द्विषड्गुणयुतादरविंदनाभ
पादारविंदविमुखात् श्वपचं वरिष्ठम् ।

या भागवतोक्तीचे ते अनुयायी होते.

---

पूर्वार्ध

# मूळ भागवताचें व पंतांच्या भागवती काव्याचें सांगोपांग तुलनात्मक विवेचन.

॥ श्री ॥

## विभाग पहिला.



# श्रीमद्भागवताची अलौकिक योग्यता, भागवताचे मराठींतील अवतार.



**निगमकल्पतरोर्गलितं फलं शुकमुखादमृतद्रवसंयुतम् ।**
**पिबत भागवतं रसमालयं मुहुरहो रसिका भुवि भावुकाः ॥**

भा. १.१.३.

१. अनादिकालीं प्रकट झालेल्या वैदिक ऋचांपासून तों तहत आजकाल मधुन मधून प्रसिद्ध होणाऱ्या संस्कृत ग्रंथांपर्यंत अफाट पसरलेल्या गीर्वाण वाङ्मयामध्यें श्रीमद्भागवत हा एक अत्यंत महत्त्वाचा व अलौकिक ग्रंथ आहे. भारत व रामायण हे ग्रंथ महान् योग्यतेचे आहेत व आम्हां सर्व आर्यांना ते नित्य पूज्य आहेत. त्या दोहोंचें, विशेषतः महाभारताचें, धर्माच्या, तत्वज्ञानाच्या, नीतिशास्त्राच्या, इतिहासाच्या, राजकारणाच्या व भाषेच्या दृष्टीनें अतिशय महत्त्व आहे. परंतु भागवताचें महत्त्व त्याच्याहूनही विशिष्ट व निराळ्या तऱ्हेचें आहे. महाभारताची भूमिका सर्वस्वीं व्यावहारिक आहे, परमार्थमय नाहीं. या जगांत धर्माज्ञेला व नीतीला न सोडतां नाना तऱ्हेचे उद्योग व खटपटी केल्या, व्यवहारांतले प्रश्न कुशलपणें सोडवून जें काय मिळवावयाचें तें मिळविलें व पराक्रम गाजवावयाचा तो गाजवला तरी देखील या बहिर्मुख व्यापारांमध्यें मनुष्याच्या मनाला पूर्ण शांति प्राप्त होत नाहीं. आपल्या अंतःकरणांतील हितगुज ज्याला सांगावें, विपन्नावस्थेंतील दुःखें व संपन्नावस्थेंतील सुखें सारख्याच समाधानवृत्तीनें ज्याला निवेदन करावीं व ज्याच्या सर्वस्वार्पण करून केलेल्या सेवेंत शाश्वत आनंद प्राप्त

व्हावा, असा जीवींचा विसावा होऊन राहणारा सखा प्राप्त करून घेण्याची मनाला तळमळ लागून राहाते. बाह्य जगाच्या व्यापसंतापापासून अलिप्त असें अंतरींचें समाधान प्राप्त करून घेण्याची ही मनुष्यमात्राची धडपड पूर्वीपासून एकसारखी चालू आहे. अशा निरतिशय समाधानाच्या स्थानाप्रत नेऊन पोचविणारे जे कांहीं मार्गदर्शक वाटाडे आहेत त्यांत श्रीमद्भागवत हा ग्रंथ प्रमुख होय. इहलोकीं आयुष्यभर निरतिशय शांति देणारा व परलोकीं परमपद प्राप्त करून देणारा प्रेममय भक्तवत्सल प्रभु व्यक्तिमात्रास सुलभतेनें मिळवून देणारा व त्या हृदिस्थ परमात्म्याची अनन्यभक्ति करण्यास शिकविणारा असा भागवत हा ग्रंथ आहे. ग्रंथांतील प्रत्येक अध्याय, प्रत्येक श्लोक, प्रत्येक ओळ, किंबहुना प्रत्येक शब्द श्रीकृष्णभक्तीच्याच प्रतिपादनास लावलेला असा भागवतांतच आढळेल; इतरत्र कोठेंही आढळणार नाहीं. श्रीमद्भागवतांतील प्रत्येक पदामध्यें श्रीकृष्णपरमात्म्याचेंच नानातऱ्हांनीं गायन केलेलें आहे अशी अठरा पुराणांपैकीं भागवताच्या जोडीच्या पद्मपुराणाचीच साक्ष आहे.

पुराणेषु च सर्वेषु श्रीमद्भागवतं परम् ।
यत्र प्रतिपदं कृष्णो गीयते बहुधर्षिभिः ॥
( भागवत माहात्म्य ); पद्मपुराण, ६.१८९.३

व्यावहारिक आयुष्यामध्यें शांतता व समाधान प्राप्त होण्याकरितां जन्मल्यापासून मरेपर्यंत परमेश्वरभक्ति, कैवल्यसुख प्राप्त करून घेण्याचें उत्कृष्ट साधन म्हणून भगवंताची भक्ति व मोक्षाची प्राप्ति होऊन कैवल्यपदीं रममाण झाल्यानंतर देखील श्रीहरीची ' अहैतुक्यप्रतिता ' अशी निराकांक्ष भक्ति— याप्रमाणें सर्व काळीं, सर्व स्थलीं व सर्व अवस्थांमध्यें भगवद्भक्ति हाच येथून तेथून भागवताचा प्रतिपाद्य विषय आहे. या भागवतधर्मरूपी अमृतप्रपेभोंवतीं सर्वांनीं गोळा होऊन भक्तिसुधेचें आकंठ पान करावें म्हणून भागवतकारांनीं रमणीय, काव्यमय वाणीनें वाचकांना आळविलें आहे. निरनिराळ्या भक्तांच्या प्रेमळ कथा उदाहरणादाखल पुढें ठेविल्या आहेत व महन वेदान्ताचें उद्घाटन करून वेदान्ततत्वांसही आपला भागवतधर्म पूर्णपणें अनुकूलच आहे असें दाखविलें आहे. अशा तऱ्हेचें श्रीमद्भागवताचें अलौकिक स्वरूप आहे.

२. महाभारताची भूमिका अशा तऱ्हेची नसून ती बहुतांशीं व्यावहारिक आहे. लढाया, उलथापालथी, भांडणें, सभा, द्यूत, कारस्थानें वगैरे लौकिक गो-

र्षीचे तें भिन्न आहे. त्यांतही व्यासांनीं भगवद्गीतेमध्यें व शांतिपर्वांतील नारायणीय' आख्यानामध्यें भागवतधर्माचें प्रतिपादन केलें आहे; नाहीं असे नाहीं. परंतु हीं दोन्ही प्रकरणें म्हणजे महाभारताचा अंशमात्र होत आणि त्यांत देखील भागवत-धर्माचें व भक्तिमार्गाचें रहस्यच सर्वस्वीं सांगितलें नसून इतर अनेक विषयांचा समावेश त्याबरोबरच केला आहे. आणि हें प्रत्यक्ष व्यासांच्या भागवतांत दिले-ल्या कबुलीवरूनच सिद्ध होतें सर्वार्थपरिबृंहित असें भारत रचल्यानंतर देखील व्यासांच्या मनाची तळमळ शांत होईना. शेवटीं नारदाला त्यांनीं "सांग मनीं अप्रसन्न कां वा मी " असा प्रश्न केला. तेव्हां नारदांनीं त्यांना उत्तर दिलें --

" तुवां कांहीं ।
*प्राधान्यें श्रीभगवन्महिमा अद्यापि वर्णिला नाहीं ॥
वाखाणावें प्रेमें भगवद्यश मुनिवरा तुवां आतां ।
हृदय प्रसन्न होतें प्रभुचा महिमाचि आदरें गातां ॥ "

मं. भा. १. ६, ७.

यावरून असें दिसून येतें कीं, भगवच्चरित्राचें वर्णन व भागवतधर्म जो महा-भारतांत अगदीं थोड्याशा अंशानें वर्णिला होता तोच पूर्णांशानें व पृथक्रूपणें वर्णन करण्याची प्रेरणा व्यासांस नारदांनीं केली व त्या प्रेरणेचेंच फल म्हणजे व्यास-मुखांतून बाहेर पडलेलें हें भागवत होय. भारतांत व्यासांनीं जें थोडेंसें व अपुरें वर्णिलें होतें तेंच भागवतांत विस्तृतपणें वर्णन करण्याला नारदांनीं त्यांना सांगि-तलें. अर्थात् जो भागवतधर्म त्रोटकपणें भगवद्गीतेंत सांगितला होता तोच भाग-वतांत विस्तृतपणें व्यासांनीं सांगितला असें स्वतः भागवतकारांच्या म्हणण्या-प्रमाणें दिसतें. परंतु टिळकांच्या म्हणण्याप्रमाणें हें खरें नाहीं. ' भगवंतांनीं प्रवृत्त केलेला व गीतेंत आणि नारायणीय आख्यानांत उपदेशिलेला निष्कामकर्म-प्रधान भागवतधर्म तो मूळचा व प्राचीन धर्म होय. त्याची परंपरा पुढें लुप्त झाली. व " मूळ म्हणजे भारतांतील भागवतधर्मांत नैष्कर्म्याला [ निष्कामकर्माला ] जें

* येथील ' प्राधान्यें ' हा शब्द किंवा मूळ भागवतांतील याच अर्थाचा 'अनु-दितप्रायम् ' हा शब्द लक्षांत ठेवण्याजोगा आहे. त्यावरून भारतामध्यें थोडेंसें भगवद्यशोगान व्यासांनीं केलें होतेंच. पण तें मनाची शांति होण्यास पुरेसें नव्हतें असें सूचित होत आहे.

प्राधान्य होतें तें कालांतरानें कमी होऊन त्याऐवजीं भक्तीला जेव्हां प्राधान्य आलें तेव्हां या दुसऱ्या स्वरूपाचा ( म्हणजे भक्तिप्रधान ) भागवतधर्म प्रतिपादन करण्यासाठीं भागवतपुराण ही पुरणपोळी मागाहून बनविली." ( गीतारहस्य ५४० ) असें टिळकांचें म्हणणें आहे * तेव्हां त्यांच्या म्हणण्याप्रमाणें भागवतांतील भागवतधर्म हा भगवद्गीतेंतलि भागवतधर्मापेक्षां निराळा होय. अर्वाचीन विद्वन्मुकुटमणींचें हें मत कदाचित् खरें असेल पण आमच्या पूर्वीच्या संतमंडळींस ही विचाराची दिशा मान्य नव्हती असें म्हणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. भगवद्गीता व भागवत पुराण हीं एकाच धर्मांचीं प्रतिपादक आहेत असें त्यांस वाटे. श्रीज्ञानेश्वरांनीं महाराष्ट्रीय भागवत सांप्रदायाची स्थापना केली त्यांनीं आपल्या ज्ञानदेवींत भक्तिरसाचा किती उत्कर्ष केला आहे व भक्तिरसास पोषक असे ९ व १८ हे अध्याय लिहीत असतां त्यांच्या वाणीला कसें अलौकिक भरतें आलें आहे हें पाहणाऱ्यांस भगवद्गीतेचा भागवतधर्म भक्तिप्रधान भागवतधर्माहून ते निराळा मानीत असत अशी शंका देखील येण्याचें कारण नाहीं. श्रीज्ञानेश्वरांनीं जो भागवतसांप्रदाय स्थापन केला त्याच सांप्रदायांत एकनाथी भागवत हा ज्ञानेश्वरीइतकाच श्रेष्ठ प्रमाण ग्रंथ मानण्यांत येतो यावरून आमच्या प्राचीन संतमंडळींच्या परंपरेंत तरी गीता व भागवत हे दोन्ही ग्रंथ अगदीं बरोबरीच्या व सलगीच्या प्रेमभावानें अत्यंत उच्च स्थानीं अधिष्ठित झालेले होते हें स्पष्ट दिसून येईल.

३. भगवद्गीतेला शिरीं धरून भागवताला बाजूला टाकून धायचें ही प्रवृत्ति अगदीं अलीकडची आहे व अलीकडे सुद्धां पाश्चात्यशिक्षणविभूषित लोकांमध्येंच ती विशेष दिसून येते. अशी प्रवृत्ति होण्याचीं कारणें काय वगैरे विस्तार येथें करण्याची जरूरी नाहीं. येथें येवढेंच पुनः सांगावयाचें कीं ही प्रवृत्ति पूर्वी मुळींच नव्हती व अजून देखील जुन्या तऱ्हेच्या व कल्पनांच्या लोकांत ती आपल्यास आढळून येत नाहीं. भागवतपुराणाची पुरणपोळी मागाहून बनविली कां आधीं तयार झाली वगैरे विचक्षणा करण्याच्या भानगडींत पूर्वींचे संत व कवि पडत नसत त्या पुरणपोळीच्या सत्वस्थपणाला लोभून जाऊन तिच्यावर यथेच्छ ताव

* भागवत धर्माविषयीं व श्रीमद्भागवताविषयीं टिळकांचें म्हणणें काय आहे हें साकल्यानें जाणावयाचें असल्यास गीतारहस्य पृ. ९–११ व पृ. ५३५–५५३ ( विशेषतः ५३९–४० ) यांचें अवलोकन करावें.

कारण्याचा सपाटा मात्र त्यांनीं चालविला होता. व जुन्या काळचे सकस व जाडर भरडी ते असल्यामुळे तो पुराणपोळीचा आहार त्यांना उत्कृष्टपणें पचतही असे. बरोबर गीता व भागवत या दोन्ही भक्तिप्रधान ग्रंथांचा पूर्वीच्या संतांवर व वाङ्मयभक्तांवर इतका परिणाम झाला होता कीं समर्थ रामदास व त्यांच्या संप्रदायांतील ग्रंथकार वगळले असतां बाकीच्या सर्व महत्त्वाच्या कवींनीं गीता किंवा भागवत यांपैकीं एकावर तरी प्रामुख्यानें रचना केलेली दिसून येते. त्यांतही भागवताचें महत्त्व व त्याचा झालेला परिणाम हा कांकणभर जास्तच मानावा लागतो. कारण गीतेंत फक्त वेदान्त व भक्तियोग यांचें तात्त्विक रीतीचें प्रतिपादन येवढाच विषय आहे; परंतु भागवतांत या दोनही गोष्टी असून शिवाय भगवंताच्या व अनेक भगवद्भक्तांच्या रमणीय कथांचा समावेश त्यांत झाला असल्यानें तात्त्विक विचारांच्या गंभीर डोहांत अवगाहन करण्याची ज्यांस शक्ति किंवा इच्छा नव्हती त्यांनीं भगवत्कथांच्या सुलभ वाहत्या गंगेंत हात धुवून घेऊन भगवच्चिंतनाचें व यशोवर्णनाचें आपलें कार्य साधून घेतलें आहे.

सदा सेव्या सदा सेव्या श्रीमद्भागवती कथा ।
यस्याः श्रवणमात्रेण मुक्तिरत्नं समाश्रयेत् ॥
किं श्रुतैर्बहुभिः काव्यैः पुराणैश्च भ्रमावहैः ।
एकं भागवतं शास्त्रं मुक्तिदानेन गर्जति ॥

(श्रीभागवतमाहात्म्य); पद्मपुराण, ६ १९१.२७,३०.

अशी आमच्या पूर्वीच्या सर्व कवींची दृढ श्रद्धा होती. त्यांची ग्रंथरचना पाहिली तर आपणास असें दिसून येईल कीं भागवतांतील एकाद्या तरी प्रसंगावर किंवा एकाद्या तरी आख्यानावर बहुधा प्रत्येक कवीनें कविता केली आहे. मराठींतील भागवताच्या अवतारांचें विहंगावलोकन आपणास पुढें करावयाचेंच आहे त्यावरून अव्वलापासून अखेरपर्यंत मराठी वाङ्मयावर भागवताचा केवढा जबरदस्त पगडा बसलेला आहे हें सहज दिसून येईल. आमचें पूर्वीचें मराठी वाङ्मय सर्व भक्तिरसपरिप्लुत आहे. आणि भक्तिरसानें ओथंबलेल्या वाङ्मयाच्या रोमरोमीं भागवताची शिकवण भिनलेली असेल हें काय सांगावयास पाहिजे ?

४. इतर पुराणग्रंथांच्या तुलनेनें पाहिलें तरी देखील भागवताचें अलौकिकत्व स्पष्टपणें लक्षांत येतें. भागवत हें एक पुराण आहे. परंतु इतर पुराणग्रंथांतील गचाळ व भाकड मजकुराचा फारसा अंश भागवतांत दिसून येत

नाहीं. नानातऱ्हेचीं व्रतें, उद्यापनें, पूजा किंवा उपवास यांचीं अतिशयोक्तिपूर्ण वर्णनें; क्षेत्रांचें, नद्यांचें, मंत्रांचें, देवतांच्या कवचांचें वाहींच्या कांहींच माहात्म्य वर्णन करणाऱ्या कथा, यांनींच इतर पुराणांचा पुष्कळसा भाग व्यापलेला असतो. अनेक जन्म अघोर पापें केलेल्या गलत्कुष्ट चांडाळाचें केवळ यदृच्छेनें एखाद्या क्षेत्रीं जाणें होऊन तेथील शिवलिंगावरचा वारा त्याच्या अंगाला लागला किंवा बिल्वपत्राचा नुसता स्पर्श झाला कीं त्याचीं अनेकजन्मार्जित पापें धुवून जाऊन तो मुक्त होतो—अशा तऱ्हेच्या कथांनीं इतर पुराणें भरलेलीं असतात. अत्यंत निंद्य पातकें करून देखील केवळ भस्म लावल्यानें, किंवा मनाला पश्चात्ताप न होतां असाच कांहीं तांत्रिक विधि केल्यानें मनुष्य पापापासून मुक्त होतो व सायुज्यपदास जातो असें वर्णन करणें म्हणजे पातकें करण्याला एक प्रकारें प्रोत्साहन देणेंच होय. अशा कथा इतर पुराणांतून पुष्कळ आढळतात. परंतु भागवतांत अशा खऱ्या धर्माच्या दृष्टीनें आक्षेपार्ह कथा नाहींत, हाच त्याचा विशेष होय. 'देव भावाचा भुकेला' हें तत्व लक्षांत ठेवून निर्मळ अनन्य भक्तिभाव, खरें पुण्याचरण, यांचेंच महत्त्व रमणीय कथांच्या रूपानें वर्णन केलेलें वाचून येथें चित्त प्रसन्न होतें, शुचितर होतें व त्यांतील किल्बिषें जळून जातात. ध्रुव, प्रल्हाद, बलि, गजेंद्र यांच्या एकेक कथा म्हणजे मनुष्यास उच्च, उदात्त वातावरणांत घेऊन जाणारीं दिव्य विमानेंच होत. असो.

५. आपल्या प्राचीन वाङ्मयांतलि बहुतेक ग्रंथांप्रमाणें भागवताचाही रचनाकाल निर्णीत झालेला नाहीं. एच्. एच्. विल्सन या पाश्चात्य पंडिताचे मतें भागवत हें बोपदेवानें रचलें व बोपदेव हा इसवी सनाच्या चौदाव्या शतकांत झाला. अर्थात् भागवत चौदाव्या शतकांत लिहिलें गेलें! याच्या उलट भागवताचा उपसंहार लिहिणारे श्री यशवंत वेंकटेश कोल्हटकर यांचे मतें सध्याच्या स्वरूपांतल्या भागवताचा रचनाकाल ख्रिस्ती सनापूर्वी एकदोन शतकें तरी असला पाहिजे. पैकीं विल्सनचें म्हणणें आतां रद्द ठरलें आहे. त्याचे म्हणण्याप्रमाणें बोपदेव हा चौदाव्या शतकांत झाला नाहीं व त्यानें भागवत रचलेंहि नाहीं. कारण त्यानें स्वतः आपल्या ग्रंथांत भागवताचा पूज्य व प्रमाण ग्रंथ म्हणून उल्लेख केला आहे. पुराणनिरीक्षणकार त्र्यंबक गुरुनाथ काळे यांनीं पुराणांच्या वंशावळींतलि कैलकिल राजांच्या काळावरून पुराणांचें शेवटचें तिसरें संस्करण

इ. स ५००–६००च्या सुमारास झालें असें दाखवून दिलें आहे. भागवत पुराणांतील वंशावळीचा भाग ८ वें शतक अगर त्याहूनही नंतरच्या कालांत रचला असावा असा एफ्. ई. पार्जिटर नामक पाश्चात्य विद्वानाचा अभिप्राय आहे डिसेंबर १९२३ च्या विविधज्ञानविस्तारांत श्री. दाजी नागेश आपटे यांनीं भागवताचा रचनाकाल ९ वें शतक होय असें ठरविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचप्रमाणें श्री. चिंतामण विनायक उर्फ नानासाहेब वैद्य यांनींही नुकताच मद्रास येथे १९२४च्या नाताळांत भरलेल्या ओरिएण्टल कॉन्फरन्सकरितां 'भागवत पुराणाचा काल' या नांवाचा निबंध लिहिला असून तो रायल एशियाटिक सोसायटीच्या मुंबई शाखेच्या 'जर्नल'मधून प्रसिद्धही झालेला आहे. त्यांतील वैद्यांचीं प्रमाणें रा. आपटे यांच्या उपर्युक्त लेखांतील प्रमाणांशीं बरींच मिळतीं असून त्यांचा सिद्धान्तही भागवत हें इ. सनाच्या १०व्या शतकांत रचलें असलें पाहिजे असाच आहे. याप्रमाणें सर्व मतांचा गलबला आहे.

नवव्या दहाव्या शतकापर्यंत भागवताला ओढणारे श्री. वैद्य इत्यादि संशोधक यांचीं प्रमाणें निर्णायक व बिनतोड आहेत असें ह्मणवत नाहीं. भागवतांत बुद्धाची विष्णूच्या अवतारांमध्यें केलेली गणना, सांख्यतत्वांची त्यांत दिसून येत असलेली परिणति व खुद्द सांख्यमत प्रस्थापक कपिलाची विष्णूच्या अवतारांत केलेली गणना वगैरे प्रमाणें भागवताची अर्वाचीनता ठरविण्यासाठीं देण्यांत येत असतात शंकराचार्यांच्या ग्रंथांत भागवताचा उल्लेख नाहीं हें एक मोठें प्रमाण पुढें मांडण्यांत येत असतें. परंतु शंकराचार्यांच्या 'सर्वसिद्धांतसंग्रह' नांवाच्या ग्रंथामध्यें भागवताचा उल्लेख आहे असें दाखविण्यांत आलें आहे. खुद्द शंकराचार्यांच्या ग्रंथांत व त्यांच्या गुरूचे गुरु जे गौडपादाचार्य त्यांच्या ग्रंथांत भागवताचे आधार घेतलेले आहेत असें वैकुंठवासी गोपाळाचार्य अण्णा कराडकर यांनीं दाखवून दिलेले आहे. शंकराचार्यांचा काळ म्हणजे इ. स. ७०० च्या सुमारचा होय. त्यांच्या गुरूंचे गुरु गौडपादाचार्य यांचा काल निदान ६५० च्या सुमारचा तरी असला पाहिजे. त्यावेळेस भागवत ग्रंथ प्रमाण मानला जात होता. यावरून त्याच्यापूर्वी निदान शेंदोनशें वर्षे तरी भागवत झालेलें असलें पाहिजे. ही भागवताच्या काळाची अमर्दी अलीकडची मर्यादा होय, असें सध्यांच्या प्रमाणांवरून म्हणावेंसें वाटतें. हिच्यापूर्वी भागवत किती जाऊं शकतें हें अनिर्णीतच आहे. असो. भागवताच्या रचनाकालाचा प्रश्न येथें बराचसा अप्रस्तुत आहे; त्याचें वर केवळ स्थूलमानानें दिग्दर्शन केलें आहे.

६. रचनाकाल अत्यंत प्राचीन असो अथवा अगदीं अलीकडचा असो, ग्रंथाचें स्वयंभू महत्त्व त्यामुळें कमी होत नाहीं. गेल्या हजार-नऊशें वर्षांचा हिंदुसमाजाचा इतिहास अवलोकन केल्यास भागवताचें अलौकिक महत्त्व चटकन् ध्यानांत येईल. वेदकालीन यज्ञमार्गाला समाज केव्हांच पारखा झाला होता. ब्राह्मणेतर वर्णांचें द्विजत्व लोपून ते शूद्रसम बनूं लागले होते व 'कलावाद्यन्तयोः स्थितिः' अशी वस्तुस्थिति झाली होती. कर्ममार्ग दुरावला होता आणि श्रीशंकराचार्यांनीं प्रतिपादिलेला संन्यासमार्ग अति दुस्तर वाटत होता. सारांश, एक हजार वर्षांपूर्वी, प्रेममयतेनें सर्व समाजास एकीकृत करणारा व सर्वांचीं मनें आवर्जून घेणारा, सर्वांच्या अधिकारांतला, सर्वांस अनुसरण्यास सुलभ, अशा तऱ्हेचा परमार्थमार्ग हिंदुसमाजांत प्रचलित होण्याची जरूरी भासत होती. मुसलमानांचे हल्ले सुरू झाल्यानंतर तर धर्मरक्षणाकरितां अशा एकाद्या सर्वसामान्य तत्त्वाची अधिकच आवश्यकता उत्पन्न झाली. अशा स्थितींत भागवतधर्म व भक्तिमार्ग यांचें पुनरुज्जीवन होऊन त्यांच्यामुळे धर्मरक्षणाचें व समाजधारणेचें महत्कार्य सिद्धीस गेलें. हा जो भागवतधर्माचा प्रसार व जयजयकार आर्यावर्तभर झाला त्यास मुख्य कारण श्रीमद्भागवत हा ग्रंथ होय. भागवतधर्माच्या प्रसारार्थ निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळे पंथ निघाले; परंतु सर्वांची करणी व कार्य हीं मूलतः एकाच स्वरूपाचीं झालीं. मूळ सुरवात दक्षिणेंत झाली. द्रविड देशांत रामानुजाचार्यांनीं भक्तिमार्गाची वेदान्ताच्या पायावर स्थापना केली. तेराव्या शतकांत तुलव देशांत मध्वाचार्यांनीं वैष्णवमत प्रस्थापित केलें याच सुमारास ज्ञानेश्वर–नामदेवांनीं महाराष्ट्रांत भागवतधर्माचा पुकारा केला. पंधराव्या शतकांत वल्लभाचार्यांनीं केवळ भागवतावर आधारलेला पुष्टिसंप्रदाय गुर्जर देशांत प्रसृत केला. महाभगवद्भक्त मिराबाई राजपुतान्यांत 'गिरिधर' कृष्णाला आळवूं लागली, व चैतन्यदेवांनीं बंगाल्यांत कृष्णभक्तीचें चैतन्य ओतलें.

भागवतधर्माचें जें हें प्रेमसाम्राज्य दोनतीन शतकांत भरतखंडभर पसरलें त्याचा अधिराजा श्रीमद्भागवत हा ग्रंथ होय. प्रांतोप्रांतींचे निरनिराळे पंथ यांना (एक रामानुज खेरीजकरून) स्फूर्ति मुख्यतः, निदान बऱ्याच अंशीं तरी, भागवतापासून मिळाली होती. मध्वाचार्य व वल्लभाचार्य यांनीं उघड उघड भागवतावर ग्रंथ लिहून त्याविषयींचा आपला परमादर प्रकट केला आहे. महाराष्ट्रीय भागवतधर्मी संत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ इत्यादिकांवर भागवताचा किती दृढ परिणाम

झालेला आहे हें सांगण्याची जरूरी नाहीं. ज्ञानेश्वरांना भागवत माहीत नव्हतें असा शुष्क वाद कांहींनीं पूर्वी उपस्थित केला होता. परंतु खुद्द ज्ञानेश्वरीवर भागवताचा झालेला दृढ परिणाम ठिकठिकाणीं दिसून येतो असें पांगारकर यांनीं दाखवून दिलें आहे. याचप्रमाणें इतर प्रांतींही भागवतानें श्रीकृष्णभक्तीची पाखर घालून सर्वांस भक्तिमार्गरूपी राजरस्त्यास लावून सायुज्यपदाचें साध्य सुलभ करून दिलें.

७. हा जो भागवतधर्माचा महापूर येऊन गेला त्यांत महाराष्ट्रांतील भागवतधर्माचा इतिहास विशेष उज्ज्वल व स्पृहणीय झाला इतर कित्येक प्रांतांतल्याप्रमाणें त्यास येथें अमर्याद व नीतिदृष्ट्या अनुचित स्वरूप आलें नाहीं. ज्या परंपरेचा प्रारंभ श्रीज्ञानेश्वरासारख्या योगिश्रेष्ठ व परमभक्त महात्म्यापासून झाला त्या परंपरेंतील संत मंडळींमध्यें गैरवाजवी प्रकार शिरणें अशक्यच होतें. आणखी दुसरी गोष्ट म्हणजे इतर कांहीं ठिकाणांप्रमाणें येथील भागवतधर्माला संकुचित, सांप्रदायिक व आग्रहीपणाचें स्वरूप आलें नाहीं. महाराष्ट्रीय संतांनीं निराळें वेदान्तमत स्थापन करण्याचा आव कधीं घेतला नाहीं किंवा एकादे स्वामी अगर आचार्य स्थापन करण्याचा बडेजाव कधीं केला नाहीं. गीतेवरील व भागवतावरील अमुकच टीका प्रमाण, बाकीच्या सर्व अप्रमाण, अशा तऱ्हेचा आग्रहही कोणी धरला नाहीं. ज्ञानेश्वरीसारख्या ग्रंथास जी सर्वमान्यता प्राप्त झाली ती त्याच्या अतुलनीय योग्यतेमुळें आपोआप प्राप्त झाली. बाकी विचाराचें व मतप्रतिपादनाचें रान सर्वांस सारखेंच मोकळें होतें. याचें स्पष्ट दिग्दर्शन वामनपंडितांनीं यथार्थदीपिका लिहून ज्ञानेश्वरांस कित्येक ठिकाणीं विरोध केला यांत उत्कृष्ट रीतीनें दिसून येतें. आमच्या संतांच्या अशा उदार बुद्धीमुळें व जनहिततत्परतेमुळें महाराष्ट्र वाङ्मयास मोठाच फायदा झाला. संतपरंपरेंतून पुढें जरी वारकरी संप्रदाय परिणत झाला तरी वाङ्मयप्रांतांत विचारस्वातंत्र्याची पूर्ण मुभा असल्यामुळें परमेश्वरभक्तीचा खरा भागवतधर्म कोणत्याहि संप्रदायापुरता केव्हांच आकुंचित झाला नाहीं आणि त्यामुळें गीतेवर व भागवतावर नवी नवी सर्वांगसुंदर ग्रंथनिर्मिति व्हावयाचें कधींच बंद पडलें नाहीं. वारकरी संप्रदायानें गीतेची टीका ' ज्ञानेश्वरी ' व भागवताची टीका ' एकनाथी भागवत ' हे दोनहि प्रमाण ग्रंथ मानण्यास सुरुवात केल्यानंतर वारकरी संप्रदायांत गीतेवर व भागवतावर मुळींच टीका निर्माण

झाल्या नाहींत. परंतु वारकरी समाज म्हणजे अखिल भगवद्भक्तांच्या समाजाचा केवळ एक अंश होय. तेव्हां सांप्रदायाचे आणि परंपरेचे दृष्टीनें पुष्कळ अशीं हितकर असे निर्बंध वारकरी समाजास जरी लागू झाले तरी इतरांच्या विचारस्वातंत्र्यावर त्याचा कांहींच परिणाम झाला नाहीं. अर्थात् वारकरी संप्रदायाचे बाहेर सर्व समाजांत तळापर्यंत जाऊन पोंचलेला जो संप्रदायरहित व्यापक भागवतधर्म तो वाङ्मयदृष्ट्या वांझ राहिला नाहीं. तो ग्रंथरूपी फलपुष्पांच्या बहारानें डवरून जाऊन रसिक भक्तांस आनंद देण्यास कारणीभूत झाला. आपणास केवळ वाङ्मयाच्या दृष्टीनेंच सर्व भागवती अवतारांचें अवलोकन करावयाचें आहे. अर्थात् सांप्रदायिक, असांप्रदायिक, सर्वांसच येथें पाचारण आहे.

८. ज्ञानेश्वरमहाराजांनीं भागवतसंप्रदायाची स्थापना केली त्याच काळीं किंवा त्याच्यानंतर थोडेच दिवसांत भागवताच्या आधारें मराठींत विस्तृत रचना सुरू झाली असली पाहिजे. कारण अजमासें त्याच काळांतील दशमस्कंधावरील एक सर्वांगसुंदर टीका आजतागाईत उपलब्ध आहे. ज्ञानेश्वरांनीं ज्या काळीं भागवत धर्माची स्थापना केली तो काल म्हणजे एक प्रकारें पुनरुज्जीवनाचा ( Renascence ) काल होय. भगवद्भक्तीचें भांडार सर्वांस—लहानापासून थोरापर्यंत, ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत, सर्वांस— खुलें केल्याची द्वाही जेव्हां त्यांनीं आपल्या ग्रंथांच्या योगानें व सर्व जातींच्या साधुसंतांस बरोबर घेऊन ज्या तीर्थयात्रा त्यांनीं केल्या त्यांच्या योगानें सर्व महाराष्ट्रभर फिरविला, त्या वेळेस सर्वत्र मोठी जागृति होऊन भगवद्भक्तीच्या उमाळ्यानें व सात्विक प्रेमाच्या स्फूर्तीनें सर्व महाराष्ट्र हालून गेलें असलें पाहिजे. आणि खरोखर अशी स्थिति त्यावेळेस झाली होती, प्रेमळ भगवद्भक्तांच्या सात्त्विक नामस्मरणाच्या घोषानें सर्व महाराष्ट्र त्यावेळेस गरजून गेलें होतें, असेंच त्या काळची आपल्यास जी माहिती आहे व त्या कालचें जें कवित्व उपलब्ध आहे त्यावरून दिसून येतें. मग अशा वेळेस या सर्व प्रेमळ संत मंडळींच्या अलोट कृष्णभक्तीचा पायाच जो भागवत त्याकडे कित्येक संतकवींचें लक्ष गेल्याशिवाय राहणें कसें शक्य आहे ? त्यावेळेस जे कांहीं फुटकळ किंवा सविस्तर ग्रंथ निर्माण झाले त्यांपैकीं कांहीं कदाचित् लयाला गेले असतील. परंतु वर सांगितल्याप्रमाणें भागवताच्या दशमावरील एक गोड टीका आजतागायत उपलब्ध आहे. प्रस्तुत टीका बहिरंभट किंवा बहिरा पिसा उर्फ जातवेद नामक

आख्यानें केलेली आहे. ही अर्थात् ओंवीबद्ध असून हिची ओंवीसंख्या सुमारें पाऊण लक्ष आहे. ही टीका शके १३०० च्या सुमारास अस्तित्वांत असावी, असें श्री. विनायक लक्ष्मण भावे यांचें म्हणणें आहे. भावे यांनीं कृष्णजन्मप्रसंगींचा या ग्रंथांतला एक उतारा दिला आहे त्यावरूनच ही टीका किती प्रेमळ व रसाळ आहे तें दिसून येतें. या सविस्तर ग्रंथाशिवाय त्या वेळची संत मंडळी कृष्णचरित्रावर फुटकळ अभंग अनेकशः रचीत असतच. नामदेवाचे कृष्णलीलेवरील अभंग प्रसिद्धच आहेत. अशा प्रकारें फुटकळ रचलेली कृष्णचरित्रपर कविता भागवतापासून मिळालेल्या प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष स्फूर्तीचेंच फळ होय, असें म्हणण्यास कांहीं हरकत नाहीं.

९. यानंतरचा भागवताचा मराठींतील ठळक अवतार म्हणजे श्री एकनाथमहाराजांचा होय, ज्ञानेश्वर, नामदेव यांच्या कालापासून एकनाथांच्या कालापर्यंत साधारणपणें दोनशें किंवा थोडीं अधिक वर्षें होतात. मध्यें कोठें थांबायचें महत्वाचें ठिकाण न आढळतां एकदम एवढी मजल मारायची म्हणजे थोडेंसें कष्टाचेंच खरें परंतु त्याला कांहीं इलाज नाहीं. हीं दोन अडीचशें वर्षें म्हणजे मुसलमानांच्या धामधुमीचा काळ होय. या काळामध्यें कदाचित् वाङ्मयाची निपज अगदीं कमी झाली असेल. किंवा पुष्कळ झाली असूनही धामधुमीमुळें व छळामुळें नष्ट झाली असेल. सध्यां त्या कालांतील म्हणतां येईल असें फारसें वाङ्मय उपलब्ध नाहीं व उपलब्ध माहितीप्रमाणें भागवताचा कोणी अवतार त्या कालामध्यें होऊन गेला असावा असें दिसत नाहीं. * तेव्हां एकदम एकनाथांपर्यंतच आपणाला येऊन ठेपलें पाहिजे. एकनाथांचा दशमस्कंध अलीकडे नुकताच उपलब्ध झाला आहे तो पुष्कळांच्या पहाण्यांत नसेल, पण त्यांची एकादश स्कंधावरील टीका जगन्मान्य असून रुक्मिणीस्वयंवर, चतुःश्लोकी भागवत वगैरे ग्रंथहि प्रसिद्धच आहेत. एकनाथांच्या योग्यतेविषयीं व त्यांच्या वाणीच्या महिम्याविषयीं श्री

---

* पराडकरांच्या आवृत्तीमध्यें रा. पोतदार यांनीं मंत्रभागवताला जो उपोद्घात लिहिला आहे त्यांत पंधराव्या शतकांतील कवि विष्णुदास नामा याचा त्यांनीं भागवताचा अवतार म्हणून उल्लेख केला आहे (पृ. २). विष्णुदास नाम्यानें मराठींत भारत रचिलें आहे परंतु भागवतावर त्याची कांहीं विशेष रचना आहे असें उपलब्ध माहितीवरून दिसत नाहीं.

काय लिहावें ! भागवतधर्मीयांस, व सामान्यतः धार्मिक प्रवृत्तीच्या रसिकांस तर राहोच पण प्रत्यक्ष सुधारकांसही ज्यांच्या प्रांजळपणानें व निर्भीड भावानें वश करून घेतलें व ' एकनाथ हेही आमच्यापैकीच सुधारक होते ' असें म्हणावयास लावलें त्यांच्या वाणीच्या व चरित्राच्या प्रभावाची आणखी दुसरी कोणती खूण असणार ! The times produce the man; 'वेळ आली म्हणजे त्यावेळेस जरूर अशी व्यक्तिहि उत्पन्न होते' अशी इंग्रजीत म्हण आहे. नाथांच्या बाबतींत या म्हणीचीच सत्यता अनुभवास येते. परचक्राच्या संकटानें ग्रस्त झालेल्या महाराष्ट्रास व काळाच्या प्रातिकूल्यानें मलिन झालेल्या भागवतधर्मास एकीचे, समाधानाचे व निर्मळ कृष्णभक्तीचे धडे शिकविणाऱ्या प्रेमळ व शुद्ध भावाच्या शिक्षकाची जरूरी होती. ज्ञानेश्वरानीं गीतेला हातीं धरून भागवतसंप्रदायाची प्राणप्रतिष्ठा केली; व ती या भावनापूर्ण महाराष्ट्र देशांत लगेच दृढमूल झाली यांत संशय नाहीं. तथापि भागवत धर्माची उज्ज्वलता निर्मळ भावानें, प्रेमानें, कळवळलेल्या हृदयानें व सात्विक, प्रसादपूर्ण वाणीनें घोळून घोळून महाराष्ट्राच्या हृदयांत पूर्णपणें बिंबवणारा कोणी तरी पाहिजे होता व तो नाथांच्या रूपानें महाराष्ट्रास मिळाला. मूळ गीतेनें प्रतिपादिलेल्या भक्तियोगाचें जसें मूळ भागवतानें विस्तृत विवरण करून भक्तियोग पराकोटीला नेऊन पोंचविला त्याचप्रमाणें ज्ञानेश्वरांनीं प्रथम गीतेच्या आधारानें सुरू केलेल्या भक्तिसांप्रदायाला नाथांनीं भागवताच्याच आधारें ग्रंथरचना करून परिपूर्ण व सर्वांगसुंदर असें स्वरूप दिलें व त्याचा प्रसार महाराष्ट्राच्या कोनाकोपऱ्यापर्यंत केला ही एक अत्यंत समुचित अशीच गोष्ट महाराष्ट्रीयांच्या सुदैवानें घडून आली यांत शंका नाहीं. असो. नाथांचें भागवत ( एकादश स्कंध ) सुमारें वीस हजार म्हणजे मूळ भागवतीं एकादश स्कंधाच्या चौदा पट येईल व त्यांचे इतर भागवती ग्रंथही याप्रमाणेंच विस्तृत आहेत. नाथांचा काल म्हणजे शके १५०० च्या सुमाराचा किंवा किंचित अगोदरचा होय.

१०. नाथांनंतर नांव घ्यायचें म्हणजे मुक्तेश्वराचें. यानें भागवत लिहिलें आहे असा प्रवाद मात्र आहे. बाकी शुकरंभासंवादासारख्या एक दोन किरकोळ प्रकरणांशिवाय याची भागवती रचना कांहीं उपलब्ध नाहीं. परंतु मुक्तेश्वराचें नांव याप्रमाणें सोडून द्यावें लागलें तरी भागवतावर रचना करणारे इतर अनेक कवि व संत याच नाथोत्तर काळांत आपल्याला आढळतात. गीतेवर देखील अवाढव्य ग्रंथरचना करणारे दासोपंतासारखे थोर साहित्यवीर सोडून

काळांत होऊन गेले. ही सर्व ग्रंथरचनेस आलेली अलौकिक मराठी वाङ्मयीं म्हणजे नाथांच्या कृतीच्या व भागवतधर्मवृद्धीच्या कार्याचे खरे महत्त्व लक्षांत येतें. असो, नाथांनंतर व वामनपंडितांच्या अगोदर म्हणजे शके १५०० ते १६०० च्या दरम्यान भागवतावर मराठींत रचना करणारे पुष्कळच ग्रंथकार होऊन गेले. पैकीं बहुतेकांनीं दशमस्कंधावरच रचना केली आहे. जयरामस्वामी वडगांवकर ( शके १५२१–१५९४ ) यांनीं दशमस्कंध टीका ( ग्रंथसंख्या १०००० ) व रुक्मिणीस्वयंवर ( ग्रं. सं. ४००० ) असे दोन ग्रंथ लिहिले आहेत. वेदान्तविषय सोपा करून सांगण्याची व कथानक गोड करून सांगण्याची हातोटी यांना चांगली साधलेली आहे. सामराज नांवाचा एक अवाढव्य ग्रंथरचना करणारा भागवती कवि १५५० च्या थोडासा अगोदरच होऊन गेला. याची स्कंध २ व स्कंध १० यांवरील टीका उपलब्ध असून कांहीं फुटकळ आख्यानेंही आहेत. याच्या ग्रंथरचनेंत विशेष रमणीयत्व जरी नसलें तरी रचनावैपुल्याच्या दृष्टीनें हा कवि खरोखरच आदर करण्याजोगा आहे यांत शंका नाहीं. परंतु रचनावैपुल्याकरितां या एकाच कवीकडे आपल्याला बघितलें पाहिजे असें नाहीं. याच सुमारास होऊन गेलेल्या शिवकल्याणस्वामींची ( रचनाकाळ शके १५५०–६० ) दशमावरील टीका अतीव विस्तृत आहे. हिची ओवीसंख्या जवळ जवळ एक लक्ष असून हिचा मुख्य विशेष हा आहे कीं, सर्व कृष्णलीलांचा अर्थ परमार्थपर लावून, लीलांच्या मिषानें भगवंतांनीं अज्ञानी लोकांस निवृत्तिपर वेदांताचा कसा उपदेश केला हें त्यांत दाखवून दिलें आहे. अशा खुबीदार रीतीनें एक लक्ष ग्रंथरचना करणाऱ्याचें सामर्थ्य व बुद्धिमत्ता केवढी असेल ! हे शिवकल्याणस्वामी ज्ञानेश्वरादिक चारही भावंडें ज्या परंपरेंतील होतीं त्याच मच्छिंद्रनाथांच्या परंपरेंतील साधु होते. प्रत्यक्ष ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांशीं यांचा विशेष परिचय होता व त्यांची छायाही यांच्या ग्रंथांत पुष्कळच दिसून येते. याखेरीज दशकनिर्धार ( दशमावर आधारलेला ग्रंथ; रचनाकाळ १५५५ ) या ग्रंथाचा कर्ता रमावल्लभदास, वैद्यकजीवनकर्ता लोलिंबराज वगैरे कांहीं दशमस्कंधावर रचना करणारे कवि याच कालांत होऊन गेले.

११. ही सर्व सोळाव्या शतकांतील कवींची रचना ओवीबद्ध आहे. मराठीमध्ये ग्रंथरचना करण्यास सुरवात झाली त्या वेळेपासूनच ओवीछंदासही प्रारंभ झाला व आजपर्यंत एकसारखा ओवीचा प्रचार चालू आहे, हें जरी खरें असलें

तरी ओवीबद्ध रचना सोळाव्या शतकामध्यें उत्कर्षाच्या परमोच्च बिंदूला जाऊन पोंचली होती व सोळाव्या शतका अखेरीस ओवीला ओहोटी लागूं लागली हें मराठी कवितेच्या इतिहासाचें अवलोकन करणाऱ्याच्या ध्यानांत आल्यावांचून राहणार नाहीं.

१२. आतांपर्यंत अप्रतिहत रीतीनें चालू असलेल्या ओवीच्या सार्वत्रिक प्रचारास आळा घालण्याची प्रवृत्ति या सोळाव्या शतकाच्या अखेरीसच सुरू झाली. यमकानुप्रासांसहित अक्षरगणवृत्तांचा मराठींत प्रसार करून निदान वाङ्मयाच्या कांहीं प्रांतांपुरता तरी ओवीला परिणामकारक शह देणारे वामनपंडित या शतकाच्या अखेरीसच विद्यमान होते. अक्षरगणवृत्तें अगदीं प्रथम मराठींत आणण्याचा मान कोणासही असो, त्यांचा इतका झपाट्यानें प्रसार होण्यास वामनपंडितांची सुंदर श्लोकरचनाच कारणीभूत झाली. आणि ही सर्व श्लोकरचना बहुतांशीं भागवती आख्यानांवरच आहे ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. पंडितांनीं एकाद्या सबंध स्कंधावर रचना केलेली उपलब्ध नाहीं. परंतु भागवतांतील, विशेषतः कृष्णचरित्रामधील, लहान लहान आख्यानांवर केलेली श्लोकबद्धरचना मात्र उपलब्ध असून तीमुळेंच त्यांचें नांव अजरामर होऊन बसलें आहे. हीं फुटकळ आख्यानेंच इतकीं रमणीय व मोहक आहेत कीं त्यांमुळें जुन्या कवींपैकीं वामनपंडित हे एक अत्यंत लोकप्रिय कवि होऊन बसले आहेत व त्यामुळेंच भागवताच्या मराठी अवतारामध्यें फार महत्त्वाचें स्थान त्यांस देणें प्राप्त झालें आहे. यापुढें वामनांच्या लोकप्रियतेमुळें श्लोकरचनेचा चांगलाच पायंडा पडल्यासारखा झाला व अजूनही तो अगदींच मोडला आहे असें नाहीं. अक्षरगणवृत्तात्मक काव्यें आजकालही बरींच बाहेर पडतात. वामनपंडितांनंतर साम्राज्य वामन, अनंत, आनंदतनय वगैरेसारखे कांहीं श्लोकबद्ध आख्यानें रचणारे कवि झाले. प्रसंगोपात्त त्यांची कविताही चांगल्यापैकीं उतरली आहे.

१३. याप्रमाणें सतराव्या शतकाच्या प्रारंभापासून श्लोकरचनेस खरखरास सुरवात झाली. तथापि ओवी अगदीं मागें पडली असें नाहीं. श्लोकबद्धरचनेचा उपयोग वामनानें लहान लहान पौराणिक आख्यानांपुरताच केला होता व तेवढ्यापुरताच त्यांचा प्रसारही वामनाच्या पुढें चालू झाला. वाचकांचें मनोरंजन करण्याचाच प्रमुख हेतु असल्यामुळें जेथें बाह्यांग खुलविणें आवश्यक असेल अशा ठिकाणीं, म्हणजे केवळ लौकिक दृष्टीनें पौराणिक कथांवर रचलेलीं काव्यें वगैरे

मागल्या ग्रंथांतून, मुख्यत: श्लोकांचा उपयोग होऊं लागला. परंतु भाविक संतांचे ईश्वरचरित्रपर विस्तृत ग्रंथ किंवा परमार्थपर प्रबंध वगैरे सर्व अजूनही ओवीमध्येंच सरास लिहिले जात असत. व प्रत्यक्ष पंतकाळीं, किंवा त्यानंतर, किंबहुना आजकालच्या गद्याच्या काळांतसुद्धां ओवी अगदींच बंद पडली आहे असें नाहीं. वामनपंडितांनंतर सुमारें ५० वर्षांनीं रचली गेलेली कृष्णदयार्णवाची दशमस्कंधावरील प्रसिद्ध ' हरिवरदा ' नामक टीका ओवीबद्धच आहे. ही टीका फार विस्तृत म्हणजे सुमारें बेचाळीस हजार ओव्या आहे. व इतकें असून अतिशय सुंदर, रसाळ व मधुर आहे. कृष्णदयार्णवाप्रमाणेंच सर्व ओवीबद्ध ग्रंथरचना करणारा याच काळचा दुसरा अतिप्रसिद्ध कवि म्हणजे श्रीधरस्वामी हा होय. याचा भागवतावर आधारलेला ग्रंथ म्हणजे सुप्रसिद्ध ' हरिविजय ' हा होय. हा त्यानें शके १६२४ मध्यें लिहून पुरा केला. हा ग्रंथ म्हणजे सर्वस्वीं दशमस्कंधाची टीका नसून दशमस्कंधांतील कृष्णचरित्राला इतर कांहीं पौराणिक ग्रंथांतल्या कथांची पुरती जोडून सर्वांच्या मिश्रणानें तयार केलेलें एक सुंदर कथामृत आहे. श्रीधरांच्या अत्यंत सुगम, रसाळ व अर्थोत्कट वर्णनशैलीविषयीं येथें कांहीं विवेचन करण्याची जरूर नाहीं. त्यांचे हे गुण सर्वत्र प्रसिद्धच आहेत.

१४. यानंतर कालानुक्रमानें पाहिलें तर सुमारें ५० वर्षांची मजल मारून आर्यापति श्रीमयूरेश्वर यांच्या भव्य व मनोरम प्रासादांत आपल्यास प्रवेश करावयाचा. आपण जर ' सारज्ञ असूयोज्झित ' असूं तर विनयाची केवळ मूर्तीच असे पंत आपल्याला स्वत: ' नमस्कार ' करतील व त्यांची 'आर्या'ही आपलें यथोचित स्वागत करील यांत शंका नाहीं. आपणही या स्वागतासाठीं अधीर झालों आहोंतच; तथापि पुढच्या मार्गावर दृष्टि फेकून आणखी कांहीं उतरण्याचीं ठिकाणें उर्फ अवतार दिसतात कीं काय तें बघूं या. पंतांचे समकालीन ज्योतीपंत दादा म्हणून एक महाभागवत सद्गृहस्थ होऊन गेले. यांनीं सबंध भागवतावर दोन टीका केल्या आहेत. एक ओवीबद्ध असून दुसरी अभंगरचित आहे. या ज्योतीपंत दादांच्या नंतर पेशवाई संपेपर्यंत आणखी कोणी भागवताचा अवतार निपजला नाहीं. हा वेळपर्यंत भागवतावर रचलेले ग्रंथच इतके मुबलक व सर्वोत्कृष्ट होते कीं त्यांवरच भाविकांची व रसिकांची सर्व तहानभूक भागूं लागली. व अव्वल-ीच्या काळच्या प्रवृत्तीस अनुसरून यानंतरचे थोडीबहुत प्रतिभा असलेले कवि

लावण्या वगैरेच्या फंदांत पडूं लागल्यामुळें जुन्या पद्धतीचें निर्मळ पौराणिक वाङ्मय निर्माण होण्याचा मार्ग किंचित् खुंटल्यासारखाच झाला. यानंतर पेशवाईची इतिश्री होऊन खालसातीस सुरवात झाली व वाङ्मयनिर्मितीचें चक्र एकदम बंद पडल्यासारखें होऊन जिकडे तिकडे स्तब्धता व स्तिमितता पसरली.

१५. सुदैवानें ही स्तिमितता फार वेळ टिकली नाहीं. आपण अगदीं नादान व बेवकूब; म्हणण्यासारखें चांगलें असें आमच्यांत पूर्वी फारकरून झालेंच नाहीं; आमचा धर्म, आमचें वाङ्मय, आमच्या कला, आमचा इतिहास वगैरे सर्व टाकाऊ; आमच्या नालायकीच्या या खाणाखुणा पुसून टाकून कोरे करकरीत होऊन विलायती सुधारणेचा आमूलाग्र स्वीकार केल्याशिवाय आमचें डोकें वर निघणें शक्य नाहीं;— अशा तऱ्हेच्या कल्पना अव्वल इंग्रजींतल्या शिक्षित समाजाच्या मनांत सैराट वावरत होत्या. व बाकीचा सर्व समाज म्हणजे 'एक थंड गोळा होऊन पडला होता.' सुमारें पन्नास वर्षे अशी स्थिति टिकली. त्यानंतर बिथरलेल्या नवशिक्षितांस सणसणीत फटकारे लगावून ताळ्यावर आणणारे व मूर्छित समाजाच्या डोळ्यांत चरचरीत अंजनशलाका फिरवून त्यास जागृत करणारे विष्णुशास्त्रीबोवांसारखे धुरंधर पुरुष सुदैवानें आमच्यांत जन्मास आले. त्यांनीं आपलेपणाची व स्वाभिमानाची भावना उत्पन्न करून लोकांच्या विचारांस इष्ट दिशा लाविल्यामुळें आमचे भारत भागवतादि ग्रंथ मोठ्याच संकटांतून बचावले व आमच्या प्राचीन वाङ्मयाचा आर्यभूमींत कधीं काळीं लोप होईल कीं काय अशी घोर कुशंका येण्याजोगी जी परिस्थिति उत्पन्न झाली होती ती नाहींशी झाली. यानंतर अलीकडच्या कालास अनुसरून व्यासवाणीचें, विशेषतः भागवताचें, मराठी गद्यांत रूपांतर होण्याची आवश्यकता भासूं लागली. व एकदोन महत्त्वाचे भागवताचे गद्यावतारही उत्पन्न झाले यांपैकीं पहिला व अतिशय स्तुत्य प्रयत्न म्हटला म्हणजे रा. गणेश महादेव जानोरीकर यांनीं छापलेलें मूल व अन्वयसहित भागवताचें भाषांतर हा होय. हें भाषांतर वे. शा. सं. रा. गोविंदशास्त्री फडके यांनीं श्रीधरीला अनुसरून केलें असून मुळांतला अर्थ न सोडतां, अवश्य तर मुळाचा कोठें कोठें थोडासा विस्तार करून केलें आहे. योग्य मनुष्याकडून झालें असल्यानें हें फार सुंदर वठलें असून संस्कृतामध्यें ज्यांचा अगदींच जुजबी प्रवेश झाला आहे, अशांस फार उपयोगाचें आहे. हें शके १८१७ मध्यें प्रसिद्ध झालें. दुसरा स्तुत्य प्रयत्न म्हणजे

वा. वि. चिपळूणकर आणि मंडळी यांचा होय. यांचें 'श्रीमद्भागवताचें मराठी सुरस भाषांतर' प्रसिद्धच आहे. तें १८९५ सालीं प्रसिद्ध झालें. हें भाषांतर अनेकांनीं केलेलें असून चांगल्यापैकीं उतरलें आहे. तें आज सर्वत्र प्रचलित असल्यामुळें त्याच्याविषयीं विशेष लिहिण्याची जरूरी नाहीं.

१६. आतांपर्यंत भागवताच्या अवतारांबद्दल जें विवरण केलें त्यावरून मूळ भागवतावर आधारलेल्या जी मराठींत ग्रंथरचना झालेली आहे तिच्या इतिहासाची रूपरेषा स्थूलमानानें ध्यानांत येण्यास हरकत नाहीं. या सर्व भागवती अवतारांमध्यें मोरोपंतांचें स्थान फार महत्त्वाचें आहे. एक तर सबंध भागवतावर मराठींत ग्रंथरचना करणारे बहुधा तेच पहिले ग्रंथकार होत. शिवाय भाविकपणा व रसिकपणा या दोन गोष्टींचा अत्यंत उत्कृष्ट मिलाफ त्यांचे ठिकाणीं दिसून येत असल्यानें त्यांचे ग्रंथ भाविकांस व सहृदयांस सारखेच आवडणारे असे उतरले आहेत. वामनामध्यें हे सर्व गुण आहेत भगवद्भक्ति व काव्यसौंदर्य या दोनही गोष्टी त्यांजमध्यें असून प्रसंगविशेषीं पंतांपेक्षांही त्यांची वाणी प्रेमळ व नादसुंदर होत असेल. पण वामनांची रचना त्रुटित आहे. सबंध भागवताचा तर नाहींच पण नुसत्या दशमाचा देखील सामग्र्यानें परामर्श त्यांनीं घेतलेला नाहीं. एकनाथांची ग्रंथरचना केवळ वरच्या वातावरणांतली, प्रासादिक तऱ्हेची होय. त्यांच्या रचनेंत काव्य येत असलें तर तें 'ऋषीणां पुनराद्यानां वाचमर्थोऽनुधावति' अशा तऱ्हेनें त्यांच्या वाणीमागून धावत येणार. तेव्हां पंतांशीं त्यांची तुलना करतांच येत नाहीं. शिवाय त्यांच्या भागवतांत कथासूत्र नसून वेदांत व भक्ति यांचें विवरण असल्यानें प्राकृत सहृदयांस तें जरा जड असेंच वाटणार. नाथांनंतरचे जयरामस्वामी, शिवकल्याण, शामाराध्य वगैरे मंडळी घेतली तर त्यांच्यामध्यें भक्तिभाव व प्रसंगविशेषीं काव्यसौंदर्य दिसून येतें. पण या सर्वांचे ग्रंथ अतिविस्तृत; व भाषेच शैथिल्य व प्राचीनपणाही बराचसा नडविणारा असा दिसून येतो. कृष्णदयार्णवांचे ठिकाणीं भाविकपणा व रसिकपणा यांचा मिलाफ आढळून येतो व पुष्कळ ठिकाणीं काव्यही अप्रतिम आढळतें. परंतु एकसारखें चांगल्या दर्जाचें असें काव्य सर्वत्र आढळत नाहीं. शिवाय अतिविस्तार व पाल्हाळिकपणा यामुळेंही वाचक नाउमेद होण्याचा संभव विशेष. श्रीधरांचा हरिविजय उत्कृष्ट आहे. ग्रंथही प्रचंड नसून काव्यही उत्तमांतील. परंतु श्रीधरांचें लिहिणें रेखीव व टापटिपीचें नाहीं. रूपकें करूं लागले म्हणजे रूपकेंच, उत्प्रेक्षा

करूं लागले म्हणजे उत्प्रेक्षाच त्यांच्या ग्रंथांत पान पानभर आढळावयाच्या. तारतम्यभाव जरा कमी असल्यामुळें भलत्याच प्रसंगीं भलतेंच अतिशयोक्तिपूर्ण वर्णन यावयाचें. सौंदर्याचें वर्णन म्हटलें म्हणजे ठराविक अतिशयोक्तीच्या उपमा यावयाच्या, अरण्य आलें कीं ठराविक साच्याचें अरण्यशोभेचें वर्णन यावयाचें. कोणच्या प्रसंगास व कोणच्या स्थलास काय उचित होईल याचा विचार जरा कमीच. गोड गोष्टी सांगण्यांत मात्र श्रीधरांचा हातखंडा आहे. अशी स्थिति असल्यामुळें अज्ञान कथाप्रिय जनांस त्यांचें काव्य जितकें रुचतें तितकें सुसंस्कृत अभिरुचीच्या रसिकांस आवडण्यासारखें तें नाहीं. शिवाय त्यांनीं आपला ग्रंथ केवळ भागवताच्या आधारानें लिहिलेला नसून

दशम आणि हरिवंश । पद्मपुराणींच्या कथा विशेष ।
त्याचि हरिविजयीं सुरस । श्रोतीं सावकाश परिसावें ॥ हरिविजय ३४.१४.

याप्रमाणें भागवत दशम, हरिवंश आणि पद्मपुराण इतक्या ग्रंथांतील कथांचा उपयोग केल्याचें त्यांनीं स्वतःच सांगितलें आहे. तेव्हां भगवद्भक्तीच्या सात्विकपणानें युक्त असून काव्यदृष्टीनेंही उत्तम दर्जाचे, त्याचप्रमाणें आटोपशीर, रेखीव व तरतमभावयुक्त असे पंतांचे भागवतावरील ग्रंथ एकंदर भागवती वाङ्मयामध्यें अलौकिक होत यांत शंका नाहीं.

शिवाय पंतांची भाषासरणी अर्वाचीन तऱ्हेची असून अत्यंत शुद्ध असल्याकारणानें त्यांचे ग्रंथ आधुनिक रसिकांस व भाषाभिमान्यांस विशेष पसंत होण्याजोगे असें उतरले आहेत. विशेषतः त्यांच्या भागवती काव्यांमध्यें मुख्य जें मंत्रभागवत तें तर भाषेच्या, मांडणीच्या व काव्यकौशल्याच्या दृष्टीनें इतकें सुगम, इतकें आटोपशीर व रसाळ उतरलें आहे कीं मराठींतून भागवताचा आस्वाद ज्याला घ्यावयाचा आहे असा रसिक वाचक तेंच प्रथम पसंत करील. लहान लहान आख्यानेंच ज्यांना अधिक पसंत पडतात त्यांनाही पंतांचीं निरनिराळ्या वृत्तांत रचलेलीं चोवीस सुंदर भागवती प्रकरणें म्हणजे उत्कृष्ट मेवाच वाटेल यांत संशय नाहीं.

## विभाग २.

# पंतांच्या भागवती काव्यांचें बाह्यांगनिरीक्षण.

१. मागील विभागांत केलेल्या विवेचनावरून महाराष्ट्र भाषेंत श्रीमद्भागवतावर अवलंबून जी ग्रंथरचना झाली आहे तिच्यांत मोरोपंतांच्या रचनेचें स्थान कोठें आहे हें स्थूलमानानें लक्षांत येईल. आतां पंतांनीं भागवतावर एकंदर काय काय लिहिलें आहे तें आपण पाहूं व पंतांच्या समग्र काव्यसमूहांतला एक घटक या दृष्टीनें त्यांच्या भागवती रचनेचें बाह्यांगापुरतें निरीक्षण करूं. सबंध भागवतावर रचलेलें पंतांचें सुप्रसिद्ध काव्य ' मंत्रभागवत ' हें होय. फक्त दशमस्कंधावर म्हणजे श्रीकृष्णचरित्रावर रचलेला ' कृष्णविजय ' उर्फ ' बृहद्दशम ' हा पंतांचा दुसरा मोठा भागवतावरील ग्रंथ होय. मंत्रभागवताची एकंदर पद्यसंख्या ३६०४ असून कृष्णविजयाची ३६७५ आहे.* या दोन मोठ्या

---

* पंतांच्या हस्तलिखित पोथीबरहुकूम छापलेल्या मंत्रभागवताच्या पराडकरी प्रतींत मंत्रभागवताची पद्यसंख्या ३५९४ दिली आहे. परंतु हा आंकडा चूक असून मंत्रभागवताच्या एकुणएक पद्यांची बेरीज ३६०४ च होते. काव्यसंग्रहांत छापलेल्या मंत्रभागवताच्या पद्यांची बेरीज ३५९२ होते व पांगारकरांनी हीच संख्या प्रमाण धरून आपल्या ' मोरोपंत चरित्र आणि काव्यविवेचन ' या ग्रंथांत सर्वत्र दाखल केली आहे. पराडकरी प्रतींत दशमस्कंधाच्या आरंभीं १२ आर्यांचा जो उपोद्घात छापला आहे तो काव्यसंग्रह प्रतींत नसल्यामुळें त्यांची पद्यसंख्या साहजिकच ३६०४ – १२ = ३५९२ इतकी भरते. परंतु उपोद्घात उपसंहारांची कशीही उलट सुलट बेरीज वजाबाकी केली तरी पराडकरांनीं दिलेली ३५९४ ही संख्या प्राप्त होत नाहीं. छापखानेवाल्याच्या हातूनही ही चूक झालेली असणें शक्य नाहीं. तेव्हां ही चूक म्हणजे बेरीज करणाऱ्याच्या हातून निष्काळजीपणानें झालेला प्रमाद असला पाहिजे. कृष्णविजयाच्या बाबतींतही असाच अव्यवस्थितपणा नजरेस येतो. अगोदर कृष्णविजयाच्या एकंदर पद्यसंख्येचा आंकडाच कोठें दिलेला नाहीं. फक्त पूर्वार्धाची पद्यसंख्या व उत्तरार्धाची पद्य

काव्यांशिवाय भीष्मभक्तिभाग्य, वामनचरित्र, भक्तभूषण वगैरे भागवतांतील निरनिराळ्या लहान कथांवर लिहिलेलीं पंतांचीं २४ खंडकाव्यें असून त्यांची एकंदर पद्यसंख्या १९९२ आहे. याप्रमाणें पंतांच्या भागवती रचनेचा विस्तार असून या सर्व रचनेची पद्यसंख्या ९२७१ होते. पंतांचा उपलब्ध कवितासंग्रह सुमारें ५७००० आहे अशी पांगारकरांनीं मोजदाद केली आहे. तेव्हां पंतांच्या सर्व काव्यविस्ताराच्या मानानें त्यांची भागवती रचना एक-षष्ठांशापेक्षां किंचित् कमी इतकी भरते. हरिवंशासह महाभारतावर पंतांनीं केलेल्या काव्यरचनेची संख्या सुमारें २४००० भरेल; त्याचप्रमाणें रामायणा-वरील उपलब्ध रचना अंदाजें १६००० असावी. (पांगारकरांचा अंदाज. पहा, मो. च., पृ. १९१.) या मानानें पाहिलें असतां पंतांच्या भागवतावरील सर्व काव्यांची संख्या ९२७१ ही बरीच लहान आहे. हरिवंशाची आर्यासंख्या ५४४६ आहे. तेव्हां भागवती काव्यें व हरिवंश दोन्ही मिळून एकंदर श्रीकृष्णचरित्रावरील पंतांची रचना १४५७० इतकी, म्हणजे त्यांच्या एकंदर काव्यसंख्येच्या एकचतुर्थांश आहे असें दिसून येतें. असो.

२. समग्र श्रीमद्भागवताच्या आधारानें रचलेलें पंतांचें सुप्रसिद्ध काव्य 'मंत्र-भागवत' हें होय. त्याच्याकडे आपण प्रथम वळूं. यांत मुळांतील १ ते १२ स्कंध मराठींत संक्षेपानें उतरलेले असून मूळ भागवतांत एकंदर काय काय विषय आले आहेत याची कल्पना थोडक्यांत सर्वांस यावी अशी योजना केली आहे. मंत्रभागवतांत सर्वत्र ( दशमस्कंधाच्या शेवटचा उपसंहारात्मक १ श्लोक व सर्व भागवताच्या शेवटचे उपसंहाराचे ५ श्लोक खेरीज करून ) पंतांनीं आपलें आव-

---

संख्या अनुक्रमें १७१३ व १९५७ अशी दोन ठिकाणीं दिली आहे परंतु यांत निंदकपंचकाचे ५ श्लोक कोठेंच जमेस धरलेले नाहींत. निंदकपंचकाचे श्लोक कृष्णविजयांच्या पुस्तकांत जर छापले आहेत व अनुक्रमणिकेंतही जर त्यांचा उल्लेख केला आहे तर पद्यांची एकंदर बेरीज करतांनाच मात्र त्यांना कां वगळ-ण्यांत यावें हें समजत नाहीं. अशा रीतीनें प्रमाण म्हणून छापलेल्या या आवृत्तीच्या प्रत्येक खंडांत जर पद्यसंख्येचे आंकडे देतांना चुका होऊं लागल्या तर सर्व खंड छापून झाल्यावर पंतांच्या एकंदर कवितासंग्रहाची नकी मोजदाद करतांना आंकड्यांची चूक पुष्कळच मोठी होईल. प्रमाण म्हणून छापलेल्या आवृत्तींत असे प्रमाद रहावे ही शोचनीय गोष्ट होय.

सर्व आर्यावृत्त योजिलें असून आपला आवडता चित्रकाव्याचा प्रकारही त्यांनीं यांत आणला आहे. हा आवडता चित्रकाव्याचा प्रकार म्हणजे काव्यांतील पद्यांमध्यें विशिष्ट अक्षरांनीं कोणचा तरी एकादा पवित्र मंत्र साधणें हा होय. प्रस्तुत काव्यामध्यें ' नमो भगवते वासुदेवाय ' हा एकादशाक्षरी मंत्र सर्वत्र आर्यांच्या आद्याक्षरांनीं साधला असून त्या मंत्ररूपी सूत्रामध्यें ओवलेल्या सर्व मंत्रभागवताच्या पंतांनीं तीन माला कल्पिल्या आहेत.* पहिली माला एक ते नऊ स्कंधांपर्यंतची करून तिच्यामध्यें वरील मंत्र १३८ वेळां साधला आहे. दुसरी माला केवळ दशमस्कंधाचीच कल्पिली असून तिच्यांत १०८ वेळां मंत्राची आवृत्ति केली आहे. या दुसऱ्या मालेस ' भागवतमंत्रमुक्तामणिमाला ' अशा अन्वर्थक संज्ञेने पंतांनीं स्वतः संबोधिलें आहे.§ तिसरी माळ राहिलेल्या एकादश व द्वादश स्कंधांची बनविली असून त्यांत ७९ वेळां मंत्र साधला आहे. याशिवाय मंत्रभागवताच्या प्रारंभीं पंतांनीं मंगलाचरणाच्या ज्या ११ आर्या लिहिल्या आहेत त्यांमध्यें प्रत्येक आर्येंत नियमित स्थलीं सहा अक्षरें मंत्रांकित करून हाच मंत्र सहा वेळां साधला आहे. ' नमो भगवते वासुदेवाय ' या मंत्रांतील ' वा ' हें ७ वें अक्षर साधणारी सातवी आर्या येथें उतरून घेतों म्हणजे त्यावरून या प्रकाराची कल्पना येईल.--

वाग्देवीच्या नमितों बालक मी रम्यपादराजीवा ।
वारुनि जडत्व जी दे वात्सल्यें ज्ञान सादरा जीवा ॥ ७ ॥+

पंतांचीं मंत्रग्रथनलालसा येवढ्यानेंही पूर्ण झालेली नाहीं. दशमस्कंधाच्या आरंभीं जो १२ आर्यांचा उपोद्घात त्यांनीं लिहिला आहे त्यांतही ' श्रीमानुरुगायो

---

* माळात्रय प्रभुवरा रचलें; करानें ।
कंठीं पिता धरि दिलें निज लेंकरानें ॥ मं. भा.; उपसंहार १.
ऐसे साष्टशताच्छमंत्रमणि हे यांचीं असीं वोविली ।
माळा स्वच्छयशोगुणीं कविकरें अत्यादरें गोंविली ॥ मं. भा.; १०.११८९.

§ यश गाउनियां ज्याची करिति कवि व्यास शुक सदा सेवा ।
' भागवतमंत्रमुक्तामणिमाला' त्याचि वाहिली देवा ॥ मं.भा.;१०.११८८.

\+ अगदीं नेमल्या ठिकाणीं सहादां एक विशिष्ट अक्षर साधलें असूनही ही आर्या किती सोपी उतरली आहे इकडे वाचकांनीं लक्ष द्यावें.

मुकुंदो जयति ' हा मंत्र अष्टाक्षरांनीं साधला आहे. तेव्हां एकंदरींत पंतांच्या मंत्रभागवतांत ६ + १२८ + १ + १०८ + ७९ = ३२२ इतके मंत्र साधले आहेत असें झालें.

३. पंतांच्या मंत्रभागवताचें बाह्यस्वरूप, त्याची पद्यसंख्या व मुळाशीं तुलना करतां पंतकृतीच्या संक्षेपाचें आढळून येणारें प्रमाण वगैरे गोष्टी स्पष्टपणें ध्यानांत याव्या म्हणून कांहीं पद्यसंख्येचे आंकडे खालीं देतों.

| स्कंधानुक्रम. | मूळ भागवताची पद्यसंख्या. | मंत्रभागवताची पद्यसंख्या. | मं. भा. च्या एका आर्येशीं मूळ भागवताच्या श्लोकांचें पडणारें प्रमाण. |
|---|---|---|---|
| १ ... ... | ८१० ... | १२१ ... ... ... | १:७. |
| २ ... ... | ३९१ .... | १२१ ... ... ... | १:३ १/४. |
| ३ ... ... | १४११ ... | १३२ ... ... ... | १:११. |
| ४ ... ... | १४४५ ... | १७६ ... ... ... | १:८ १/५. |
| ५ ... ... | ६६८ ... | ६६ ... ... ... | १:१०. |
| ६ ... ... | ८'५१ ... | १९८ ... ... ... | १:४ १/३. |
| ७ ... ... | ७५० ... | १७६ ... ... ... | १:४ १/४. |
| ८ ... ... | ९२९ ... | १५४ ... ... ... | १:६. |
| ९ ... ... | ९५४ ... | ३७४ ... ... ... | १:२ १/२. |
| १० ( पूर्वार्ध ) | २०१२ ... | ६६० ... ... ... | १:३. |
| १० ( उत्तरार्ध ) | १९३४ ... | ५२८ ... ... ... | १:४. |
| ११ ... ... | १३६७ ... | ६४९ ... ... ... | १:२. |
| १२ ... ... | ५६६ ... | २२० ... ... ... | १:२ १/२. |
| स्कंध १-१२ | १३५२२ | ३५७५ | १:३ ३/४. |

( मंत्रभागवताची पद्यसंख्या — स्कंध १ ते १२ — ३५७५; ग्रंथारंभींचें मंगलाचरण — ११; दशमस्कंधाचा उपोद्घात — १२; दशम उपसंहार — १; समग्रग्रंथोपसंहार — ५. एकूण पद्यसंख्या ३६०४. )

या आंकड्यांच्या कोष्टकांत दोन तीन गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत. पैकीं पहिली म्हणजे मूळ श्रीमद्भागवताची श्लोकसंख्या १८००० आहे या सर्वसामान्य कल्पनेचें वैयर्थ्य ही होय. संस्कृतामध्यें श्लोक किंवा ग्रंथ याचा अर्थ ३२

आधारें असा होतो. तेव्हां कोणत्याही ग्रंथाची श्लोकसंख्या जेथें सांगितली असते तेथें ३२ अक्षरांचा एक श्लोक असें धरून त्या सबंध ग्रंथांत किती श्लोक भरतात त्याची गणती करून जितकी संख्या येईल तितकी सांगितलेली असते. पण आपण सामान्यत: मराठींत ग्रंथसंख्या किंवा श्लोकसंख्या म्हणजे पद्यांची संख्या येवढाच अर्थ घेतों. त्यामुळें आपण शार्दूलविक्रीडितालाही एकच श्लोक गणतों व अनुष्टुभालाही एकच श्लोक गणतों. मूळ संस्कृतांत असें नसल्यानें तेथें अनुष्टुभापेक्षां जास्त अक्षरांचीं वृत्तें आलीं असतां त्यांची अक्षरगणती करून ३२ अक्षरांस एक ग्रंथ याप्रमाणें ग्रंथसंख्या ठरवितात. अर्थात् अशा रीतीनें ग्रंथसंख्या ठरवल्यास ती १३५२२ या आंकड्यापेक्षां बरीच जास्त भरेल. कदाचित् १८००० ही भरण्याचा संभव आहे. हें मूळ भागवताच्या श्लोक संख्येविषयीं झालें. मंत्रभागवताची पद्यसंख्या ३५७९ आहे. म्हणजे मुळांतील पावणेचार पद्यांस पंतांची एक आर्या पडते, इतका पंतांनीं संक्षेप केला आहे. पंतांच्या मोठ्या काव्यांपैकीं प्रथम लिहिलेल्या मंत्ररामायणाची आर्यासंख्या १९१३ असून त्यामध्यें मूळ वाल्मीकिरामायणाचा संक्षेप बारांस एक या प्रमाणांत केला आहे. पंतांच्या आर्याभारतांत हेंच संक्षेपाचें प्रमाण पांचांस एक असें आहे त्यानंतर लिहिलेल्या मंत्रभागवतांत हें प्रमाण पावणेचारांस एक असें झालें आहे. यावरून उत्तरोत्तर पंतांची विस्ताराची प्रवृत्ति कशी वाढत चालली होती हें दिसून येतें.

४. पंतांनीं आपल्या परिणतावस्थेंत लिहिलेल्या मंत्रभागवतास सोडून ऐन उमेदीच्या व उत्साहाच्या भरांत लिहिलेल्या त्यांच्या कृष्णविजयाकडे आतां आपण वळूं. कृष्णविजय हें काव्य 'दिव्य कृष्णकथां'नीं भरलेल्या दशमस्कंधाच्या आधारें लिहिलें आहे दशमस्कंधाच्या ९० अध्यायांतील कथाभागाचें रूपांतर तसेंच अध्यायवार मराठींत केलें आहे; व पूर्वार्धाच्या म्हणजे ४९ व्या अध्यायाच्या शेवटीं ६ श्लोक उपसंहारात्मक लिहिले असून सर्व ग्रंथाच्या शेवटींही ५ श्लोकांचा उपसंहार जोडला आहे कृष्णविजयाची पद्यसंख्या साधारणपणें मंत्रभागवताएवढीच, म्हणजे ३६७० इतकी आहे. परंतु सारख्या पद्यसंख्येवरून हीं दोन्ही काव्यें सारख्याच आकाराचीं आहेत असा समज करून घेतल्यास तो चुकीचा होईल. मंत्रभागवत अथपासून इतिपर्यंत आर्यावृत्तांत ग्रथित केलेलें आहे. परंतु कृष्णविजयाच्या पहिल्या ५४ अध्यायांत आर्यागीतिवृत्त योजिलेलें असून पुढचे पंचवीस म्हणजे ५५–७९ अध्याय विविध श्लोकांत रचलेले आहेत, व शेवटचे ८० ते

९० नेहमींच्या आर्यावृत्तांत गुंफलेले आहेत. यांपैकीं आर्यागीतिवृत्त हें सामान्य मोरोपंती आर्येपेक्षां लांब वृत्त आहे; व श्लोकात्मक अध्यायांतील वृत्तें तर शार्दूलविक्रीडित, स्रग्धरा यांसारखीं फारच मोठमोठीं आहेत. तेव्हां पद्यसंख्या जरी सामान्यतः सारखीच असली तरी आंतील मजकुराच्या प्रमाणानें पाहिलें तर मंत्रभागवतापेक्षां कृष्णविजय हा दीडपटीनें मोठा ग्रंथ झाला आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. भागवत दशमस्कंधाच्या आधारानें संपूर्ण कृष्णचरित्रावर हा ग्रंथ लिहिला असल्यानें बाह्यतः जरी एकच ग्रंथ म्हणून याची गणना होत असली तरी याचें अंतःस्वरूप कांहीं निराळेंच आहे. एकसूत्रीपणाचा व एक धोरणाचा कृष्णविजयांत केवळ अभाव असून अत्यंत भिन्न स्वरूपाचे असे तीन चार विभाग त्यांत दिसून येतात. पहिला विभाग— अध्याय १–५४, आर्यागीतिवृत्तात्मक ( त्यांतही १–४९ व ५०–५४ असे आणखी पोटविभाग पडतात; ); दुसरा विभाग—अ० ५५–७९, विविध श्लोक वृत्तें; तिसरा विभाग – अ० ८०–९०, पंतांचें नेहमींचें आर्यावृत्त; याप्रमाणें भिन्न विभाग कृ. वि. मध्यें दिसून येतात. रचनाकालाविषयीं विचार करतांना याविषयींचें सविस्तर विवेचन होईलच.

५. आतां भागवतांतील कथांश घेऊन त्यांवर पंतांनीं जीं स्फुटकाव्यें लिहिलीं आहेत त्यांच्या स्वरूपाचें निरीक्षण करूं. हीं भागवती आख्यानें, त्यांची पद्यसंख्या, त्यांचीं वृत्तें, तीं मूळ भागवतांतील ज्या कथाभागांवर रचलेलीं आहेत त्यांचा स्थलनिर्देश, मुळाच्या तुलनेनें संकोच विस्ताराचें प्रमाण वगैरेंसह खालीं स्कंधानुक्रमानें दिलीं आहेत.

[ पंतांचीं जीं विविध श्लोकांत रचलेलीं आख्यानें आहेत त्यांत बहुधा त्यांनीं स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी वगैरे मोठीं वृत्तें योजिलीं आहेत. परंतु मुळांत बहुतेक अनुष्टुभ्, फार झालें तर उपजाति व वसंततिलका, हींच लहान वृत्तें आहेत. तेव्हां वृत्तांच्या लहानमोठेपणाचा विचार करून संकोच विस्ताराचें प्रमाण पुढील यादींत ठरवलें आहे. जेथें पंतांचें आर्या किंवा साकी वृत्त आहे तेथें मुळांतील श्लोक व पंतांचें पद्य हीं सामान्यतः बरोबरच धरलीं आहेत. ]

| १<br>आख्यानाचें नांव. | २<br>भागवतांतील कोणच्या अध्यायांवर रचलें त्यांचा स्थलनिर्देश. | ३<br>मूळ भागवतांतील श्लोकसंख्या. | ४<br>पंतकाव्याचें वृत्त व पद्य संख्या. | ५<br>विस्ताराचें अगर संक्षेपाचें प्रमाण. |
|---|---|---|---|---|
| १. नारदाभ्युदय | स्कंध. १; अ. ५-६. | ७९. | आर्या ४७. | संकोच ८:५. |
| २. भीष्मभक्तिभाग्य | स्कंध. १; अ. ९. | ४९. | आर्या. १९८. | विस्तार १:४. |
| ३. अवतारमाला | स्कंध. २; अ. ७. | ५३. | आर्या. ३१०. | विस्तार १:६. |
| ४. कालिगौरव | स्कंध. ३; अ. २५. | १. | श्लोक ६. | |
| ५. ध्रुवचरित्र | स्कं. ४; अ ८-१२. | २६६. | साक्या. १०७ | संकोच २½:१. |
| ६. ,, स्फुटार्या | स्कं. ४; अ. ८-९. | | आर्या. ६. | |
| ७. प्रल्हादचरित्र | स्कं. ७; अ. ८; श्लो. १८ | १. | आर्या. २०. | |
| ८. प्रल्हादविरचित भगवत्स्तुति | स्कं. ७; अ. ९ | ४८. | आर्या. १३५ | विस्तार १:३. |
| ९. अमृतमथन | स्कं. ८; अ. ५-९ | २१०. | आर्या. १५८ | संकोच ४:३. |
| १०. वामनचरित्र | स्कं. ८; अ. १५-२३. | ३३६. | आर्या. १९९ | संक्षेप ३:२. |
| ११. अंबरीषाख्यान | स्कं. ८; अ. ४-५. | ९८. | साक्या. ४० | संक्षेप २:१. |
| १२. भक्तभूषण | स्कं. ८; अ. ४-५. | ९८. | विविध ११० | विस्तार १:२. |
| १३. सुदामचरित्र | स्कं. १०; अ. ८०-८१ | ८६. | वि. श्लोक. ८५ | विस्तार १:२. |
| १४. पृथुकोपाख्यान | ,, ,, | ,, | साक्या. ८८ | मुळाबरोबर. |
| १५. सुदामकथेवरील स्फुट साक्या | ,, ,, | ,, | साक्या. ११ | |
| १६. रुक्मिणीहरणगीत | स्कं. १०; अ ८३.<br>,, ,, अ. ५३-५४ | २.<br>११७ | ओवी. १३१ | मुळाबरोबर. |
| १७. भस्मासुराख्यान ( गिरित्रमोक्ष ) | स्कं. १०; अ. ८८. | ३०. | विविध श्लोक. ४२ | विस्तार १:२. |
| १८. भृगुचरित्र | स्कं. १०; अ. ८९. | ६६. | विविध श्लोक ४७. | विस्तार १:१½. |
| १९. मंत्रमय भागवत दशमस्कंध. | | ३९४६ | आर्या. १०९. | अत्यंत संक्षेप. |

## कृष्णचरित्रपर परंतु स्वतंत्र अशीं आख्यानें.

| | | |
|---|---|---|
| २०. गोपीप्रेमोद्गार | स्कंध. १०; अ. ४७ मधील कांहींसा आधार. | आर्या. ११. |
| २१. गोपीगोडवा | | आर्या. ६९. |
| २२. नवदानकेली | ... ... | आर्या. ४८. |
| २३. मुरलीपंचक | ... ... | आर्या. ५. |
| २४. मुरलीनवरत्नमालिका | ... ... | आर्या. १०. |

एकंदर भागवती प्रकरणांची पद्यसंख्या १९९२.

वरील यादी पंतांच्या सर्व मुद्रित व अमुद्रित ग्रंथसंग्रहाचें आलोडन करून त्यावरून तयार केली आहे. तेव्हां ती पूर्ण आहे असें समजण्यास हरकत नाहीं. पंतवंशज रा. रामकृष्ण दत्तात्रेय पराडकर यांजजवळ असलेला पंतांचा हस्तलिखित काव्यसंग्रह प्रस्तुत लेखकास पाहावयास मिळाला. तथापि कांहीं थोडे कागदपत्र व पोथ्या त्यावेळीं त्यांजजवळ नसून पंढरपूर येथील पंतवंशजांकडे होत्या. त्या पोथ्या व चातुर्मास्ये बोवांच्या मठांतील ग्रंथसंग्रह प्रस्तुत लेखकास पहातां आला नाहीं. तथापि स्फुट काव्यें सर्व रामकृष्णपंत पराडकर यांनीं स्वतःजवळ गोळा केलीं असल्यानें त्यावरून केलेल्या या यादींत अपूर्णता राहण्याचा विशेष संभव दिसत नाहीं असें असलें तरी नजरचूक, किंवा अपुरी माहिती यामुळें होणारें स्खलन मनुष्यमात्राच्या मागें लागलेंच आहे, हेंही विसरतां येत नाहीं.

६. हरिभक्तिपरायण रा. पांगारकर यांनीं आपल्या मोरोपंत चरित्रांत भागवती प्रकरणांची जी याद दिली आहे ( मो. च., पृ. ३८५ ) तींत त्यांनीं १९ च प्रकरणें नमूद केलीं असून प्रल्हादचरित्र, प्रल्हादविरचित भगवत्स्तुति, सुदामकथेवरील स्फुट साक्या, रुक्मिणीगीत व भस्मासुराख्यान ( गिरित्रमोक्ष ) या पांच काव्यांचा निर्देश केलेला नाहीं. यांपैकीं प्रल्हादकृत स्तुति व सुदामकथेवरील साक्या यांचा पंतांच्या हस्तलिखित संग्रहांत शोध लागल्यावरून तीं या यादींत नमूद केलेलीं आहेत. तीं अजून अप्रसिद्धच आहेत. त्यांपैकीं प्रल्हादविरचित भगवत्स्तुति ही चातुर्मास्ये यांच्या अनन्यास असलेल्या बाडामधून अलीकडे मिळविण्यांत आली आहे असें कळतें.* तेव्हां ती पांगारकरांच्या नजरेस पडली असं-

* या स्तुतीची ही पोथी ( अनन्याहून आलेली ) परलिखित असून तिची पंतलिखित प्रत उपलब्ध नसावी असें वाटतें.

त्याचा संभव दिसत नाहीं या भगवत्स्तुतीची पोथी पांगारकरांच्या दृष्टीस पडणें संभवनीय नव्हतें असें मानलें तरी सुदामकथेवरील साक्यांसंबंधानें मात्र तसें म्हणतां येण्याजोगें नाहीं. या साक्या स्वतः पंतांच्या हस्ताक्षरांत उपलब्ध असून साकीबद्ध 'पृथुकोपाख्यान' पंतांनीं ज्या वहींत ठेवळ अक्षरांनीं लिहिलें आहे त्याच वहींत पृथुकोपाख्यान संपल्यानंतर या साक्या त्यांनीं लिहिलेल्या आहेत. अर्थात् पंतांचें सर्व दप्तर सूक्ष्मपणें नजरेखालीं घातलेल्या पांगारकरांच्या दृष्टींतून या सुटावयास नको होत्या असें वाटल्याखेरीज राहात नाहीं. या साक्या पुढें परिशिष्टांत पहिल्या प्रथमच छापल्या आहेत.

७. वरील दोन्हीं प्रकरणें अप्रसिद्ध तरी होतीं. परंतु प्रल्हादचरित्र, रुक्मिणीगीत व भस्मासुराख्यान यांच्या संबंधानें तीसुद्धां सबब सांपडण्याजोगी नाहीं. हीं तीन्ही काव्यें छापलेलीं असूनही पांगारकरांच्या भागवती प्रकरणांच्या यादींतून गळून जाण्यास कांहींसें विस्मरण व कांहींसा गैरसमज कारण झाला असावा असें वाटतें. प्रल्हादविजय हें वीस आर्यांचें काव्य काव्यसंग्रहांत छापलेलें असून § व त्याच्या पंतकर्तृत्वाविषयीं कांहीं संशय नसूनही तें ज्या अर्थी गळलें

§ काव्यसंग्रह ग्रंथ ४४; मोरोपंतकृत स्फुटकाव्यें भाग २ पृ. १९३–१९६. हें 'प्रल्हादविजय' उर्फ 'प्रल्हाद प्रकरण' पांगारकरांच्या दृष्टींतून कसें गळलें हें कांहीं समजत नाहीं. तथापि पांगारकर यांनीं त्याचा निर्देश केला नाहीं म्हणून तें आजपर्यंत अगदीं अप्रसिद्ध होतें असें समजण्याचें मुळीच कारण नाहीं. रा. रामचंद्र महादेव आठवले नामक एका लेखकांनीं गेल्या जुलै व आगष्टच्या विविधज्ञानविस्तारांत 'मोरोपंतांचीं स्फुट भागवती काव्यें' म्हणून लेख लिहिला आहे त्यांत जणूं काय 'प्रल्हादचरित' हें भागवती काव्य प्रथमच आपण लोकांच्या नजरेस आणीत आहों अशा रोखानें त्यांनीं मजकूर लिहिला असून तें काव्य सबंध उतरूनही घेतलें आहे. वर दर्शविल्याप्रमाणें तें काव्य काव्यसंग्रहांत भागवती प्रकरणांमध्येंच प्रसिद्ध झालेलें असल्यामुळें हा सर्व आयास करण्याची कांहीं जरूरी नव्हती. त्याचप्रमाणें पंतांचें भस्मासुराख्यान म्हणून प्रसिद्ध असलेलें प्रकरण ब्रह्मोत्तरखंडांतील नसून भागवतांतील आहे हें सिद्ध करण्याविषयीं त्यांनीं पुष्कळच खटाटोप केलेला दृष्टीस पडतो. परंतु रा. रामकृष्णपंत पराडकर यांनीं ही गोष्ट पूर्वींच दाखवून दिलेली आहे हें त्यांना माहीत असावेंसें दिसत नाहीं.

आहे त्या अर्थी विस्मरण हेंच त्याला कारण झालें असलें पाहिजे हें उघड आहे. रुक्मिणीगीताचा तर त्यांनीं ' सतीचीं गाणीं ' या सदराखालीं अन्यत्र उल्लेखही केला आहे. (मो. च. प्रकरण ११, 'ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर.' पृ. २१०–११.) तें भागवती काव्यांच्या यादींत पूर्णतेसाठीं समाविष्ट करावयास पाहिजे होतें. परंतु तसें करावयाचें विसरून राहून गेलें असें वाटतें. तिसरें भस्मासुरोपाख्यान गळण्याला मात्र विस्मरण कारण नसून गैरसमज कारणीभूत झालेला आहे. हें भस्मासुराख्यान भागवतांतलें नसून स्कंदपुराणांतर्गत ब्रह्मोत्तरखंडांतलें आहे अशी पांगारकरांनीं समजूत करून घेतली आहे; व तें पंतांच्या आरंभींच्या काव्यांपैकीं एक असावें अशी त्याबरोबर दुसरी समजूत करून घेऊन त्यांनीं ' ग्रंथकर्तृत्वाचा पहिला भर ' नांवाच्या आपल्या पुस्तकाच्या अकराव्या प्रकरणांत त्या काव्याचा परामर्श घेतला आहे. ( मो. च. पृ २०१–२०३ ). परंतु या दोन्ही समजुती रास्त नाहींत.

८. वस्तुतः या भस्मासुराख्यानाच्या बाबतींत सर्वांचाच घोटाळा झाला आहे. काव्यसंग्रहकारादिकांनीं व पांगारकरांनीं त्याला दिलेलें ' भस्मासुरा 'ख्यान हें नांवही बरोबर नसून गैरसमज उत्पन्न करणारें आहे. या काव्यांत भागवत दशमाच्या ८८ व्या अध्यायांत आलेली वृकासुराची कथा वर्णिली आहे. वृक नांवाच्या असुरानें एकदां नारदास गांठून ' सर्वांत लवकर प्रसन्न होणारा देव कोणता ? ' असें विचारलें असतां नारदांनीं शंकराचें नांव सांगितलें. तेव्हां वृकासुरानें केदारक्षेत्रीं जाऊन स्वशरीराचे अवयव हवन करून शंकराची घोर आराधना केली. शंकर प्रसन्न झाले व वर माग म्हणाले. ' ज्याच्या डोक्यावर मी हात ठेवीन तो प्राणी मरावा, ' असा त्यानें वर मागितला व शिवपत्नी पार्वती इचा अभिलाष धरून तो शिवाच्याच डोक्यावर हात ठेवण्यासाठीं त्याच्या पाठीस लागला. शंकर पळूं लागले व आश्रयार्थ वैकुंठीं गेले. तेव्हां श्रीनारायणानें बटूचें रूप धारण करून आपल्या गोड भाषणानें वृकासुराला मोहून टाकलें. ' त्या प्रेतपिशाचांच्या राजाचा वर खरा असणें शक्य नाहीं; तूं स्वतःच पाहिजे तर आपल्या मस्तकावर हात ठेवून प्रचीती पहा,' असें म्हणतांच त्या मूर्खानें आपल्या डोक्यावर हात ठेवून स्वतःचा नाश करून घेतला. अशी भागवतांतील कथा असून ती पंतांनीं मंत्रभागवतांत ( १०, १०६८–१०८९ ) व कृष्णविजयांत ( अ. ८८ ) यथास्थल वर्णिली आहे. व तीच कथा तंतोतंत या आख्यानांत पंतांनीं वर्णिली आहे. मूळ

भागवताच्या या अध्यायाला ' वृकमोक्षण ' असें नांव आहे. त्यांतच थोडासा फरक करून पंतांनीं आपल्या काव्याला ' गिरिशमोक्ष ' असें नांव हस्तलिखित प्रतींमध्यें दिलेलें आहे. तथापि आजपर्यंत सगळीकडे 'भस्मासुराख्यान' याच नांवानें त्याचा उल्लेख झालेला असल्यामुळें आम्हीं प्रत्यभिज्ञासौकर्यार्थ तेंच नांव येथें योजिलें आहे अजून पराडकरांच्या प्रमाण आवृत्तींतील स्फुट काव्यांचे खंड प्रसिद्ध व्हाव-याचे आहेत. ते प्रसिद्ध होण्याचा योग आल्यास या आख्यानाचें ' भस्मासुराख्यान' हें नांव काढून त्याला उचित असें व स्वतः ग्रंथकर्त्यानें योजलेलें ' गिरिशमोक्ष ' हें नांव यावें अशी त्या आवृत्तीच्या संपादकांस सूचना आहे.

परंतु हें आख्यान भागवतांतील आहे, ही गोष्ट कोणाच्याच लक्षांत आलेली नाहीं. काव्यसंग्रहकारांनीं आपल्या टीपेंत तसें स्पष्ट म्हटलेलें नाहीं. व पांगार-कर तर त्याला स्कंदपुराणांतील समजून भलतीकडेच त्याचा निर्देश करीत आहेत. ' हें ( आख्यान ) ब्रह्मोत्तरखंडांतूनच घेतलें आहे. ' असें ते स्पष्टच म्हण-तात. याच्यांतली कथा भागवतांतून घेतली आहे हें त्यांच्या गांवींही नाहीं. भस्मासुराच्या इतरत्र उपलब्ध असलेल्या कथेंत व प्रस्तुत आख्यानांत वर्णिलेल्या कथेंत फरक असल्याचें त्यांच्या लक्षांत आलें नाहीं असें मात्र नाहीं. इतरत्र विष्णूनें मोहिनीरूप घेऊन नाचतां नाचतां बेसावधपणानें त्या असुराला डोक्या-वर हात ठेवावयास लावलें असें वर्णन आहे तर येथें विष्णूनें बटुरूप घेतलें असल्याचें वर्णन आहे. हा महत्त्वाचा फरक पांगारकरांच्या लक्षांत येऊन त्यांनीं तो नमूदहि केला आहे. ( मो. च. पृ २०२ टीप १ ). खरोखर म्हटलें असतां या फरकावरून प्रस्तुत काव्याच्या मुळाविषयीं जास्त शोध करण्याची त्यांना बुद्धि व्हावी. परंतु तसें झालें नाहीं. कोणचेंही पौराणिक कथानक सांगतांना पंत अगदीं मुळाबरहुकूम वर्णन करतात. असें असतांना या ठिकाणीं मुळांतील महत्त्वाच्या प्रसंगांत पंतांनीं बदल कसा केला याबद्दल पंतकवितेशीं पूर्णपणें तन्मय झालेल्या पांगारकरांस तरी मोठें आश्चर्य व कौतूहल वाटावयास पाहिजे होतें; म्हणजे त्या कौतूहलानेंच त्यांना त्याच्या मुळाविषयीं जास्त शोध करण्यास प्रवृत्त केलें असतें. परंतु पंतकाव्याचा एवढा ठळक स्वभाव त्यांच्या लक्षांत राहूं नये व त्याच्याशीं विसंगत अशी गोष्ट दिसून आली असतांही तिच्याविषयीं शोध करण्याची प्रवृत्ति त्यांना होऊं नये हा मोठा विस्मयज-नक प्रकार झाला यांत संशय नाहीं.

परंतु यापेक्षांही विस्मयजनक प्रकार पुढेंच आहे ! भस्मासुराख्यान ब्रह्मोत्तरखंडांतून घेतलें असें पांगारकर म्हणताहेत. अर्थात् भस्मासुराची कथा ( विष्णूनें मोहिनीरूप घेतल्याची ) ब्रह्मोत्तरखंडांत आहे असेंच कोणासही वाटेल. परंतु खरा प्रकार असा आहे कीं भस्मासुराची कथा ब्रह्मोत्तरखंडात देखील मुळींच नाहीं, इतकेंच नव्हे तर तिच्याशीं कोणच्याही प्रकारचें साम्य असलेली कसलीही कथा ब्रह्मोत्तरखंडांत आलेली नाहीं ! कोणच्याही प्रकारचें भस्मासुराख्यान जर ब्रह्मोत्तरखंडांत मुळीं सांपडतच नाहीं तर पंतांनीं तें ब्रह्मोत्तरखंडांतून घेतलें असें विधान करणें म्हणजे एका असत्याच्या पायावर दुसऱ्या असत्याची इमारत उभी करणें होय.

इतकें शोचनीय स्खलन हातून घडून येण्याला पांगारकरांची अनेक बाबतींतली असावधानता कारणीभूत झालेली आहे. ब्रह्मोत्तरखंडांत भस्मासुराची कथा आहे असें विधान त्यांनीं केलें आहे यावरून तो ग्रंथ त्यांनीं मुळांत वाचला नव्हता हें तर उघडच दिसतें आहे. तथापि ते जर इतके बेसावध नसते तर मूळ ब्रह्मोत्तरखंड न वाचतांही आपली चूक त्यांना टाळतां आली असती. मूळ ब्रह्मोत्तरखंडाच्याच आधारानें पंतांनीं आपलें ‘ ब्रह्मोत्तरखंड ’ काव्य लिहिलें आहे. तें मुळाबरहुकूम २२ अध्यायांचेंच असून मूळांतलि गोष्टी त्यांनीं गाळलेल्या नाहींत. हें पंतांचें ब्रह्मोत्तरखंड अर्थात् पांगारकरांनीं पाहिलेलें असून भस्मासुराख्यानाच्या आधीं त्याला लागूनच मोरोपंतचरित्रांत त्यांनीं त्याचा परामर्शही घेतला आहे. ( मो. च. पृ १९५–२०१ ). या पंतकृत ब्रह्मोत्तरखंडांत भस्मासुराख्यान अर्थातच नाहीं, तेव्हां यावरून तरी मूळ ब्रह्मोत्तरखंडांत भस्मासुरकथा नाहीं, निदान नसावी, अशी कोणासही कल्पना आली असती. आतां पंतकृत ब्रह्मोत्तरखंडही पांगारकरांनीं साग्र वाचलें नसावें, असाही कोणाचा तर्क धावेल. परंतु आमच्या तर्काला आम्ही इतका पिटाळूं इच्छीत नाहीं.

पांगारकरांना बेसावधपणें पकडून अशा रीतीनें कोणी फसविलें हें समजून घेण्यासही फार दूर जावयास नको. त्यांना असें बेमालूम फसविणारा धूर्त म्हणजे श्रीधरांचा शिवलीलामृत ग्रंथ होय. ‘ मुळांत श्रीवेष घेतल्याचें वर्णन आहे. श्रीधरांनींही शिवलीलामृताच्या १२ व्या अध्यायांत भस्मासुराख्यान वर्णिलें आहे. त्यांत विष्णूनें मोहिनीरूप धरिलें असेंच आहे. ’ ( मो. च. पृ. २०२ टीप १ )

या टीपेवरून पांगारकर या भूतसाक्षीवर विश्वास ठेवून कसे फसले आहेत हें दिसून येतें. शिवलीलामृतामधील सांप्रदायिक भस्मासुराचा इतिहास सांगत आहे ही गोष्ट खरी; तथापि ती मुळाबरहुकूम हकीकत सांगण्यास अध्यायविभागांचा संगतवार नसून, आजूबाजूच्या पुष्कळ गोष्टी मिसळून ऐकणाऱ्यांना गोड वाटतील अशा कथा सांगणारा गोष्टीवेल्हाळ आहे, ही गोष्ट पांगारकरांच्या लक्षांत आली नाहीं. येथे पांगारकरांनीं श्रीधरस्वामींची रचनाशैली मुळींच लक्षांत घेतली नाहीं. पंत कोणत्याही ग्रंथाचा मुळाबरहुकूम तरजुमा उतरणारे कारकुनी बाण्याचे सारांशलेखक आहेत, तर श्रीधरस्वामी हे चोहोंकडच्या गोड गोड गोष्टी गोळा करून आणून एका ग्रंथांत वर्णन करणारे प्रथनकुशल कथाकार आहेत. पंतदेखील गोष्टी सुंदर सांगतात हें खरें; तथापि मुळांत असतील तेवढ्याच व तशाच सांगतात. परंतु पांगारकरांनीं पंतांच्या रचनेचें हें मर्म लक्षांत घेतलें नाहीं व श्रीधरस्वामींच्या रचनेचा स्वभावही त्यांस उमगला नाहीं. दोन्हीकडे ते फसले आहेत. श्रीधरस्वामींनीं शिवलीलामृतांत प्रारंभीं

श्रोतीं असावें सावचित्त । स्कंदपुराणीं बोलिला श्रीशुकतात ।

अगाध शिवलीलामृत ग्रंथ । ब्रह्मोत्तरखंड जें ॥ अ० १.३४.

याप्रमाणें ब्रह्मोत्तरखंडाचा आधारभूत ग्रंथ म्हणून उल्लेख केला आहे हें खरें; तथापि त्यांनीं त्यांत १२ व्या अध्यायाच्या मध्यापर्यंतच ब्रह्मोत्तरखंडांतील कथा वर्णिल्या आहेत; तेथपासून पुढें ग्रंथाच्या अंतापर्यंत इतर ठिकाणच्या मनोरम कथा आणून गोवल्या आहेत. भस्मासुराची कथा ही असल्या बाहेरून आणलेल्या कथांपैकीं पहिलीच होय.

९. याप्रमाणें स्वतः फसून आपल्या हजारों वाचकांसही पांगारकरांनीं आजपर्यंत या बाबतींत फसविलें आहे. पंतांच्या काव्यांवर शोधपूर्वक लिहिणारे एक लेखक रा. रा. म. आठवले हेही असेच फसले आहेत. पंतांचीं स्फुट भागवती काव्यें ( अर्थात् प्रसिद्ध झालेलीं ) १९ नसून २२ आहेत ही गोष्ट त्यांनीं विविधज्ञानविस्तारामधून ( जुलै १९२५ ) एका लेखाच्या द्वारें पुढें मांडली आहे. तथापि भस्मासुराख्यानाच्या बाबतींत पांगारकरांप्रमाणेंच त्यांची गैरसमजूत झालेली आहे. '( पंतांचें ) ब्रह्मोत्तरखंड हें स्कंदपुराणाच्या २३ ते ४४ या अध्यायांवरून रचिलेलें असल्याबद्दल वाद नाहीं, आणि त्यांत भस्मासुराची कथा आलेली आहे, ही गोष्टही खोटी नाहीं,' असें ते म्हणतात.परंतु ही गोष्ट खोटीच आहे असें ब्रह्मोत्तरखंड

कल्याल्यास त्यास दिसून येईल. सर्वात काव्यसंग्रहकार मात्र मोहनी व त्यांच दिसतात. त्यांना भस्मासुरकथेवर दोनतीनदां टीपा देण्याचा प्रसंग आलेला असून ती कथा नक्की कोठें आहे हें त्यांनीं लिहिलेलें नाहीं

१०. तर मग भस्मासुरनाशार्थ विष्णूनें मोहिनीरूप घेतल्याची कथा आहे तरी कोठें ? श्रीधरांनीं शिवलीलामृतांत ती वर्णिली आहे व इतरही तीच कथा विशेष प्रसिद्ध आहे. तेव्हां ती कोठल्या तरी पौराणिक ग्रंथांत आहे यांत शंकाच नाहीं. परंतु अद्याप प्रस्तुत लेखकास तिचा ठावठिकाणा लागला नाहीं एवढें खरें. भागवतांत अशा तऱ्हेची कथा नाहीं, स्कंदांतर्गत ब्रह्मोत्तरखंडांत नाहीं, पद्मपुराणांतही नाहीं. येवढींच पुराणें हाताशीं असलेलीं तपासून पाहतां आलीं. बाकीच्या पुराणांचें आलोडन करणें यासाठीं जरूर आहे.

अल्प महत्त्वाच्या विषयाचा हा बराच विस्तार झाला. मुद्याची गोष्ट येवढीच कीं भागवती प्रकरणें पांगारकरांनीं म्हटल्याप्रमाणें १९ नसून १४ आहेत व भस्मासुराख्यान नामक प्रकरण ब्रह्मोत्तरखंडांतून घेतलेलें नसून भागवतांतूनच घेतलें आहे; ब्रह्मोत्तरखंडांत भस्मासुराची कथाच मुळीं आलेली नाहीं.

येथें ही गोष्ट मात्र नमूद करून ठेवणें जरूर आहे कीं ' भस्मासुराख्यान ' या नांवानें प्रसिद्ध असलेलें प्रकरण ब्रह्मोत्तरखंडांतून घेतलेलें नसून भागवतांतूनच घेतलेलें आहे हें प्रथम दाखवून देण्याचें श्रेय प्रस्तुत लेखकाला, किंबहुना रा. म आठवले यांनाही नसून तें रा. रामकृष्णपंत पराडकर यांनाच आहे. पतलिखित पोथ्यांचा संग्रह तपासून पाहून त्यांनींच १ फेब्रुवारी १९१० च्या केसरींत हा शोध जाहीर केला होता.

११. या बाबतींत आम्ही वर जें विवेचन केलें आहे तें केवळ सत्याचें आविष्करण करण्याच्या उद्देशानेंच केलें आहे. छिद्रान्वेषीपणा करून पांगारकरांचें कांहीं तरी उणें दाखवावें असा त्यांत मुळींच हेतु नाहीं. समग्र पंतकवितेसारख्या अवाढव्य विषयाचें विवेचन करतांना प्रत्येक लहानसान बाब सुद्धां पडताळून पाहाणें व मुळापर्यंत तिचा ठाव घेणें शक्य नसतें. अर्थात् अशा समयीं अंदाजावरून केलेल्या विधानांपैकीं कांहीं क्षुल्लक विधानें दुरुस्त करावयास पाहिजेत असें दिसून आल्यास ग्रंथकार मोठ्या दोषास पात्र होतो असेंच केवळ आम्हांस वाटत नाहीं. त्यांतून महाराष्ट्रकवितेच्या, विशेषतः पंतकवितेच्या उद्धाराच्या बाबतींतलें पांगारकरांचें कर्तृत्व इतकें महनीय आहे कीं त्यांत असल्या नजरचुका म्हणजे क्षीर-

समुद्रांत मिठाची कणिका पडावी त्याप्रमाणें कोठच्या कोठें विरून जाणाऱ्या होत. पंतकवितेच्या अभ्यासकांना पांगारकरांचें साहाय्य केवळ बिनमोल होऊन राहिलें आहे हें तर काय परंतु आजोबाच्या खांद्यावर बसलेल्या नातवानें मला जास्त लांबचें दिसतें म्हणून फुशारकी मिरवावी त्याप्रमाणेंच पांगारकरांच्या नंतर त्यांच्यापेक्षां चारदोन अधिक गोष्टींचें प्रतिपादन करूं पाहणाऱ्या लेखकांची स्थिति होय. आणि ही गोष्ट लक्षांत घेऊन पितामहसदृश क्षमाशील वृत्तीनेंच स्वतः पांगारकरही प्रस्तुत लेखकाच्या कांहींशा निर्भीड व मोकळ्या मनाच्या उद्गारांकडे पहातील व त्यांत कांहीं ग्राह्य अंश आढळल्यास त्याचें कौतुक करतील असा भरंवसा आहे.



## विभाग ३.

# पंतांची भूमिका, उद्दिष्ट हेतु व काव्यरचनेचें धोरण.

१. मागील विभागांत केलेल्या विवरणावरून पंतांच्या भागवती काव्यांचें बाह्यस्वरूप, त्यांचा विस्तार वगैरे गोष्टींची वाचकांस यथार्थ कल्पना येईल असें वाटतें. आतां त्यांच्या काव्यांचें अंतरंगनिरीक्षण करण्यास आरंभ करूं. काव्य लिहितांना पंतांची भूमिका व धोरण कशाप्रकारचें असे याचा प्रथम साकल्यानें आढावा घेऊं व नंतर पंतांचें भागवतावरील सर्व काव्य सूक्ष्म दृष्टीनें न्याहाळून पाहून त्यांतील दिव्य काव्यानंदाचा अनुभव घेऊं.

२. प्रारंभींच पंतांच्या काव्यांमध्यें सर्वत्र दिसून येणारा ठळक गुण म्हणजे विस्तरभीरुता हा होय या विस्तरभीरुत्वाबद्दल थोडेसें लिहिणें अवश्य आहे. पंतांचा काव्यविस्तार फारच प्रचंड आहे असा एक अस्फुट समज क्वचित् प्रचलित असलेला आढळतो. पंतांची एकंदर कविता तीन लाखांवर आहे, असा लोकांमध्यें रूढ असलेला एक समज निबंधमालेंत नमूद झालेला आहे. या, पंतांचा काव्यसमुद्र केवळ अफाट आहे अशा तऱ्हेच्या समजावरूनच पंत हे मोठे पाल्हाळिक व लांबच लांब भारुडें रचणारे कवि आहेत अशीही कित्येकांची कल्पना झाल्याचें आढळतें. वस्तुतः या दोन्ही कल्पना अगदीं निराधार आहेत. आतां जन्मभर एकसारखीं काव्यें लिहून त्यांची संकलित आवृत्ति प्रसिद्ध करण्याचा मोठ्या महोत्सवाचा प्रसंग एकदांचा आला असतांना लेखकाचे 'दोन शब्द', प्रस्तावना, उपोद्घात, चरित्र वगैरे गोष्टींची भरती करूनसुद्धां शेंदोनशें पृष्ठांच्या पलीकडे ज्यांच्या एकीकृत काव्यांची मजल जाऊं शकत नाहीं अशांना पंतांचा काव्यविस्तार कल्पनेपलीकडे अफाट वाटेल; पंचवीसतीस ओळींचे छोटेंसें, नाजूक व आटोपशीर काव्य निर्माण केल्यानंतर सर्व पाणी गळून गेलेल्या फुटक्या तपेलीप्रमाणें ज्यांना आपलें प्रतिभेचें भांडार सर्वस्वीं रिक्त झालेलें आढळतें अशा प्रतिभासंपन्न कवींना किंवा आपल्या आवडत्या कवीची एक पानभर कविता वाचल्यानंतर ज्यांच्या मेंदूला श्रम होऊन जरा हायशी विश्रांति घ्यावीशी वाटते

अशा रसिकांना पंतांचीं काव्यें म्हणजे असह्य भारुडें वाटतील यांत संशय नाहीं. परंतु अशा कवींचें व रसिकांचें माप पंतांना लावून काय उपयोग ! पंतांची आखिरी कवितासुता धडधाकट, सधाक व उफाळ्याची असून पित्यानें ज्याला आपलें समर्पण केलें त्या परमेश्वररूपी वराकडे जाण्यास अत्यंत उत्सुक अशी होती. कितीही प्रावरणें घातलीं तरी रोडच दिसणाऱ्या अशा प्राकृत रसिकांकडे जाणाऱ्या कविकन्यकांशीं तिची तुलना करतांच येत नाहीं. पंतांसारखेच जे भक्त, परमेश्वरप्रेमांत रंगून जाणारे व आपल्या कविताकन्यका श्रीकृष्णचरणींच अर्पण करणारे कवि आपल्यांत होऊन गेले त्यांच्याशींच पंतांची तुलना करणें योग्य; आणि अशी तुलना करून पाहिली म्हणजे आटोपशीरपणा, पाल्हाळाचा तिटकारा वगैरे पंतकवितेचे विशेष आपल्यास सहजच आढ-ळून येतात. कृष्णदयार्णवांची हरिवरदा पहा, एकनाथांचा एकादशस्कंध पहा, मुक्तेश्वरांचें आदिपर्व पहा किंवा पंडितांचीं भागवती आख्यानें पहा, पंतांच्या इतका संक्षेप व टापटीप आपणांस कोठें आढळावयाची नाहीं. नुसत्या पद्यसंख्येवरून पाहिलें तरी हीच गोष्ट लक्षांत येईल. कृष्णविजय हा ग्रंथ पंतांच्या सर्व काव्यांमध्यें मुळाशीं तुलना करतां जास्त विस्तृत आहे असें दिसून येतें. मूळ भागवत दशमस्कंधाची श्लोकसंख्या ३९४६ आहे. व कृष्ण-विजयाची त्याच्या जवळ जवळ म्हणजे ३६७० आहे. पण याच दशमावर रचलेल्या इतर मराठी काव्यांची पद्यसंख्या पहा. बहिरा-जातवेद याच्या दशमाची संख्या ७५०००, शिवकल्याणाची एक लाख, कृष्णदयार्णवाची हरिवरदा ४२०००, याप्रमाणें इतर टीकांचा विस्तार आहे ! एकादशस्कंध मूळ याची ग्रंथ-संख्या १३६७ आहे. व पंतांची सुमारें त्याच्या निम्मे म्हणजे ६४९ आहे. पण एक-नाथी भागवत म्हणजे १९००० ओवी आहे. आतां पंतांच्या एकंदर काव्यसमु-दायाची संख्या सुमारें ६०००० भरते. व हा आंकडा दिसण्याला थोडा जास्त दिसतो हें खरें, पण त्याचें कारण म्हणजे पंतांचा जबरदस्त उद्योग व सर्वव्यापी-पणा हें होय. समग्र महाभारत, समग्र भागवत मराठींत आणून रामायणाचा एकदों आठ वेळां अनुवाद करणारा हा एकच एक कवि होय ! त्यांनीं साठ हजार कविता लिहिली यांत त्यांच्या रचनावैपुल्याची विशेष तारीफ करावयाची नसून संस्कृतांतलें येवढें अगडव्याळ वाङ्मय ते इतक्या थोडक्यांत मराठींत आणूं शकले या गोष्टींत दिसून येणाऱ्या त्यांच्या संक्षेपचातुरीची व सरकारीच अवश्य

प्रशंसा केली पाहिजे. इतर जे एकनाथ,कृष्णदयार्णव, वगैरे विस्तारशील कवि आहेत त्यांनीं दशमस्कंधासारखा मुळांत आटोपशीर असा ग्रंथ घेऊन त्याचा वाटेल तसा विस्तार केला आहे; पण पंतांनीं मुळांतील प्रचंड ग्रंथ अत्यंत संकुचित अवकाशांत कोंचून त्यांच्या बरोबर उलट कामगिरी करून दाखविली आहे.

३. आतां तूं नाहीं तर तुझ्या बापानें हा न्याय स्वीकारून यथाकथंचित् ज्यांना प्राचीन कवींवर कसल्या तरी दोषाचें टेपर ठेवावयाचें आहे त्यांना निदान येवढें तरी समाधान होईल कीं पंत नाहींत तर नसोत परंतु एकनाथ, कृष्णदयार्णव, शिवकल्याण वगैरे मंडळी तरी पाल्हाळाच्या व कंटाळवाण्या विस्ताराच्या दोषाला पात्र होतीलच. अशा रीतीनें ज्यांचें समाधान होत असेल त्यांचें खुशाल होवो. आमच्या कवींच्या वाग्विस्तारांत, त्या भक्तिरसाच्या महापुरांत निमग्न करून आनंदनिर्भर होण्याचें भाग्य थोडें तरी ज्याला लाधलें आहे त्याला असें समाधान करून घेण्याची जरूर वाटत नाहीं. आमचे कवि भक्तिरसानें तल्लीन होऊन गेले म्हणजे त्यांना आपण किती विस्तार करीत आहों व कोठवर वहात जात आहों याचें भान रहात नसे व वाचकांनाही तसें भान रहात नाहीं.

प्रेमें गाइन युष्मदद्भुत यशें नाचेन युष्मज्जनीं ।

अशा निर्मळ आकांक्षेनें प्रवृत्त झालेल्या आमच्या कवींना तें परमेश्वराचें अद्भुत यश ' गाइलें तरि पुन्हां गावें चि ' असें सतत वाटत असे ! नाथांना मुळांत १३६७ श्लोक असलेल्या अकराव्या स्कंधाचा वीस हजार ओव्यांइतका विस्तार करतांना मुळींच कंटाळा आला नाहीं. उद्धवास सांगितलेल्या भक्तियोगाचें वर्णन किती करूं व किती न करूं असें त्यांना झालें. चोविसाव्या अध्यायांत चवदाव्या श्लोकांतील ' भक्तियोगस्य मद्गतिः ' या पदाचें विवरण करतांना नाथांच्या वाणीस जें भरतें आलें आहे तें कांहीं अनिवारच ! या दोन पदांवर नाथांनीं एकंदर २५२ ओव्या भाष्य लिहिलें आहे. श्रोत्यांना कदाचित् हें फार वाढविलें असें वाटेल अशी शंका येऊन ते श्रोत्यांना बजावतात व त्यांची क्षमाही मागतात.—

भक्तियोगस्य मद्गती । हे मूळपदींची स्थिती ।
तेंचि तें वाढविलें किती । ऐसें श्रोतीं न म्हणावें ॥ ४१९ ॥
मद्गती या पदाची व्युत्पत्ती । कोण आहे जाणे किती ।

हे रहस्य आले विरळा हितीं । यालागीं क्षमा श्रोतीं करावी ॥४२७॥

पुढें थोड्याच अवकाशानें ह्याच भक्तिभावाच्या उमाळ्याचें वर्णन करतात.

निज आवडी वाडें कोडें । वानितां भक्तीचे पवाडे ।
तुज नाठवे मागेंपुढें । हें प्रेम गाढें जाणवलें ॥ ४३८ ॥
जंव जंव भक्तीचें निरूपण । अधिकाधिक वाढतां जाण ।
तंव तंव येतसे स्फुरण । तेथ कोण पुरे म्हणेल ॥ ४३९ ॥
जंव जंव निरूपणाची वाढी । तंव तंव भक्तीची अधिक गोडी ।
तेणें श्रोत्यांची आवडी । चढोवढी वाढली ॥ ४४० ॥
करितां भक्तिसुख निरूपण । श्रोते वक्ते लांचावले जाण ।
होतां अमृताची आरोगण । पुरे कोण म्हणों शके ॥ ४४१ ॥ अध्याय२४

अशाच तऱ्हेनें कृष्णभक्तीच्या लोंढ्यांत वाहवत गेल्याकारणानें बहुतेक भागवतावर लिहिणाऱ्या कवींचे ग्रंथ विलक्षण वाढले आहेत. पंतांना देखील अशा तऱ्हेचा भक्तीचा उमाळा कमी येत असे असें नाहीं.

वाढेल ग्रंथ म्हणुनि आवरितों मी बळेंचि रसनेला ।
परि म्यां भागवतवरें भागवतांतलि फार रस नेला ॥ मं. भा. १०.४२८

अशी अभिमानगर्भ कबुली पंतांनीं दशमांतलि प्रेममय कृष्णकथा वर्णन करतांना दिली आहेच. तथापि पंत मोठे टापटिपीचे व आवरशक्तीचे गृहस्थ होते. त्यांनीं आपल्या भागवती काव्यांत किंवा इतरत्र कोठेंही स्वतः योजून ठेवलेल्या प्रमाणाबाहेर विस्तार होऊं दिलेला नाहीं. पंतांनीं काव्यें पुष्कळच केलीं; पण बहुधा प्रत्येक ठिकाणीं

'स्वल्पांतचि आणितों कथा सारी'

ही भारतरचनेच्या वेळीं केलेली प्रतिज्ञा त्यांनीं अमलांत आणून दाखविली आहे. तेव्हां आटोपशीरपणा व विस्तरभीरुत्व हा पंतांच्या सर्वच काव्यांचा मोठा विशेष होय.

४. आतां भागवती काव्यें लिहितांना पंतांनीं कोणच्या तऱ्हेची भूमिका स्वीकारली होती व एकंदर कशा तऱ्हेचें धोरण डोळ्यांपुढें ठेवलें होतें, हें आपण थोडेंसें पाहूं. वर्ण्यविषय एकच असला तरी उद्दिष्ट, धोरण व प्रतिपादनशैली हीं भिन्न असल्यानें ग्रंथांत किंवा काव्यांत अतोनात फरक पडूं शकतो. महाभारताच्या वनपर्वांत ३० ते ४२ अध्यायांमध्यें अर्जुनास पाशुपतास्त्र प्राप्त

भाष्याचा जो विषय आलेला आहे तोच विषय व तेंच कथानक भारवीनें आपल्या किरातार्जुनीय काव्यामध्येंही वर्णिलें आहे. परंतु व्यासांची भूमिका व भारवीची भूमिका या आपाततः व मूलतः इतक्या भिन्न आहेत कीं त्यामुळें त्या दोघांच्या प्रतिपादनांत कांहींच साम्य राहिलें नाहीं. बेबलच्या नव्या करारांत सांगितलेली ख्रिस्तजन्माची गोष्ट अगदीं त्याच स्वरूपांत-पण विस्तारानें–मिल्टन नामक कवीनें आपल्या Paradise Regained या काव्यांत सांगितलेली आहे. परंतु मिल्टनचें Paradise Regained हें काव्य म्हणून परधर्मी लोक देखील आनंदानें वाचतात व बेबलांतील कथा ही केवळ ख्रिस्तधर्मीय भाविक लोकांकरितांच राखून ठेवल्याप्रमाणें आहे. तेव्हां मूळ भागवताची भूमिका कशा प्रकारची आहे व पंतांनीं भागवताचें रूपांतर करतांना कोणच्या तऱ्हेची भूमिका स्वीकारली आहे याचें निरीक्षण केलें म्हणजे पंतांचीं भागवती काव्यें कोणच्या दृष्टीनें वाचावयाचीं व कोणत्या धोरणानें वाचलीं असतां त्यांचें सौंदर्यसर्वस्व आपल्या ध्यानांत येईल, याचा निर्णय करणें सोपें जाईल.

५. मूळ श्रीमद्भागवत हें पुराण आहे. अर्थात् पुराणाच्या बाह्य स्वरूपाचें लक्षण —

सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वन्तराणि च ।
वंशानुचरितं चेति पुराणं पञ्चलक्षणम् ॥

यास अनुसरून श्रीमद्भागवताची रचना व प्रतिपादन आहे हें कांहीं सांगावयास नको. १ सर्ग, म्हणजे परमात्म्यापासून अमूर्त तत्वांची उत्पत्ति; २ प्रतिसर्ग म्हणजे अमूर्त तत्वांपासून व्यक्त सृष्टीचा प्रादुर्भाव; ३ राजवंश; ४ मन्वंतरें आणि ५ वंशानुचरित इतक्या गोष्टींच्या वर्णनानें युक्त असलेलें तें पुराण होय. भागवतामध्यें मुख्यतः दुसऱ्या व तिसऱ्या स्कंधामध्यें सर्ग व प्रतिसर्ग यांचें वर्णन असून आठव्या स्कंधामध्यें मन्वंतरांचें कथन आहे. चवथ्या, पांचव्या व सहाव्या स्कंधांत पूर्वींच्या मनूंतील राजवंशांचें वर्णन असून मुख्यतः नवव्या स्कंधांत सध्यांच्या वैवस्वत मन्वंतरांतील सूर्यवंशी व चंद्रवंशी राजांच्या वंशावळी त्यांच्या चरित्रांसह दिल्या आहेत. तेव्हां पुराणाच्या लक्षणास अनुसरून या पांच गोष्टींचें प्रतिपादन करणें हें भागवताचें अगदीं प्राथमिक उद्दिष्ट होय. परंतु हें उद्दिष्ट केवळ भागवताच्या बाह्य स्वरूपामुळें त्याला चिकटलेलें आहे. भागवत

हें एक पुराण आहे येवढें सांगितल्यानें त्याचें पूर्ण किंवा अंशतः देखील वर्णन केल्याप्रमाणें होत नाहीं. मनुष्य हा एक हाडामांसाचा पुतळा आहे असें मनुष्याचें लक्षण केलें असतां तें जसें व्यर्थ होय त्याचप्रमाणें भागवत हें एक पुराण आहे असें म्हणून कोरें होय. भागवताचें प्रतिपाद्य व रहस्य या सर्गादि पांच विषयांच्यापेक्षां अगदीं निराळें आहे. मंगलमय प्रभूची निरपेक्ष भक्ति व त्या विश्वात्म्याचेंच शरीरभूत जें हें अंतर्बाह्य जग त्याच्याविषयीं निरंतर प्रेमभाव या दोन गोष्टी म्हणजे भागवताचें प्रतिपाद्य व रहस्य असें म्हणतां येईल. केवळ वैषयिक भक्तीनंतर निर्विषय परंतु सगुण भक्ति, सगुण भक्तीनंतर ईश्वराची निर्गुण भक्ति, निर्गुणभक्तीनें ज्ञान व निरामयता प्राप्त झाल्यानंतर, परमहंसपदवीस पोंचल्यानंतर देखील निराकांक्ष, निर्विकल्प अशी परमेश्वराची भक्तीच भक्ति— भक्ति व प्रेम हेंच आदीपासून अंतापर्यंत मनुष्याचें ध्येय, असें भागवतास मुख्यतः सांगावयाचें आहे. याच्याशिवाय बाकीचे सर्व उद्दिष्ट हेतु भागवतामध्यें केवळ गौण होत.

हे गौण हेतु स्थूलमानानें पुढीलप्रमाणें सांगतां येतील. भागवत हें पुराणांत मोडलें जावें अशा दृष्टीनें रचलें असल्यामुळें पुराणाच्या लक्षणास अनुसरून सर्गादि पांच गोष्टींचें वर्णन करणें हा एक गौण हेतु भागवताच्या रचनेंत दिसून येतो त्याचा वर उल्लेख केलाच आहे. दुसरा म्हणजे वेदान्ताचें, तत्त्वज्ञानाचें व सृष्ट्युत्पत्तिलयाचें मुख्यतः सांख्यतत्त्वांस धरून प्रतिपादन हा होय. संधि सांपडेल तेथें साधकाला अध्यात्मविचाराच्या मार्गाला लावण्याचें भागवतकारांचें धोरण सर्वत्र दिसून येतें. द्वितीय स्कंधामध्यें प्रतिपादलेला वेदान्त, तृतीय स्कंधांतील ५ ते १० अध्यायांपर्यंतचें सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन व त्याच स्कंधांतील अ० २५ ते ३१ पर्यंत कपिलानें देवहूतीला केलेला मनोहर उपदेश; त्याचप्रमाणें अकराव्या स्कंधभर पसरलेला अद्वितीय उद्धवश्रीकृष्णसंवाद हीं भागवताच्या तत्वज्ञानाविषयींच्या प्रीतीचीं उदाहरणें होत. दुसरें भागवतकारांचें गौण उद्दिष्ट म्हणजे श्रीकृष्णचरितानुवर्णन हें होय. वस्तुतः कांहीं अंशीं भक्तियोगाच्या पहिल्या मुख्य धोरणांतच याचा समावेश करण्यास हरकत नाहीं; पण परमेश्वराचें यशोगान ही दृष्टि बाजूस ठेवून एका सामान्य व्यक्तीचें चरित्र या दृष्टीनें पाहिलें तरी सुद्धां भागवतकारांनीं निवेदन केलेलें कृष्णचरित्र इतकें मनोहर, हृद्य व मार्मिक आहे कीं सुंदर रीतीनें चरित्राचें वर्णन करणें हा एक भागवताचा उद्दिष्ट हेतु मानल्यास भागवताच्या दशमस्कंधांतील कथासौंदर्याची व्यवस्थित उपपत्ति बसविल्या-

वाटलें होईल. भागवताच्या दशमस्कंधांत भक्तिभावामुळें व प्रेमामुळें येणारें सौंदर्य जरी सोडून दिलें तरी नुसती कथा या नात्यानें श्रीकृष्णचरित्र इतक्या मनोरम रीतीनें सांगितलें आहे कीं अलीकडच्या काळची उत्कृष्ट लेखकाची कादंबरी त्यापुढें रद्द वाटेल. कथानकांतील व्यक्तींचीं स्वभाववर्णनें, अद्‌भुत व मनोहर प्रसंगांचा उठाव, कुशल लेखकास भूषणास्पद होईल अशी दिव्य वर्णन-पद्धति या गोष्टींमुळें भागवतास, विशेषतः दशमस्कंधास, सामान्य वाङ्मयग्रंथ या नात्यानें देखील इतकी वरच्या दर्जाची योग्यता प्राप्त झालेली आहे कीं विलायती दृष्टिकोणाचा स्वीकार करून या ग्रंथाकडे किंचित् हेलनेनें नजर फेकणारे लोक सर्व तऱ्हेनें अभागीच होत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

६. सामान्य वाङ्मयांतील ग्रंथ या नात्यानें विचार करूं लागलें म्हणजे भागवताची काव्याविषयक योग्यताही सहज ध्यानांत येते. केवळ भक्तिप्रेमांत रंगून गेलेल्या महाभाग्यवान् व्यक्तींस व्यावहारिक काव्याची तादृश क्षिति नसते हें तर खरेंच पण तितक्या उच्च पदवीपर्यंत ज्यांचा अजून प्रवेश झाला नाहीं त्यांना प्रलोभन दाखवून कृष्णभक्तीचा ओलावा त्यांच्या हृदयांत उत्पन्न करण्याकरितां उत्तमोत्तम काव्याचें आमिषही भागवतकारांनीं त्यांच्यापुढें ठेवलें आहे. यांत सांठविलेला ईश्वरविषयक प्रेमाचा लाहो ज्यांच्या ठिकाणीं ईश्वरविषयक रति सुषुप्तावस्थेंत तरी आहे अशांनाच प्राप्त होईल.

> किमलभ्यं भगवति प्रसन्ने श्रीनिकेतने ।
> तथापि तत्परा राजन्नहि वाञ्छन्ति किंचन ॥

हा साधा श्लोक, किंवा

> विपदः सन्तु नः शश्वत्तत्र तत्र जगद्‌गुरो ।
> भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ॥

' तुझें स्मरण नित्य व्हावें यास्तव आपत्तींच्या राशी सदोदित आमच्यावर येऊन कोसळूं देत ! ' ही कुन्तीनें केलेली जगदीश्वर श्रीकृष्णाची प्रार्थना किती साधी आहे ! यांत विशेष खुबीदार असा कांहीं अलंकार नाहीं, एखाद्या रम्य वस्तूचें वर्णन नाहीं किंवा मनोहर, श्रुतिसुभग अशी वर्णरचनाही नाहीं. तथापि भक्तीचा ओलावा असलेल्या गृहस्थास यांत काव्यसर्वस्व भरलेलें आहे असें वाटेल. हे श्लोक खरोखर इतके उदात्त आहेत कीं पुनः पुनः घोकून दिवसचे दिवस त्यांत घालवले तरी त्यांतील सर्व गोडी आपण घेतली असें वाटणार

नाहीं. परंतु एखाद्या पाखंडी, नास्तिक गृहस्थास असल्या श्लोकांतील माधुरीचें काय होय! मधुर निर्झराच्या शेजारीं असून सुद्धां पाषाण आंतून सर्वस्वी कोरडाच असतो त्याप्रमाणें असले शेकडों श्लोक वाचूनसुद्धां त्याचें हृदय शुष्कच रहाणार. तेव्हां असल्या भक्तिप्रेमाचा टिपूससुद्धां नसलेल्या गृहस्थांस आकर्षण करून घेण्याकरितां भागवतकारांनीं लौकिक काव्याची योजना ठिकठिकाणीं केली आहे. उपमा, अतिशयोक्ति, स्वभावोक्त्यादि अलंकार, मधुर वर्णरचना, कोठें कोठें संसारी जनांस रुचतील अशा तऱ्हेच्या कल्पना, प्रसंगानुरूप शृंगारवीरादि प्राकृत रसांचा आविर्भाव इत्यादि प्रकारांनीं भागवतकारांनीं आपल्या ग्रंथाला मंडित केलें आहे. कारण निदान या निमित्तानें तरी प्राकृत जनांनीं या ग्रंथाकडे वळावें व त्यांतील श्रीकृष्ण परमात्म्याकडे त्यांचें लक्ष जावें. सर्व दशमस्कंध पूर्वार्ध, चवथ्या, सातव्या व आठव्या स्कंधांतील अनुक्रमें ध्रुव, प्रल्हाद व बलि यांच्या कथा या सर्व प्रेमानें द्रवणाऱ्या आहेत. काव्याचा आत्मा रस होय हें साहित्यशास्त्रज्ञांमध्यें बहुधा सर्वमान्य असलेलें तत्त्व स्वीकारून जर आपण या भागांकडे पाहिलें तर हे सर्व उत्कृष्ट काव्यांत जमा करण्याजोगेच आहेत असें आपल्यास दिसून येईल.

७. तेव्हां भगवद्भक्तीचें व विश्वप्रेमाचें प्रतिपादन ही मूळ भागवताची सर्वांत मुख्य व व्यापक अशी भूमिका होय. यानंतर : १. पुराणाच्या लक्षणाप्रमाणें आवश्यक असलेल्या सर्गप्रतिसर्गादि पांच विषयांचा यथास्थल समावेश करणें; २. आत्मानात्मविचाराचें विशेषत: सांख्यतत्त्वज्ञानास अनुसरून प्रतिपादन करणें; ३. एखाद्या प्रसिद्ध लौकिक व्यक्तीचा जीवनवृत्तांत सांगावा त्याप्रमाणें श्रीकृष्णाचें चरित्र सुंदर रीतीनें कथन करणें; व ४. प्राकृत काव्याच्या सरणीचें अवलंबन करणें;—हीं भागवताच्या रचनेच्या मुळाशीं असलेलीं गौण तत्त्वें म्हणून दाखल करण्यास हरकत नाहीं.

८. परंतु पंतांनीं भागवताचा मराठींत अनुवाद निराळ्या दृष्टीनें व निराळ्या हेतूनीं केला आहे. भगवद्भक्तीचें प्रतिपादन व परमेश्वराचें यशोगान करण्याचा मूळ भागवतकाराप्रमाणें पंतांचा हेतु होताच, पण त्यांतदेखील आपल्या योग्यतेस अनुसरून पंतांनीं आपली दृष्टि थोडी निराळी ठेवली होती असें त्यांच्या भागवताचें जरा सूक्ष्म अवलोकन केलें म्हणजे दिसून येतें. मूळ भागवत सांगणारे श्री-

शुक हे कैवल्यधामीं पूर्णत्वानें रत झालेले परिनिष्ठित योगी होते. त्यांनीं भागवत सांगितलें व परमात्म्या गोविंदाच्या यशाचें संकीर्तन केलें तें इतर जनांस तारण्याकरितां व भक्तिमार्गास लावण्याकरितां. पंत हे स्वत: भक्तीचा मार्ग चोखाळणारे साधक होते, परमेश्वरानें आपल्या अगदीं अंतर्यामींच्या गाभाऱ्याचें दार उघडून आपल्याला कैवल्यपदीं स्थान द्यावें म्हणून बाहेरून धडपड करणारे आतुर होते अर्थात्, त्यांनीं उगीच भलताच आव न आणतां आपल्या अधिकारास अनुसरून. आपलें स्वत:चें कल्याण व्हावें म्हणूनच वारंवार परमेश्वराचें यशोगान केलें आहे. ईश्वराचें चरित्र ' आपण कांहीं तरावया गावें ' असें त्यांस वाटत असे! उगाच आकाशास गवसणी घालण्यासारखा आपल्या अधिकाराच्या बाहेर इतरांस उपदेश करण्याचा आव त्यांनीं घातला नाहीं. खरोखर पंतांच्या सात्विकतेचा व यथार्थ आत्मपरीक्षणशक्तीचा हा एक उत्कृष्ट पुरावाच होय. आम्हांसारख्या अगदीं प्राकृत संसाररत जनांच्या मानानें ते मोठेच भगवद्भक्त होते; तथापि आपला अधिकार स्वत:च्या उन्नतीचा मार्ग आपण चोखाळून उदाहरणद्वारा अप्रत्यक्ष उपदेश करणें येवढाच होय; शुकाचार्यांसारखा स्वत: आत्मज्ञानानें उज्ज्वलित होऊन केवळ दुसऱ्यांकरितांच भक्तिमार्गाचा प्रकाश पाडण्याचा अधिकार आपणास नाहीं हें ते जाणून होते. आणि ज्ञानेश्वर, एकनाथ, रामदासादि संतांच्या वाणीमध्यें व पंतांच्या काव्योद्गारांमधील फरक तरी कांहींसा अशाच रीतीचा होय. हे सर्व संत आपल्या ग्रंथांच्या योगानें भक्तिमार्गाचें व परमार्थाचें परार्थ प्रतिपादन करीत असत तर पंत हे आपल्या ग्रंथांमध्यें केलेल्या भगवद्गुणगानाच्या योगानें तो परमार्थाचा मार्ग स्वत: आक्रमीत असत.

९. याप्रमाणें श्रीकृष्णभक्तीचें प्रतिपादन हा जो मूळ भागवताचा मुख्य हेतु तो आपल्या स्थितीस अनुरूप असा त्यांत बदल करून पंतांनीं कायम ठेवला आहेच. पण त्याबरोबरच इतर एकदोन उद्देश डोळ्यांपुढें ठेवून त्यांनाही परमेश्वरभक्तीच्या इतकेंच त्यांनीं महत्त्व दिलें आहे. हे उद्दिष्ट हेतु म्हणजे काव्यनिर्मिति व कथाकथन हे होत. भागवतकारांनीं ईशभक्तीला व विश्वप्रेमाला अतिशय उच्च स्थान देऊन त्या मानानें इतर हेतूंना गौणत्व दिलें आहे. परंतु पंतांनीं असें न करितां आपला ग्रंथ म्हणजे एक सुश्लिष्ट व सुंदर काव्य तयार व्हावें या उद्देशालाही तितकेंच महत्त्व दिलें आहे असें त्यांच्या ग्रंथांच्या वाचनानें सहज दिसून येतें.

सुयश न जयांत हरिचें अपटु गुणभजन करून तें अशुचि।

हा भागवतकारांचा सिद्धांत तर त्यांस पसंत होताच परंतु त्यामुळें 'रसिक-चकोरांचें अत्यंत पालन करणारा कविहृदयपयोराशिसंतोषहेतु असा काव्येंदु' त्यांना कमी आल्हादक वाटत होता असें मात्र नाहीं. आपल्या कवनाच्या योगानें दोघेही

रसिक कवि, परमसज्जन भगवद्भक्त प्रसन्न होतील ।

अशी त्यांस अपेक्षा व आकांक्षा वाटत असे.

भेटो रसिक लवहि जो ग्रंथीं चषकांत मूरवि प्राशी ।
ऐसा वर दे, वरदेश्वरचरणा ! या मयूरविप्राशी ॥

असा रसिकप्राप्तीचा वरच ते परमेश्वरापाशीं मागत असत.

काव्यनिर्मितीप्रमाणेंच कथाकथनाचें धोरणही पंतांनीं एकसारखें मनांत वागविलें आहे. पंत हे एक फार वरच्या दर्जाचे कथाकार (Story teller) आपल्या वाङ्मयांत होऊन गेले. पंतांचा जीवनव्यवसायच मुळीं पुराणिकाचा होता. शिवाय गोष्टी सांगण्याची आवड व त्यांतील कुशलता निसर्गतःच त्यांच्या अंगीं वसत होती. वर्णनाविर्णनांचा त्यांना कंटाळा असे परंतु गोष्ट किंवा कथानक म्हटलें कीं कोठूनही उचलून घेऊन त्यांनीं काव्यामध्यें गोवलेंच म्हणून समजावें. एकादी गोष्ट सरळ, सुंदर, घोटाळा न होईल अशा रीतीनें कशी सांगावी याचा कित्ता पंतांच्या पासून अवश्य घेण्याजोगा आहे. वामनानें इतकीं आख्यानें रचलीं आहेत परंतु कथाकथनाचा नैसर्गिक गुण त्याच्यामध्यें दिसून येत नाहीं. कथाकथनाविषयीं नैसर्गिक प्रवृत्ति असलेले व त्यांत कौशल्य संपादन केलेले असे जुन्या कवींपैकीं पंतांखेरीज मुक्तेश्वर व श्रीधर हेच नांव घेण्यासारखे होत विशेषतः श्रीधरांचा तर अत्यंत मनोरंजक रीतीनें गोष्टी सांगण्यामध्यें हातखंडा आहे. व त्यांच्या लोकप्रियतेचें बीजही विशेषेंकरून यांतच आहे. परंतु पंतांच्या रचनेंत असलेला एक गुण म्हणजे आटोपशीरपणा हा मात्र यांच्याही ग्रंथांत दृष्टीस पडत नाहीं. पंतांचा संक्षेपाबद्दलचा कटाक्ष फार विलक्षण आहे. तथापि संक्षेपाकरितां मूळ ग्रंथांतील कथासूत्राचा मात्र त्यांनीं कधींही अव्हेर केला नाहीं. मूळांतील कथानक ते अत्यंत टापटिपीनें आपल्या काव्यांत वर्णितात इतकेंच नव्हे तर मूळांत नसलेली एकादी गोष्टही ठिकठिकाणी उतरून घेण्यास ते वेळेनुसार कमी करीत नाहींत. अशा तऱ्हेचें एक उदाहरण म्हणजे सहाव्या स्कंधांतील अश्वशिर नामक अवताराच्या कथेचें होय. त्याविषयीं विवेचन पुढील विभागांत येईलच.

१०. तेव्हां (१) स्वोन्नत्यर्थ श्रीभगवताच्या यशस्कर लीलांचें गान,

( २ ) रमणीय, प्रमाणबद्ध अशी काव्यनिर्मिति, व

( ३ ) मुळांतील कथाभागाचें सरळ, पौराणिक तऱ्हेचें वर्णन

हे तीन हेतूच प्रामुख्यानें पंतांनीं आपल्या डोळ्यांपुढें ठेवले होते. हें तिहेरी धोरण लक्षांत ठेवूनच पंतांनीं आपल्या भागवती काव्यांची रचना केली आहे. किंबहुना पंतांच्या एकंदर काव्यरचनेंतही हेंच धोरण सर्वत्र दृष्टीस पडतें असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. पंतांचें भागवत व कृष्णविजय यांबरोबरच, त्यांचें महाभारत, हरिवंश, मंत्ररामायण, ब्रह्मोत्तरखंड इत्यादि काव्यांच्या रचनेमध्यें कोणतें धोरण व कोणते उद्दिष्ट हेतु दिसून येतात याचें वर्णन करावयाचें झाल्यास तें वरच्याप्रमाणेंच करावें लागेल यांत संशय नाहीं.

२१. वर वर्णिल्यांप्रमाणें पंतांचें काव्यरचनेचें सार्वत्रिक धोरण असल्यामुळें या धोरणास अननुरूप असे जे मूळ ग्रंथांतील भाग त्यांस आढळले त्यांचा साहजिकच त्यांनीं त्याग केला आहे. आणि आपल्या धोरणाशीं विसंगत अशा गोष्टींचा सर्वस्व त्याग केल्यामुळें त्यांच्या ग्रंथाचा आयताच संक्षेप झाला आहे. मूळ भागवतांत १, पुराणांच्या पद्धतीस अनुसरून सर्गप्रतिसर्गादि पांच विषयांचें वर्णन, व २, साधकोपयोगी अध्यात्माचें, वेदान्ताचें उपपादन या दोन गोष्टी त्यांतील धोरणास अनुसरून आलेल्या आहेत हें आपण पाहिलेंच आहे. परंतु या दोन्ही पंतांच्या रचनेच्या धोरणास अगदीं विसंगत असल्यामुळें त्यांनीं त्यासंबंधींचा सर्व भाग गाळला आहे. व यामुळेंच त्यांना आपल्या काव्यांत कितीतरी संक्षेप करतां आला आहे. मूळ भागवत हें एक पुराण असल्यामुळें त्यांत निरनिराळ्या व्यक्तींच्या संवादाच्या रूपानें नानातऱ्हेच्या गोष्टींचें वर्णन आलेलें आढळतें. नेहमीं येणाऱ्या वेदान्ताखेरीज, सृष्ट्युत्पत्तीचें सांख्य तत्त्वांस अनुसरून वर्णन, सृष्टि ज्याच्यापासून उत्पन्न झाली त्या विराट्पुरुषाचीं वर्णनें; कालमर्यादा, युगगणना, कल्पांत वगैरेंचें वर्णन; सप्तस्वर्ग, सप्तपाताळें, सप्तद्वीपा पृथिवी इत्यादिकांचें वर्णन; मूळ कथानकाशीं अगदीं बारीक धाग्यानें जोडलेल्या अशा असंबद्ध कथा; निरनिराळ्या पात्रांच्या तोंडीं वारंवार येणारीं ईशस्तवनें वगैरे नाना तऱ्हेचे विषय असलेल्या पौराणिक ग्रंथांत पुनः पुनः येत असतात व भागवतांतही ते आलेले आहेतच. पण पंतांनीं असल्या सर्व अप्रस्तुत गोष्टींना निष्ठुरपणें बाजूस सारून मुख्य कथासूत्रावरील आपली निश्चल दृष्टि एकसारखी कायम ठेवली आहे. महाभारतांत, हरिवंशांत, ब्रह्मोत्तरखंडांत व इतरत्रही हाच देखावा दिसून येतो.

मूळ महाभारतांतील शांति व अनुशासन हीं दोन्ही पर्वें फारच मोठीं आहेत. परंतु त्यांत केवळ नीति, धर्म, तत्वज्ञान, वेदान्त यांची भरती असल्यामुळें स्वहेतुस अनुपयुक्त अशा या सर्व विषयांचा त्याग करून पंतांनीं तीं पर्वें अगदीं त्रोटक केलीं आहेत. इतकीं कीं मुळांतील २२००० श्लोकांचा त्यांनीं केवळ ११००आर्यांत संक्षेप केला आहे. एकादा दीर्घदृष्टि मुत्सद्दी ज्याप्रमाणें मार्गांत येणाऱ्या अडचणींची पर्वा न करतां आपल्या कार्याचें सुकाणूं एकसारखें प्रासंग्य अर्थाच्या रोखानें स्थिर ठेवीत असतो त्याप्रमाणें पंतांनीं आपली भूमिका व आपला उद्दिष्ट हेतु यांचें पूर्णपणें भान ठेवून आपल्या कथानकाचें सुकाणूं सतन स्थिर व अढळ ठेवलें आहे. आणि असें केल्यामुळेंच मूळ कथाभागाची मुळींसुद्धां घडी विसकटूं न देतां त्यांना मुळाचा येवढा आश्चर्यकारक संक्षेप करतां आला आहे व इतका संक्षेप करून सुद्धां आपल्या स्वतःच्या अलंकारांची व कल्पनांची भर त्यांत सामावतां आली आहे

वर वर्णिल्याप्रमाणें नाना तऱ्हेच्या अवांतर गोष्टींचा संक्षेप पंतांना मंत्रभागवतांतच मुख्यतः करतां आला आहे. कृष्णविजयासाठीं किंवा स्फुट आख्यानांसाठीं त्यांनीं मुळांतला कथाप्रधान व श्रीकृष्णयशोवर्णनाचें अगर भक्तचरित्राचें आगर असलेला भाग आधारास घेतला आहे. त्यामध्यें मुळांतच असंबद्ध कथा किंवा वर्णनें कांहीं आलेलीं नाहींत. तेव्हां कृष्णविजयांत किंवा भागवती आख्यानांत मुळांत आलले साद्यन्त विषय कायम ठेवण्यास त्यांस मुळींच अडचण पडली नाहीं. आणि यामुळेंच त्यांचा कृष्णविजय व स्फुट आख्यानें जवळजवळ मुळाइतकींच किंबहुना कोठें कोठें मुळापेक्षांही जास्त विस्तृत झालीं आहेत. असें आहे तरी सुद्धां क्वचित् एकादे वेळेस दशमस्कंधांत जेथें वेदान्ताचें अगर चर्वितचर्वणात्मक ईशस्तवनांचें भाकड आलेलें पंतांस आढळलें तेथें त्यांनीं तें गाळण्यास कमी केलेलें नाहीं. याच धोरणास अनुसरून दशमस्कंधापैकीं १४व्या अध्यायांतील लांबलचक ब्रह्मस्तुति त्यांनीं अतिसंक्षिप्त केली आहे व ८७व्या अध्यायांतील बिकट वेदस्तुति तर गाळूनच टाकली आहे. पण याच्या उलट जेथें भगवद्यशाचें प्रेमपूर्ण गान करण्यास सवड असेल अशा रासपंचाध्यायी, रुक्मिणीविवाहकथा वगैरे सारख्या ठिकाणीं पंतांनीं मनसोक्त विस्तारही केला आहे. असो. या दोन्ही तऱ्हांचीं उदाहरणें मुळाशीं पंतकृतीची विस्तृत तुलना करतांना पुढें आपणास दिसून येणारच आहेत.

१२. पंतांनीं आपल्या एकंदर काव्यांत, विशेषतः मंत्रभागवतांत संक्षेपाचें धोरण स्वीकारण्यास त्यांची भूमिका व उद्दिष्ट हेतु कारणीभूत झाले, असें वर ध्वनित करण्यांत आलें आहे. ही भूमिका व उद्दिष्ट हेतु 1. केवळ ईश्वरचरित्र वर्णनपर मुख्य कथासूत्राविषयींच आस्था; व २. काव्यास आवश्यक अशी टापटीप व आटोपशीरपणा; असे दोन प्रकारचे आहेत, असें आपण वर पाहिलेंच आहे. आतां विस्तार न करण्याविषयीं पंत स्वतः जीं ठिकठिकाणीं कारणें किंवा सबबी सांगतात त्यांची पांगारकरांनीं छाननी केली असून पंतांचीं अशीं कारणें एकंदर चार प्रकारचीं असतात असा त्यांनीं निष्कर्ष काढला आहे. ते म्हणतातः—" वर्णनसंक्षेपाचीं पंतांनीं चार कारणें सामान्यतः जागोजाग सांगितलीं आहेतः— १. मराठी काव्यें अति विस्तृत केलीं तर वाचक कंटाळतात. २. कवि स्वतः विस्तरभीरु आहे. ३. ' वाचा शुद्ध कराया थोडें-ही वर्णिलें पुरे यश तें ' ( स्कंध ९. सोन्याचा गुण जो एक तोळ्यांत आहे, तोच एका वालांत आहे, किंवा अमृताच्या सरोवरांतील जळांतले गुण एका बिंदूंत येतात, या न्यायानें ' अल्पहि बहुफळ होतें कृष्णार्पित, सुकवितेंहि कष्ट महा ' ( स्कंध. ८). ४. मंत्र साधायला कोठें अडचण पडते." ( मो. च. पृ. ४१४ ) आतां हीं कारणें आपण सुचविलेल्या कारणांपेक्षां आपाततः निराळीं भासतात खरीं. पण यांच्यासंबंधीं कांहीं गोष्टी लक्षांत ठेवण्याजोग्या आहेत. एक तर हीं कारणें पंतांनीं स्वतः आपल्याबद्दल सांगितलेलीं असून तीं पुष्कळ अंशीं सबबीच्या स्वरूपाचीं आहेत. मनुष्य स्वतः आपल्या कांहीं कृत्यांचें समर्थन करितांना निरनिराळ्या तऱ्हेच्या सबबी सांगत असतो किंवा एखाद्या वेळेस तो स्वतःच्या समजुतीनें खरें कारण सांगत असतांनासुद्धां स्वतःच्या हेतूची बरोबर मीमांसा न करतां आल्याकारणानें न समजून चुकीचें कारण सांगत असतो. येथें वर दिलेलें चौथें कारण तर केवळ वेळ मारून नेण्याकरितां पंतांनीं सांगितलेली सबब आहे हें उघड दिसतें.

वानावीं पाताळें सप्त वाळिंथी अनंत वानावे,

परि मंत्रवर्ण अडविति, आदरिले गुरु कसे न मानावे ! ॥ मं. भा. ५.६२.

असें पंत म्हणतात. परंतु जलयंत्रोद्गारांप्रमाणें नाना तऱ्हेच्या कृत्रिम शब्द-रचना करून त्यांतून कथाभाग वर्णन करण्यामध्यें, हत्तीला आपल्या सोंडांकुंभ-वरून पुष्पमाळा खेळविण्यामध्यें जितका श्रम व्हायचा तितका देखील व्यास

आम्हास पटत नसे त्यानें केवळ आर्येच्या आद्याक्षरांत साधावयाच्या मंत्राबद्दल अशी कुरकूर केलेली कोणास खरी तरी वाटेल काय ? शिवाय येथें एका ठिकाणीं काळाची विल्हेवाट लावतांना मंत्रवर्णाची सबब पंत पुढें करतात पण अशाच तऱ्हेनें अनेक ठिकाणीं सृष्ट्युत्पत्तीचीं, चौदा भुवनांचीं, युगगणनेचीं, कल्पांतांचीं, वर्णाश्रमधर्मांचीं वर्णनें गाळून टाकून पंत पुढें जातात तेथें काय हेच मंत्रवर्ण त्यांना पुन: पुन: अडवतात ? आणि असे जर ठिकठिकाणीं ते अडवीत असतील तर मुख्य कथाभाग वर्णन करण्याच्या वेळेस मात्र ते कसे गप्प बसतात ? त्यावेळेस कां अडवीत नाहींत ? तात्पर्य, मंत्रवर्णाबद्दलची तक्रार ही एक क्षणभर वाचकांना रंजविण्यासाठीं पंतांनीं एके ठिकाणीं केलेली कोटि होय. यापेक्षां तिच्यांत जास्त अर्थ नाहीं.

आतां नं. २ व ३ चीं जीं कारणें पंत सांगतात तीं अगदींच सामान्य आहेत. कवि स्वतः विस्तरभीरु आहे असें पंत म्हणतात. पण यांत काय सांगितल्यासारखें झालें ? मुळांतील पुष्कळ भाग सोडून देऊन जो कवि अतिशय थोडक्यांत वर्णन करतो तो कवि विस्तरभीरु आहे हें तर वाचकांना दिसून येतेंच. पण तो असा विस्तरभीरु कां बनला आहे हेंच जाणण्याची सर्वांना जिज्ञासा असणार. आणि या पंतांच्या विस्तरभीरुत्वाचेंच कारण त्यांनीं मंत्रभागवतांत स्वीकारलेलें वरतीं अनेकवार ज्याचा उल्लेख केला आहे तें दुहेरी धोरण होय. ‘ वाचा शुद्ध करावा थोडेंही वर्णिलें पुरे यश तें ’ हें जें पंतांनीं कारण दिलें आहे तें तर आपल्याला अनुकूलच आहे. त्यावरून एक तर त्यांचा भगवद्यशोवर्णनाविषयींचा कटाक्ष दिसून येतो व दुसरें त्यांचें विस्तरभीरुत्वही सिद्ध होतें. वाचा शुद्ध करण्यास यशोवर्णनाची तर जरूरच आहे. पण ती वाचा थोड्याही यशोवर्णनानें पुनीत होते किंवा पुष्कळानेंही होते. तेव्हां मग थोडक्यांतच वर्णन कां न आटपून टाका ? अशा रीतीनें सरतेशेवटीं विस्तरभीरुत्वाच्या पंतांच्या अगदीं अंगीं मुरलेल्या प्रवृत्तीवरच सर्व येऊन ठेपतें. व ही विस्तरभीरुत्वाची प्रवृत्ति पंतांमध्यें कशी उत्पन्न झाली याचीं कारणें सर्व बाजूंनीं विचार करतां आपण दिलीं आहेत तशींच द्यावीं लागतात.

आतां रसिक व गाढे वाचक मराठींमध्यें अगदीं थोडे आहेत; मराठी काव्यें विस्तृत केलीं तर वाचक कंटाळतात; अशा तऱ्हेचें जें कारण पंतांनीं दिलें आहे तें अगदीं अंशतःमात्र खरें आहे. अगोदर खरा हाडामासाचा कवि असें कधीं म्हणणार नाहीं.

वर्णनाच्या भरांत समरस होऊन जो रंगून जातो तो वाचकांबद्दल अशा तऱ्हेची कुर-कूर करणारच नाहीं. कारण वाचक नाहींत म्हणून काव्यरसाच्या ब्रह्मानंदावर पाणी सोडण्यास तो तयार होणार नाहीं. आणि पंतांसारखा खरा कवि जर अशी कुर-कूर करीत असेल तर ती अगदीं मनापासून नव्हे असें समजण्यास हरकत नाहीं. निदान मराठींत तरी खऱ्या योग्यतेच्या कवीस, मग त्याचा ग्रंथ कितीही विस्तृत असो, वाचकांबद्दल कुरकूर करण्याचा प्रसंग कधीं आलेला नाहीं. शिवाय पंतांच्या अशा कुरकुरींत हसूं येण्याजोगी आणखी दुसरी एक गोष्ट आहे. जो कवि रसिक वाचक थोडे आहेत व अतिविस्तृत काव्यांचें मराठींत चीज होत नाहीं असें एकीकडे रडगाणें गाऊन संक्षेप करीत असतो तोच दुसरीकडे गुपचूप रीतीनें मनास वाटेल तसा विस्तारही करीत असतो ही मोठी आश्चर्याची गोष्ट नव्हे काय? विस्तृत काव्य कोणी वाचीत नाहीं म्हणून भागवताचा जर संक्षेप करतां तर तिकडे कृष्णविजयामध्यें मुक्याचा मन मानेल तसा विस्तार कां केला? शिवाय मंत्रभागवतामध्यें जे पंत नाना तऱ्हेच्या सबबी सांगून व सर्व वाचकांबद्दल तक्रार करून आपण कसा तरी नाइलाजानें संक्षेप करीत आहों असें दाखवीत आहेत तेच भारतामध्यें ' स्वल्पांतचि आणितों कथा सारी ' असें म्हणून आपल्या संक्षेपकौश-ल्याचा अभिमानानें उल्लेख करीत आहेत याची वाट काय? तात्पर्य, पंतांनीं जीं हीं कारणें दिलीं आहेत तीं अगदीं वरवरचीं व गमतीदाखल दिलेलीं असून मंत्र-भागवतांमधील त्यांच्या संक्षेपाचें कारण व कृष्णविजयामधील विस्ताराचें कारण हीं दोन्ही पंतांची एकंदर भूमिका व त्यांचे उद्दिष्ट हेतु लक्षांत घेतले म्हणजेच खरीं खुरीं लक्षांत येतात. दशमस्कंधामध्यें प्रत्यक्ष श्रीभगवंतांचेंच चरित्र वर्णिलेलें असल्यानें त्या स्कंधावर रचलेल्या कृष्णविजयांत भगवद्यशोगानाची पंतांना पर्व-णीच सांपडल्यासारखी झाली. त्यामुळें तेथें फारसा संक्षेप करण्याची प्रवृत्तीच होणें शक्य नव्हतें. परंतु सर्व भागवत मराठींत आणतांना त्यांना सर्वत्र यशोगा-नाची अशी संधि अर्थातच सांपडूं शकली नाहीं. नाना तऱ्हेचीं वर्णनें, अध्यात्म-विषय, वेदान्त वगैरे स्वतःच्या हेतूंस अनुपयुक्त अशा गोष्टी पंतांना ठिकठिकाणीं आडवूं लागल्या. अर्थातच त्या गाळून त्यांना पुष्कळ संक्षेप करावा लागला. आणि मंत्रभागवतांत सर्वत्र असें संक्षेपाचें प्रमाण फार ठेवणें भाग पडल्या-कारणानें त्यांतील दशमस्कंधही त्यांना इतर स्कंधांस शोभेल अशा रीतीनें संक्षिप्तच ठेवावा लागला. नाहीं तर सर्व ग्रंथास सध्यां आहे इतकी प्रमाणबद्धता

झाली नसती. शिवाय दशमस्कंधामध्यें ठरीव ( १०८ ) अध्यायसंख्या राखण्याचें बंधन त्यांनीं लावून घेतल्याकारणानें त्यांना कमजास्त विस्तार करतां आला नाहीं.

१३. वरील एकंदर विवरणावरून पंतांनीं आपलीं काव्यें कोणत्या धोरणानें लिहिलीं आहेत याचें स्पष्टीकरण होण्यास हरकत नाहीं. पुराणग्रंथ म्हणून किंवा भागवतधर्मप्रतिपादक आगम म्हणून जसें एक प्रकारचें धार्मिक महत्त्व भागवताला आहे किंवा पुण्यशील संतांची प्रासादिक वाणी म्हणून मराठींतील ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत इत्यादि ग्रंथांस जसा एक प्रकारचा अधिकार आला आहे तशा तऱ्हेचें महत्त्व किंवा अधिकार स्वतःच्या ग्रंथांस यावा किंवा येणें संभवनीय आहे असें त्यांस वाटत नव्हतें. एका भाविक मुमुक्षूनें स्वतःच्या उन्नतीसाठीं केलेलें भगवद्यशोगान व एका सात्विक महाराष्ट्र कवीनें आपल्या प्राकृत देशबांधवांच्या मनःसंतोषार्थ लिहिलेलें काव्य या दोन दृष्टींनींच कोणालाही झालें तरी पंतांच्या भागवती ग्रंथांचें निरीक्षण करावें लागेल. या दृष्टीनें पाहतां पंतांनीं भगवच्चरित्रवर्णनाची संधि साधण्याकरितां किंवा काव्यसौंदर्याचा उत्कर्ष करण्याकरितां मुळांतील मजकुरांत कोठें छाटाछाट केली असेल, कोठें वाढावा केला असेल तर तो पाहून त्या ठिकाणीं दिसून येणाऱ्या पंतांच्या मार्मिकपणाबद्दल त्यांची तारीफ केली पाहिजे. याच्या उलट भगवद्यशोगानाच्या व काव्योत्कर्षाच्या हेतूला पोषक होणारे असे सुद्धां मुळांतील भाग जर पंतांनीं निरर्थक गाळले असतील तर त्याबद्दलच्या दोषाचेंही योग्य माप पंतांच्या पदरांत घातलें पाहिजे. अशाच रीतीनें पंतकाव्याचें विवेचन करण्याचा पुढील भागांत यत्न केला आहे.

१४. पंतांनीं आपल्या भूमिकेस अनुसरून मूल भागवतामध्यें पाहिजे तसा विस्तार किंवा संकोच केला आहे असें वर म्हटलेंच आहे. असें करण्यास जर त्यांनीं अनमान केला नाहीं तर मग याच्या थोडेंसें पुढें जाऊन रघुवंश, किरातार्जुनीय किंवा शिशुपालवध यांसारखीं काव्यें पंतांनीं कां निर्माण केलीं नाहींत अशा तऱ्हेची शंका कित्येकांच्या मनांत येण्याचा संभव आहे. परंतु अशी शंका घेणाऱ्यांस पंतांची भूमिकाच पूर्णपणें आकलन झाली नाहीं असें म्हणणें भाग आहे. वरील कवींची भूमिका जर सर्वस्वीं व्यावहारिक होती तर पंतांची भूमिका निम्मी किंबहुना अधिकच पारमार्थिक होती. ग्रंथ रचण्यांत उत्कृष्ट काव्यनिर्मिति हा जसा त्यांचा हेतु होता तसाच किंवा त्याहीपेक्षां जास्त महत्वाचा हेतु भगवन्नामसंकीर्तन करण्याचाही होता, हें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे.

वरील कालिदासभारव्यादि कवींची पद्धति काय आहे की, भारतरामायणांतील कोठला तरी एकादा अगदीं लहान प्रसंग हुडकून काढावयाचा; त्याच्यावर आपलें कल्पनासर्वस्व खर्च करावयाचें, मोठ्या टापटिपीनें संस्कृतांतील शब्दभांडाराचें सारसर्वस्व त्याच्यासाठीं उपयोगांत आणावयाचें; व अशा रीतीनें बनलेलें तें काव्य मार्मिक व अलंकारशास्त्रज्ञ रसिकांपुढें मांडावयाचें. अशा कवींचीं महाकाव्यें बहुतेक

सर्गबन्धो महाकाव्यमुच्यते तस्य लक्षणम् ।
आशीर्नमस्क्रिया वस्तुनिर्देशो वापि तन्मुखम् ॥
नगरार्णवशैलर्तुचन्द्रार्कोदयवर्णनैः । उद्यानसलिलक्रीडामधुपानरतोत्सवैः ॥
विप्रलम्भैर्विवाहैश्च कुमारोदयवर्णनैः । मन्त्रदूतप्रयाणाजिनायकाभ्युदयैरपि ॥
अलंकृतमसंक्षिप्तं रसभावनिरन्तरम् । सर्गैरनतिविस्तीर्णैः श्रव्यवृत्तैः सुसंधिभिः ॥
सर्वत्र भिन्नवृत्तान्तैरुपेतं लोकरंजनम् । काव्यं कल्पोत्तरस्थायि जायते सदलंकृति ॥
काव्यादर्श; प्रथमपरिच्छेद, १४ व १६ ते १९.

या संस्कृतांतील एका प्रसिद्ध काव्यशास्त्रमर्मज्ञानें केलेल्या महाकाव्याच्या लक्षणास अनुसरून असतात. अशीं ऋतूंचीं, उद्यानांचीं, जलक्रीडांचीं, नगरांचीं, मधुपानरतोत्सवांचीं वर्णनें ज्यांच्यामध्यें मनसोक्त करतां येतील अशाच तऱ्हेचीं त्रोटक व लवचीक संविधानकें बहुधा हे कवि शोधून काढतात व त्याच्यावर सावकाशपणें आपल्या करामतीचें सर्वस्व खर्चीत बसून सरतेशेवटीं एखादें साहित्यशास्त्रमर्मज्ञांस मान्य होणारें काव्य निर्माण करून विश्रांति घेतात. अशा तऱ्हेचा माघभारवींसारखा क्रम पंतांस अंगीकारावयाचा नव्हता. या मनुष्यजन्मास आल्यासरसें शक्य तितकें भगवद्यशोगान त्यांस आटपून टाकायचें होतें; अर्थात् ईशचरित्रावर जितके होतील तितके ग्रंथ झपाट्यानें आपल्या हातून होऊन जावे अशी त्यांची मनीषा होती. तेव्हां जितकी त्वरा करतां येईल तितकी करून व त्यांतच जितकी करामत साधतां येईल तितकी साधून ते एका मागून एक ग्रंथ करून टाकीत असत. एकच पायरी परंतु तिच्यांत बघितलें असतां आरशासारखें प्रतिबिंब दिसेल अशा तऱ्हेची घोटींव होण्यापेक्षां जरा टाकी न लावलेली ओबडधोबड राहून कां होईना पण सबंध भगवद्यशोमंदिराचा सोपान आपल्या हातून घडून व्हावा असें त्यांस वाटे. अशाच ईशचरित्रवर्णनाच्या आकांक्षेनें त्यांनीं भारत, भागवत, रामायणासारखे सबंध अगडव्याळ ग्रंथ आपल्या आधारासाठीं घेतले व त्यांवर काव्यें केलीं. असें केल्यानें मूळ कथानकाच्या बाहेर जाऊन स्वतःचा

कल्पनाविस्तार करणें तर दूरच परंतु मुळांतलीं कथानकेंच कवींबर्ली तरी संदर्भ-रूपानें मराठींत आणण्यास त्यांस अतोनात श्रम पडले. अशा स्थितींत मुळापेक्षां ज्यास्त विस्तार करण्याच्या भरीस पडून ' गंडस्योपरि पिटिकाः संवृत्ताः ' अशी स्थिति करून घेणें युक्त झालें नसतें. शिवाय पंत हे भाविक ग्रंथकार होते. केवळ कल्पनारम्यत्वाच्या भरीस पडून मुळामध्यें वाटेल तसा फेरबदल करणें त्यांस कधींहि पसंत पडणें शक्य नव्हतें. मुळांत जेथें कृष्णाच्या आगमनाबद्दल रुक्मिणीला चिंता वाटत होती, असा एक श्लोक असेल तेथें पंत फार झालें तर तीच कल्पना वाढवून पांच श्लोक करतील पण मुळांत जेथें अवाक्षरानेंसुद्धां कांहीं उल्लेख केलेला नाहीं तेथें स्वतःच्याच कल्पनेचा प्रसंग निर्माण करून त्याचें मनसोक्त वर्णन खास करीत बसणार नाहींत. असें करणें भारत भागव-तादिक पूज्य मूळग्रंथांचा कांहींसा अवमान करणेंच होय, असें त्यांस वाटत असलें पाहिजे. असो; तर याप्रमाणें कालिदासभारविमाघादिक कवि व पंत यांच्या प्रकृतींत व भूमिकेंत मूलतःच भेद असल्यानें कालिदासादिकांसारखीं काव्यें पंतांच्या हातून झालीं नाहींत, ही मोठी नवलाची गोष्ट नाहीं. आतां पंतांच्या हातून तशा तऱ्हेचीं काव्यें झालीं नाहींत या गोष्टीबद्दल कित्येकांस बरेंच वाटेल व कित्येकांस खेदही वाटेल. ज्या रसिकांच्या हृदयांत भाविकपणाचा ओलावा बराच आहे व ज्यांस भगवद्भक्तिप्रेरित काव्य मान्यतर वाटतें त्यांना पंतांनीं केलें हें चांगलेंच केलें असें वाटेल. परंतु ज्या रसिकांच्या बुद्धीला पाश्चात्य काव्यांचा व पाश्चात्य साहित्यशास्त्राचा विशेष संस्कार झाल्याकारणानें ज्यांना उत्तम काव्य म्हणजे वर्डस्वर्थ, शेली वगैरे कवींच्या भावनागीतांच्याच धर्तीवर गेलेलें असावें असें वाटतें त्यांना पंतांचा सर्व खटाटोप निरर्थक व शुष्क वाटेल. याच्या उलट कालिदासभारवींच्या राजविलासी संगतींतच आजपर्यंत ज्यांचा काल गेला आहे व भामहमम्मटांचें सूक्ष्म अलंकारशास्त्र वाचूनच ज्यांची मति काव्याविषयीं मार्मिक बनली आहे त्यांनाही भाविक मोरोपंतांचे काव्यविषयक आयास फारसे हृद्य वाटणार नाहींत. किंवा केवळ शृंगारामध्येंच ज्यांची बुद्धि रंगून जाते अशा रसिकांनाहि पंतांच्या काव्यांकडे ढुंकून देखील पहावेंसें वाटणार नाहीं. असो. हे सर्व संस्कारभेदाचे प्रकार आहेत. त्यांबद्दल आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं किंवा एका प्रकाराचा अभिमान धरणाऱ्यांनीं दुसऱ्यांना तुच्छ लेखण्याचीही आवश्यकता नाहीं.

१५. पंत हे कवि होते. तेव्हां निरंकुशत्वाचा अधिकार निसर्गतःच त्यांना प्राप्त झाला होता. तथापि व्यासवाल्मीकिशुककृतींबद्दलच्या निरतिशय पूज्य-भावामुळें व भगवत्कथा शक्य तितक्या भाविकजनमान्य अशा शुद्ध स्वरूपांत त्यांना गावयाच्या असल्यामुळें त्यांनीं आपला निरंकुशत्वाचा अधिकार आपल्या काव्यांमध्यें फारसा गाजवला नाहीं. मुळामध्यें त्यांनीं अगदीं बदल केला नाहीं असें नाहीं; पण जो कांहीं बदल केला तो बहुधा कांहीं विशिष्ट धोरणास अनु-सरून केला व तोही मुळास न दुखवितां केला. केवळ कथानकाच्या सोईकरतां व काव्यसौंदर्याकरितां मुळांतील कथेमध्यें वाटेल तसा बदल करणें; पात्रांच्या स्वभावांचा व हेतूंचा देखील कोठें कोठें विपर्यास करून आपल्या मनाच्या कल्पना त्यांच्यावर लादणें ही गोष्ट निराळी व मुळांतीलच कथानकाचें स्वरूप कायम ठेवून प्रसंगोपात्त अवांतर वर्णनादिकांचा विस्तार अगर संक्षेप करणें ही गोष्ट निराळी. अलीकडे पौराणिक कथांवर रचलेलीं जीं नाटकें होत असतात त्यांमध्ये वरीलपैकीं पहिल्या प्रकाराचा स्वीकार केलेला असतो. पंतांनीं व बहुधा सर्व प्राचीन कवींनीं दुसऱ्या प्रकारचा अवलंब केलेला आहे. प्राचीन कवींनीं कचोपाख्यानावर केवढीही विस्तृत किंवा संक्षिप्त काव्यें लिहिलीं असलीं तरी त्यांत कच हा एक विद्यासंपादनतत्पर, एकनिष्ठ, नम्र व एकमार्गी असा विद्यार्थीच असलेला आढळेल; मद्यपाननिषेधावर व्याख्यानें झोडणारा किंवा युवतीच्या प्रेमपाशांत सांपडून स्वतःच्या हेतुसिद्धीकरितां तिचें सहाय्य घेऊं इच्छिणारा तरुण अशा स्वरूपानें आमचे प्राचीन कवि कधींही त्याला नटविणार नाहींत. अलीकडील नाटककार पौराणिक कथांवर नाटकें लिहितात त्यांत अगो-दर मूळच्या कथानकामध्यें मनास मानेल तसा बदल केलेला असतो. पात्रांचे मूळचे स्वभाव बदलून त्यांना वाटेल तसें स्वरूप देण्यांत येतें व कथेचें पौराणिक वात:-वरण बदलून टाकून आधुनिक समाजांतील विचार, कल्पना व ध्येयें यांचें दाट आवरण तिजवर चढविण्यांत येतें. अशा रीतीनें पौराणिक कथेचें स्वरूप विकृत करून तिजवर काव्यरचना अगर नाटकरचना करणें दोषास्पद आहे कीं काय याचा आपणास येथें विचार कर्तव्य नाहीं. जुन्या मराठी कवींच्या काव्य-ग्रंथांमध्यें असा प्रकार आढळत नाहीं येवढेंच आपणास पाहावयाचें आहे. एखाद्या छायाचित्राची ( फोटोची ) विवर्धित प्रमाणांत किंवा संकुचित प्रमाणांत प्रत काढली तरी तिचें स्वरूप मूळ चित्राहून कांहीं निराळें होत नाहीं तद्वतच

जुन्या कवींच्या काव्यांची गोष्ट होय. त्यांच्या काव्यांत वर्णनें कितीही फुगवलेलीं अथवा आकुंचित केलेलीं असलीं तरी कथानकाचें स्वरूप केव्हांही मुळाप्रमाणेंच कायम राखलेलें असतें. याचा अर्थ असा मात्र नाहीं कीं ह्या कवींचीं काव्यें केवळ भाषांतररूप असून स्वतंत्र रचना त्यांत बिलकुल नसते. फक्त कथानकाची रूपरेखा, पात्रांचा स्वभाव वगैरे मुळांतल्याप्रमाणेंच कायम ठेवून अवांतर वर्णनांत आमचे कवि पूर्ण स्वातंत्र्य गाजवितात. शिवाय कथानकाचासुद्धां मतलब जरी मुळाप्रमाणेंच कायम ठेवला तरी तो स्वतंत्र रीतीनें भिन्न शब्दांनीं वर्णन करतां येत नाहीं असें नाहीं; आणि आमचे कवि अशा स्वतंत्र रीतीनेंच कथासूत्र देखील मराठींत उतरतात ही गोष्ट जुन्या महाराष्ट्र कवींच्या वाचकांच्या परिचयाचीच आहे. असो; तेव्हां अलीकडील मराठी नाटककारांची, किंबहुना कालिदास भारविभवभूत्यादि *प्राचीन नाटककार व कवि यांचीही, भूमिका व आमचे जुने मराठी कवि यांची भूमिका यांजमध्यें असा मूलतःच भेद आहे. दोघांच्या तत्वांत याप्रमाणें फरक असला म्हणून त्यांपैकीं एकजण भाषांतऱ्या ठरतो असें कांहीं नाहीं. खाडिलकरादि अर्वाचीन किंवा कालिदासभवभूत्यादि प्राचीन नाटककार यांना जसें कोणी भाषांतरे म्हणत नाहीं तद्वतच वामनमयूरादि मराठी कवींना भाषांतरे म्हणणें अनुचित होय. कालिदास, भारवि, भवभूति हे जर स्वतंत्र प्रतिभेचे कवि होत तर मुक्तेश्वर, वामन, मयूर हे स्वतंत्र प्रतिभेचे कवि ठरण्याला काय प्रत्यवाय आहे हें समजणें कठीण आहे. येवढेंच मात्र म्हणतां येईल कीं कालिदासादिकांनीं मूळच्या पौराणिक कथांमध्यें काव्यसौंदर्यास पोषक असे बदल करून व पात्रांच्या स्वभावांत रसानुकूल फेरफार करून जें कथानकरचनाकौशल्य प्रकट केलें तसें आमच्या मुक्तेश्वरादि प्राकृत कवींनीं केलें नाहीं. तेव्हां कथानकरचनेचें कौशल्य प्राकृत कवींच्यामध्यें दिसून येत नाहीं येवढ्यापुरताच काय तो त्यांचा कमीपणा कबूल करितां येईल. बाकी कवित्वाच्या इतर अनेकविध गुणांमध्यें कोणत्याही भाषेतल्या कवींना आमचे प्राकृत कवि रेंसभरही हार जाणार नाहींत ही सहस्रावधि वाचकांच्या अनुभवाची गोष्ट आहे.

१६. पंतांनीं संस्कृत शब्दरचना, नानातऱ्हेचे शब्दालंकार, अर्थालंकार यांनीं परिपूर्ण अशी जी प्रौढ काव्यरचना मराठींत केली तिलाच आणखी वळण देऊन त्यांनीं कालिदासादिकांसारखी महाकाव्यांची अगर नाटकांची रचना कां केली नाहीं याबद्दल अनेक रसिकांना आजपर्यंत कुतूहल वाटत आलें आहे. खुद्द निबंध-

भाष्यकारांच्या ही गोष्ट लक्षात आली असून पंतांची कविता कालिदासादिकांच्या वळणावर गेली नाहीं यावरून पंतांना या कवींच्या कवितेची ओळखसुद्धां नसावी असा त्यांनीं निष्कर्ष काढला आहे. पंतांची कविता संस्कृत पंचमहाकाव्यांच्या धर्तीवर गेली नाहीं ही गोष्ट तर खरीच; परंतु यावरून पंचमहाकाव्यांशीं पंतांचा परिचयदेखील नव्हता असें मुळींच म्हणतां येणार नाहीं. पंतांची काव्यस्फूर्ति सर्वस्वीं स्वतंत्र व जन्मसिद्ध होती. त्यांची उपजत प्रवृत्ति, त्यांचे संस्कार कालिदासादिकांच्याहून फार भिन्न होते. केवळ याच कारणामुळें कालिदासादिकांच्या-सारखीं राजविलासी काव्यें त्यांच्या हातून निर्माण झालीं नाहींत. नाहींतर अशा तऱ्हेचीं काव्यें लिहिण्यास त्यांना सर्वस्वीं अनुकूल परिस्थिति होती. नवनवोन्मेष-शालिनी प्रतिभा, लोकशास्त्रकाव्यादिकांच्या अवलोकनानें आलेली निपुणता व काव्यज्ञ गुरूच्यापाशीं केलेला दृढ अभ्यास हे मम्मटाचार्यांनीं सांगितलेले काव्यो-त्पत्तीचे तीन्ही हेतु त्यांच्या ठायीं पूर्णत्वानें वसत होते. गुणज्ञ व उदार प्रभूचा दुर्मिळ आश्रय त्यांस लाभला असल्यानें निर्वाहाविषयींही लेशमात्र चिंता उत्पन्न होण्याचें कारण नव्हतें. इतकेंच काय, पण काशीनाथ पाध्यासारख्या जिवलग व आदरणीय आप्तांनीं खुद्द संस्कृतांत पंचमहाकाव्यें निर्माण करण्याबद्दल पंतांस विनंती केली होती. ( पहा मो. च. पृ. ३४ ). तथापि या विनंतीचाही पंतांवर कांहीं परिणाम झाला असल्याचें दिसून येत नाहीं. संस्कृतांत पंचमहाकाव्यें रचणें तर राहोच परंतु मराठींतही महाकाव्यांच्या धर्तीचें कांहीं काव्य त्यांनीं केलें नाहीं. आपल्या प्रवृत्तीनुसार स्वीकारलेला धोपटमार्ग त्यांनीं अखेरपर्यंत चालू ठेवला.

१७. खरें म्हटलें तर शब्दालंकार, अर्थालंकार, मनोहर कल्पनाविलास, अनेकविध वैचित्र्यपूर्ण छंदोरचना वगैरे संस्कृत काव्यांतील प्रकार पंतांनीं जितके आत्मसात् करून घेतले आहेत तितके महाराष्ट्र कवींपैकीं दुसऱ्या कोणींही घेतलेले दिसत नाहींत. परंतु बाह्यवेषांत त्यांनीं संस्कृत कवितेचें वळण जितकें स्वीकारलें आहे तितकेंच अंतरंगांत व वर्ण्यविषयांत ते तिजपासून विमुख झालेले आहेत. पंतांच्या कवितेंत एकंदर तीन भिन्न प्रवृत्तींचें व संस्कारांचें मिश्रण दिसून येतें. त्यांच्या कवितेचें अंतरंग व आत्मा जिच्यापासून उत्पन्न झाला ती मुख्य स्फूर्ति त्यांना व्यासवाल्मीकिशुक यांच्यापासून मिळाली होती. त्यांच्या कवितेचे विषय व रचनेची घाटणी यांत सर्वस्वीं व्यासादिकांच्याच वाणीचा प्रभाव दिसून येतो. कवितेचे विषय तर त्यांनीं भारतरामायणभागवतांतून

कथेच्या तसेच घेतले आहेत हें सांगावयास नकोच. वर्णनाची घाटणी, काव्याचे विभाग इत्यादिकांतही त्यांची रचना भारतभागवतादिकांशीं फार साम्य पावते. त्यांच्या काव्यांत प्रतिबिंबित झालेली अंतःकरणाची शांत, विरक्त व प्रेमळ वृत्ति, त्याचप्रमाणें भगवद्यशोगानाची लालसा हीं देखील पुष्कळशीं भारतभागवतांच्या अवलोकनानें आलेलीं होत. परंतु या बाबतींत त्यांच्या मनावर मुख्य संस्कार ज्ञानेश्वर एकनाथादि संत कवींच्या वाणीनें केला असला पाहिजे. त्यांच्या कवितेंत प्रकट झालेली निर्मळ वृत्ति व भगवद्गुणगानाची तळमळ पाहिली म्हणजे आमच्या पूर्वींच्या शांतिजलधि साधुसंतांच्या वृत्तीचीच छटा त्यांच्या मनावर उमटलेली आहे असा प्रत्यय आल्याखेरीज रहात नाहीं. पंतांच्या मनावर झालेला तिसरा संस्कार म्हणजे वर उल्लेखिलेला, संस्कृत काव्यनाटकांचा व साहित्यशास्त्राचा होय. संस्कृतांतील काव्य नाटक चंपू भाण इत्यादिकांचें व अलंकारशास्त्राचें पंतांचें गाढ अध्ययन झालें होतें. काव्याचें शब्दार्थात्मक बाह्य शरीर निरुपम सौंदर्यशालि करण्याची संस्कृत काव्यमर्मज्ञांची कला पंतांनीं आत्मसात् करून घेतली होती. व तिचा उपयोगही त्यांनीं आपल्या कवितासुंदरीचें शरीर सजविण्यांत भरपूर रीतीनें केला आहे.

अशा रीतीनें तीन विसदृश संस्कारांचें मिश्रण झाल्याचा देखावा पंतकवितेंत दिसून येत असल्यामुळें तिला एक प्रकारची अपूर्व शोभा प्राप्त झाली आहे व तीन प्रकारच्या भिन्न अभिरुचींच्या लोकांनाही प्रिय होण्यासारखें तिचें स्वरूप बठलें आहे. पुराणप्रिय लोकांना पंतांची पौराणिक घाटणी पसंत पडेल, भगवद्भक्त, साधुवृत्तीचे लोक त्यांनीं केलेल्या भगवद्यशोगानांत रंगून जातील व काव्यालंकारविचक्षण रसिक त्यांच्या कवितेच्या बाह्यभूषेनें मोहून जातील यांत संशय नाहीं. विनोदप्रिय टवाळांना किंवा शृंगारलोलुप अड्डेबाजांना पसंत पडण्याजोगा अंश मात्र त्यांच्या कवितेंत आढळणार नाहीं हें कबूल करणें भाग आहे.

१८. तीन भिन्न प्रवृत्तींचें मिश्रण झाल्यामुळें एका दृष्टीनें मात्र पंतांच्या कवितेस न्यूनता आली आहे हें येथें नमूद करणें उचित होईल. ती न्यूनता म्हणजे येवढीच कीं तीन्ही प्रकार काव्यांत आणल्यामुळें त्यांपैकीं कोणताही एक परमोत्कर्षास गेलेला त्यांच्या कवितेंत दृष्टीस पडत नाहीं. पौराणिक घाटणी त्यांनीं स्वीकारली खरी तरी पण सरस व सालंकृत असें काव्य निर्माण करण्याकडेही लक्ष पोंचविल्याकारणानें पौराणिक तऱ्हेचा पूर्ण उठाव त्यांच्या काव्यांत

होऊं शकला नाहीं. पौराणिक तऱ्हेला न शोभण्याजोगीं कृत्रिम, अर्थानें कठिण, अर्थी त्यानें त्यांच्या काव्यांत आढळतात. कल्पनाविलास, अलंकारांचें प्राचुर्य व वृत्तवैचित्र्य हेंही साध्या भोपटमार्गी पौराणिक वर्णनास बाधकच झालें आहे-असें संस्कृत काव्यांच्या रचनाविशेषांचें तरी पूर्णपणें अवलंबन करून

निर्दूषणा गुणवती रसभावपूर्णा
सालंकृतिः श्रवणकोमलवर्णराजिः ।

अशी कविता त्यांनीं सर्वत्र निर्माण केली आहे असेंही दिसत नाहीं. संस्कृत काव्यांप्रमाणें नगरोत्साहयुद्धादिकांचीं, राजसभा, अंतःपुर, स्वयंवरांचीं स्वतंत्र व मनोरम वर्णनें त्यांनीं मुळींच केलीं नाहींत. पौराणिक पद्धतीनें मूळ कथासूत्र तेवढें घाईनें धरून टाकलें आहे. त्यामुळें रसालंकारमर्मज्ञांचें मन पूर्णपणें प्रसन्न होण्यासारखी रचनाही त्यांच्या हातून उतरली नाहीं. त्याचप्रमाणें भगवद्गुण-गानाचीही गोष्ट. संस्कृतकाव्यपद्धतीकडे, अलंकाराकडे व यमकानुप्रासांच्या कृत्रिम शब्दरचनेकडे लक्ष ठेवल्यामुळें ज्ञानेश्वर, एकनाथ, तुकाराम इत्यादि संतांच्या वाणीप्रमाणें शांतरसाचा व भगवद्भक्तीचाही परमोत्कर्ष झालेला त्यांच्या काव्यांत दिसून येत नाहीं. याप्रमाणें वरील सर्व तऱ्हेच्या अभिरुचीच्या लोकांना साधारण आवडण्यासारखें त्यांचें काव्य झालें असलें तरी कोणत्याही एका विशिष्ट रुचीच्या वाचकांना अगदीं प्रियतम व जिवलग होऊन रहाण्यासारखी त्याची रचना झालेली नाहीं.*

---

* वरील विवेचन साकल्यानें व स्थूलमानानें केलेलें आहे. पंतांच्या ब्रह्मोत्तर-खंडांत साध्या पौराणिक पद्धतीचें जवळ जवळ पूर्णांशानें अनुकरण केलें आहे; कृष्णविजयाच्या ५५ ते ९० अध्यायांत व सारारामायण, सीतारामायण यां-सारख्या कांहीं काव्यांत पंतांनीं रघुकिरातादि काव्यांची वर्णनशैलीही बरीचशी उचलून उत्कृष्ट परिपाक बठवून दाखविला आहे; व भीष्मभक्तिभाग्य, आर्या-केकावलि, श्लोककेकावलि इत्यादि त्यांच्या काव्यांत भक्तिरसाचा परमोत्कर्ष झालेलाही दिसून येत आहे तथापि वरील स्थळें त्यांच्या एकंदर काव्यसमूहांत अपवादभूत होत. तेव्हां त्यांच्या एकंदर काव्यसमूहांत वर म्हटल्याप्रमाणें या तीन्ही प्रवृत्तींचा मिलाफच दिसून येतो व त्यामुळें कोणतीही एक पद्धति पूर्णत्वास गेलेली आढळत नाहीं हें विधान खरेंच आहे.

१९. पंतांच्या विद्वत्तेविषयीं दोन शब्द लिहून हा विभाग आटोपता घेऊं. ह्या प्रश्नासंबंधीं निबंधमालाकारांनीं पूर्वपक्ष करून प्रथम वाद उपस्थित केला. त्यावर निबंधमालेतच कालक्याचें वाग्युद्ध होऊन मोठी रणधुमाळी माजली. कावेटकर, वामन दाजी ओक, 'शोधक' इत्यादि गृहस्थांनीं मालाकारांच्या विरुद्ध पक्षाचा उपन्यास केला. बाळकृष्ण मल्हार हंसांनीं त्याच सुमारास आपला मोरोपंतांवरील निबंध लिहिला त्यांतही मोरोपंत हा शास्त्री पंडित नसून साधा पुराणिक होता या मालाकारांच्या सिद्धान्ताचें मोठ्या आवेशानें खंडन केलें आहे. (पहा, हंसकृत मोरोपंतावरील निबंध; पृ. ५७–७४.) यानंतर पांगारकरांनीं अत्यंत परिश्रमपूर्वक पंतांच्या चरित्राची माहिती जुळवून व पंतकवितेचें सूक्ष्म अध्ययन करून पंतांच्या विद्वत्तेविषयींच्या प्रश्नावर अपूर्व प्रकाश पाडणारा मजकूर प्रथम केसरी पत्रांत व नंतर आपल्या मोरोपंतचरित्रांत प्रसिद्ध केला. (पहा, मो. च. प्रकरण ३). पांगारकरांच्या विवेचनानें या प्रश्नाचा बहुतेक कायमचा निकाल झालाच आहे; व या वादांतील मालाकारांखेरीज इतरांचे लेख इतिहास-जमा झाले आहेत. येथें फक्त पांगारकरांच्या लेखांत राहिलेल्या थोड्याशा संदिग्धतेविषयीं स्पष्टीकरण करावयाचें आहे.

पंतांचें अध्ययन व विद्वत्ता हीं कितपत व कोणच्या प्रकारचीं होतीं याविषयीं विचार करूं लागलें असतां खालील तीन पक्ष संभवनीय दिसतात.

१. मालाकार म्हणतात त्याप्रमाणें मोरोपंतांची विद्वत्ता साध्या व्युत्पन्न पुराणिकापेक्षां जास्त नव्हती. भारत भागवत रामायण चांगलें समजण्यापुरतें फक्त त्यांचें संस्कृताचें ज्ञान होतें.

२. पंत हे उत्तम तऱ्हेचे व्युत्पन्न असून काव्यनाटकांशीं त्यांचा दृढ परिचय होता. अलंकारशास्त्राचें त्यांचें गाढ अध्ययन झालेलें असून छंदःशास्त्रही त्यांना उत्कृष्ट अवगत होतें. वेदान्ताचेंही त्यांनीं चांगलें अवलोकन केलें होतें.

३. पंत हे महापंडित असून अनेकशास्त्रप्रवीण होते. काव्यालंकारमर्मज्ञ असूनही षड्दर्शनांत निष्णात होते; इ० इ०.

यापैकीं पहिला पक्ष त्याला जबरदस्त विरोधी पुरावा उपलब्ध झाला असल्यामुळें त्याज्य ठरतो; तर तिसरा पक्ष उपोद्बलक पुराव्याच्या अभावीं असमर्थनीय ठरतो. मिळून अवशिष्ट राहिलेला दुसरा पक्षच ग्रहण करणें प्राप्त होतें व तोच अनुकूल प्रमाणांनीं बलिष्ठ असल्याचें दिसून येतें. पंतांच्या अध्ययनाचें व विद्-

येथें माप अजमावण्याला त्यांनीं स्वतः लिहिलेले किंवा स्वतःकरितां लिहवून घेतलेले ग्रंथ हें एक मोठेंच साधन उपलब्ध झालें आहे. पांगारकरांच्या व पराडकरांच्या लेखांवरून पंतांनीं स्वतःकरितां एकंदर ५६ ग्रंथ लिहिले किंवा लिहविले असें दिसून येतें.* या ५६ ग्रंथांची वर्गवारी पुढें लिहिल्याप्रमाणें आहे.—

काव्य १३; नाटक १०; चंपू, भाण इत्यादि ३; अलंकारशास्त्र ६; छंदःशास्त्र २; कोश २; वेदान्त, तत्वज्ञान ११; ज्योतिष १; पुराण, धर्मशास्त्र २; मराठी २; धार्मिक पाठाचे ग्रंथ व इतर ४.

२०. ही वर्गवारी म्हणजे पंतांचें कोणच्या विषयाचें अध्ययन किती होतें याचें प्रमाण बसविण्याचें एक साधनच होय असें स्थूलमानानें समजण्यास हरकत नाहीं. यांत काव्यनाटकादि वाङ्मयग्रंथ, कोश, छंद इत्यादि साहित्यग्रंथ व अलंकारग्रंथ यांची एकंदर संख्या ३५ भरते. म्हणजे जुन्या पद्धतीच्या लोकांत ज्याला व्युत्पत्ति असें नांव देण्याचा प्रघात आहे त्याचें व अलंकार शास्त्राचें पंतांचें अवलोकन किती विस्तृत होतें हें सहज दिसून येईल. पंत हे कवि होते, अर्थात् कवित्वशक्तीस साहाय्यभूत होणाऱ्या या विषयांवरचा त्यांचा अभ्यास सर्वांत दृढ होता हें सहजच आहे. उपजत स्फूर्ति किंवा प्रतिभा त्यांच्या ठायीं विलसत होतीच; परंतु दृढ अभ्यासाचा घर्षणसंस्कार आपल्या प्रतिमारत्नावर केला तरच तें उज्ज्वल होऊन चमकेल हें ध्यानांत वागवून त्यांनीं आमरण काव्यानुकूल विषयांचें परिशीलन चालविलें होतें. आपली प्रतिमा कांहींतरी अलौकिक आहे तेव्हां आपणास अभ्यासाची जरूर काय अशा घमेंडींत जाऊन त्यांनीं

---

* पांगारकरकृत मो. च., प्र. ३ यांतील पंतलिखित पुस्तकांची यादी व पंतकाव्यांच्या पराडकरी आवृत्तीतील खंड ६ 'कृष्णविजय' यांत 'चमत्कारिक रीतीनें लागलेला एक शोध' या मथळ्याखालीं आलेलें टिपण; या दोन्ही ठिकाणच्या ग्रंथांची बेरीज ५६ होते. पांगारकरांनीं मुरारि नाटक व अनर्घराघव हा एकच ग्रंथ असतां ते दोन म्हणून दिले आहेत. परंतु पंतांनीं पिंगलप्रणीत छंदःसूत्र व वाणीभूषण ह्या एकाच पोथींत लिहून घेतलेल्या ग्रंथांपैकीं वाणीभूषण पांगारकरांनीं अमेल धरलेलें असून छंदःसूत्र गाळलें आहे. या उणें अधिकांची फिटंफाट होऊन पंतलिखित ग्रंथांची संख्या ५६च कायम राहते.

ज्ञान संपादण्याची व ग्रंथावलोकन करून मार्मिक कल्पनांचा संग्रह करण्याची हेळसांड केली नाहीं ही त्यांची खरी थोरवी होय.

२१. व्युत्पत्ति, साहित्य व अलंकार यांच्या खालोखाल पंतांचें वेदान्ताचें वाचन होतें असें दिसतें. त्यांनीं लिहून घेतलेल्या ११ वेदान्तग्रंथांमध्यें अद्वैताचे मोठमोठे आकरग्रंथ फारसे नाहींत. पंचदशी, अपरोक्षानुभूति, वेदान्तसारसटीक, बृहदारण्यकभाष्य, सांख्यतत्वकौमुदी हेच काय ते महत्त्वाचे ग्रंथ त्यांमध्यें दिसून येतात. यावरून शास्त्र या नात्यानें पद्धतशीर रीतीनें त्यांचें वेदान्ताचें अध्ययन झालें नसावें असें वाटतें. तथापि त्यांचें एकंदर शिक्षण जसें बहुविध, चतुरस्र व मनाचा खरा विकास करणारें झालें होतें त्याचप्रमाणें त्यांचें वेदांताचें ज्ञानही बहुविध, व्यापक व मार्मिक होतें याविषयीं संशय घेण्यास जागा नाहीं. केवळ ठरीव ग्रंथांच्या पंक्ति घोकल्यानें, ठरीव कोटया व वादविवाद करतां आल्यानें कोणत्याही विषयेचें खरें ज्ञान झालें असें होत नाहीं. भारत व भागवत हे अध्यात्मविषयीं आगरेंच असलेले ग्रंथ पंतांना करतलामलकवत् होते. या ग्रंथांतून प्राप्त झालेल्या ज्ञानामध्यें त्यांनीं लिहून घेतलेले अकरा ग्रंथ व लिहून न घेतां नुसते वाचून टाकलेले अनेक ग्रंथ यांची मिळवणी केली म्हणजे त्यांचा ज्ञानराशि किती भव्य असावा याची कांहींशी कल्पना होते. तेव्हां पंतांचें वेदान्तविषयक ज्ञान केवळ वरवरचें होतें असें फाजील चिकित्सेखोर गृहस्थांखेरीज कोणी म्हणणार नाहीं.

आतां पंतांनीं भारतभागवतांचा जो काव्यरूपानें अनुवाद केला आहे त्यांत मुळांतील वेदान्तविषय गाळून टाकला आहे यावरून त्यांना वेदान्ताचें फारसें ज्ञान नसावें असा तर्क करण्याकडे कित्येकांची मति धावते. परंतु पंतांनीं वेदान्तविषय जो गाळला आहे तो आपल्या भूमिकेस व उद्दिष्ट धोरणास अप्रस्तुत म्हणून गाळला आहे, हें यापूर्वींच स्पष्ट केलें आहे. वेदान्ताप्रमाणेंच पंतांनीं वर्णाश्रमधर्म, व्रतांचे विधि, सप्तद्वीप, सप्तपाताळ इत्यादिकांचीं वर्णनें, असले अगदीं साधे विषयही गाळले आहेत. मग हेही विषय न समजण्याइतके महामठ्ठ पंत होते असें समजावयाचें कीं काय? परंतु याबद्दल जास्त वाद करीत बसण्याची जरूरीही नाहीं. पंतांनीं ज्या कांहीं थोडक्या ठिकाणीं वेदान्ताचा आदर केला आहे त्या ठिकाणीं तो विषय किती उत्कृष्ट रीतीनें आकलन करून घेऊन मराठींत वर्णन केला आहे हें पाहिलें म्हणजे त्यांच्या वेदान्तज्ञानाविषयीं कोणास शंका घेण्याचें कारण उरणार नाहीं. भागवताचा एकादशस्कंध गहन वेदान्तविचारांनीं भरलेला आहे. परंतु पंतांनीं

या ठिकाणीं नेहमींप्रमाणें वेदान्ताचा अव्हेर न करतां त्याचा सुंदर रीतीनें मराठींत अनुवाद केला आहे. तो पाहिला असतां आमच्या वरील म्हणण्याची सहजच सत्यता पटणार आहे. आतां पंत हे मोठे तत्ववेत्ते नव्हते, त्यांनीं तत्वज्ञानाचे गहन ग्रंथ लिहिले नाहींत असें कोणास पाहिजे तर त्यानें म्हणावें. परंतु त्यांत कांहीं मतलब नाहीं. कारण तत्ववेत्याच्या पदवीवर त्यांना अधिष्ठित करण्याचा कोणीच प्रयत्न केलेला नाहीं.

२२. 'पांडित्याचा शिरोभाग जीं न्यायमीमांसादि शास्त्रें' त्यांचें पद्धतशीर सांगोपांग अध्ययन पंतांचें झालें नसावें असें म्हणण्यास जागा आहे. ते पन्हाळ-गडीं अजमासें १० वर्षें गुरुमुखानें विद्या शिकले. इतक्या अवकाशांत रूपावलि, समासचक्रापासून आरंभ करून, उत्कृष्ट व्युत्पत्ति तयार करून कोणत्याही एका शास्त्रामध्यें निष्णात होण्यास त्यांना वेळ मिळाला असेल हें शक्य दिसत नाहीं. शिवाय त्यांनीं लिहून घेतलेल्या पुस्तकांमध्यें वेदान्ताशिवाय इतर शास्त्रांचें अगर दर्शनांचें एकही पुस्तक दिसत नाहीं. त्यांचा जर कोणत्याही एका शास्त्राबद्दल बाणा असता तर त्या शास्त्रावरील बऱ्याचशा ग्रंथांच्या पोथ्या त्यांच्या संग्रहीं असलेल्या आढळत्या. त्यांचें घराणेंही विद्वानांचें अगर शास्त्रीपंडितांचें नव्हतें. बारामतीस आल्यावरही त्यांनीं न्यायव्याकरणादि शास्त्रांचें कधीं अध्ययन अगर अध्यापन चालविलें असल्याचें दिसून येत नाही. त्यांच्या काव्यसमुद्राचें आलोडन केलें असतांही व्याकरणन्यायमीमांसादि शास्त्रांच्या अध्ययनाची प्रतीति येत नाहीं. उलट ' अनुष्ठितुं ' ' पुनीते ' या व अशाच इतरत्र अगदीं क्वचित् आढळ-णाऱ्या अपाणिनीय प्रयोगांवरून त्यांनीं व्याकरणशास्त्र पढलेलें नसावें असेंच अनुमान होतें. व्याकरणशास्त्रांत पारंगत झालेला मनुष्य असले प्रयोग कधींही करताना.

आणि निबंधमालाकारांनीं प्रतिपादिलेल्या मतांत अणुमात्रही जो सत्याचा अंश आहे, असें आम्हांस म्हणावेंसें वाटतें तो हाच होय. मालाकारांचें प्रतिपादन दुहेरी होतें. ' १ मराठी कवींस व मोरोपंतांस ' पांडित्याचा शिरोभाग जीं न्याय-मीमांसादि शास्त्रें ' त्यांचें मुळींच ज्ञान नव्हतें; २ अगदीं अव्वलपासून अखेरपर्यंत कोणत्याही मराठी कवीस रघुकिरातादि पंडितमान्य काव्यांची बिलकुल ओळख होतीशीसुद्धां दिसत नाहीं. नामदेव, तुकाराम यांची गोष्ट तर बोलायलाच नको; पण पंडित मंडळींत बरेच मोडण्यासारखे जे वामन, मोरोपंत, रामजोशी वगैरे

त्यांच्या ग्रंथांतही कालिदासादिकांचा मागमूसही नजरेस येत नाहीं.' या दुहेरी समजुतीचा दुसरा भाग सध्यां उपलब्ध झालेल्या माहितीप्रमाणें निराधार व त्याज्य ठरतो. परंतु पहिला भाग निदान मोरोपंतांच्या बाबतींत तरी खरा आहे, असें आजही म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. या विद्वत्तेच्या प्रश्नाचा विचार करतांना वा. म. हंसांनीं व पांगारकरांनीं मालाकारांस अगदींच झिडकारून टाकलें आहे व पंतांच्या पांडित्याचा अतिशयोक्तिपूर्ण शब्दांत सर्वत्र गौरव केला आहे. त्यांच्या विवेचनावरून उत्पन्न होणारी संदिग्धता नाहींशी व्हावी यासाठींच येथें येवढा ऊहापोह केला आहे. (याविषयीं आणखी परिशिष्ट ३ पहा.)

२३. परंतु पंतांचें शास्त्राध्ययन फारसें नव्हतें येवढी मर्यादा निर्दिष्ट केल्यावर दुसरी कोणतीच मर्यादा त्यांच्या विद्वत्तेस किंवा ज्ञानलालसेस नव्हती हें लक्षांत ठेवलें पाहिजे. जुन्या तऱ्हेचें शास्त्राध्ययन कितीही गाढ असलें तरी एकदेशीय असतें त्यामुळें मनुष्य संकुचित मनाचा बनण्याचा संभव असतो. तेव्हां त्याचा संपर्क पंतांस झाला नाहीं यांत सर्वस्वी हानीच झाली असें म्हणतां येत नाहीं. पंतांचें शिक्षण अत्यंत व्यापक, उदार व खऱ्या ज्ञानसंग्रहेच्छेनें पेरलेलें होतें. भारत, भागवत व रामायण हे तीन अगडबंबाळ ग्रंथ व अनेक पुराणें ज्यांच्या दृष्टीसमोर नाचत होतीं त्यांचें ज्ञान किती विशाळ असेल हें काय सांगावयास पाहिजे ? त्यांनीं फक्त ५६ च ग्रंथ लिहून घेतले होते यावर फसून जातां उपयोगी नाहीं. यांच्याशिवाय अनेकविध ग्रंथ त्यांच्या वाचनांत आले असले पाहिजेत. त्यांना करतलामलकवत् असलेले भारतभागवतादि ग्रंथ देखील त्यांच्या वंशजांच्या संग्रहीं असल्याचा उल्लेख नाहीं. यावरून त्यांनीं संग्रह केलेले बरेचसे ग्रंथ त्यांच्या पुत्रांनीं बारामतीहून वास्तव्य हालविलें त्यावेळीं नष्ट झाले असावे अगर पांगले असावे असें अनुमान होतें. कसेंही असो, त्यांच्या विद्वत्तेबद्दल साक्ष देणारे प्रत्यक्ष त्यांनीं रचलेले ग्रंथच अस्तित्वांत आहेत त्यांत नुसत्या दृष्टांतादाखल घेतलेल्या विषयांचा संग्रह केला तरी अनेक विषयांवरील ज्ञानाचा तो एक विस्तृत कोशच होईल इतकी बहुश्रुतता. चतुरस्रता त्यांच्या ग्रंथांत भरली आहे. विशेषतः सध्यां उच्च व उदार म्हणून सर्वत्र तोंड भरून नांवाजलें जाणारें शिक्षण किती वरवरचें, तगलुरी व भाडोत्री असतें याचा विचार केला असतां जन्मभर निरपेक्षपणें ज्ञानाची लालसा बाळगून व्यासंग करणाऱ्या आणि निःस्वार्थ बुद्धीनें व निरलसपणानें ग्रंथरचना करणाऱ्या पंतांसारख्या पूर्वकालीन साधुपुरुषांविषयीं धन्यता बुद्धीनें कोणाचेंही मन भरून गेल्याखेरीज राहणार नाहीं.

---

विभाग ४.

# मूळ भागवताचें व पंतकृत भागवती काव्यांचें स्कंधानुक्रमानें तुलनात्मक अंतरंगनिरीक्षण.

१. आतापर्यंत आपण पंतांच्या सर्व भागवती काव्यांचें परिगणन व बाह्य-स्वरूपवर्णन केलें. काव्यरचना काव्यांतील त्यांचे उद्दिष्ट हेतु वगैरे संबंधानेंही यथामति विवेचन केलें. आतां या सर्व भागवती रचनेच्या अंतरंगांत शिरून तिच्या अंतर्यामींचें स्वरूप आपणास अवलोकन करावयाचें आहे.

पंतकवितेच्या अंतर्यामांत शिरून व विशेषत: मूळ संस्कृत ग्रंथांशीं तिची साग्रोपांग तुलना करून पंतांच्या काव्यांचें हार्द (केकावलीशिवाय) प्रबंधरूपानें अजून कोणी प्रकट केलेलें नाहीं. निदान प्रस्तुत लेखकानें येथें जसा प्रयत्न केला आहे तशा धोरणानें पंतकवितेचें विवेचन कोणी केलेलें दिसत नाहीं असें म्हट-ल्यास सत्यापलापाचा किंवा आत्मश्लाघेचा दोष त्याच्यावर येईल असें वाटत नाहीं. पंतकवितेवर आजपर्यंत ज्यांनीं ज्यांनीं लिहिलें त्यांनीं साकल्यानें व सामान्य तऱ्हेनें तिच्या गुणदोषांचें विवेचन केलें. अशा सामान्य विवेचनाच्या व गोळाबेरीज गुणवर्णनाच्या पुढें पांगारकर प्रथम एक पायरी गेले. त्यांनीं पंतांच्या मोठ्या ग्रंथांपैकीं प्रत्येक ग्रंथावर एकेक पृथक् प्रकरण लिहिलें आहे व लहान काव्यांचे चार पांच गट करून त्या सर्वांचा वेगवेगळ्या प्रकरणांत यथोचित परामर्श घेतला आहे. त्यांचें विवेचन किती रसाळ व बहुमोल आहे याविषयीं अभिप्राय देणें म्हणजे सूर्याच्या तेजाळपणाविषयीं मत प्रकट करण्या-सारखेंच आहे. तथापि सामान्य विवेचनापलीकडे त्यांनाही बहुधा जातां आलें नाहीं. मोरोपंतांच्या एकून एक लहान मोठ्या काव्यांचा उल्लेख करून त्यांतील विषयाचें दिग्दर्शन करणें, त्यांचें सामान्य गुणवर्णन करून त्यांतील थो-ड्याशा उत्कृष्ट स्थलांचे उतारे दाखल करणें येवढेंच काम त्यांना करणें शक्य झालें आहे. प्रस्तुत प्रबंधांत केलेलें विवेचन म्हणजे पांगारकरांच्या पुढची एक पायरी आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कवीच्या काव्याचें जास्त सूक्ष्म, विस्तरशः

अवलोकन करून प्रथमपासून शेवटपर्यंत काव्य कसकसें बनत गेलें, त्याचा प्रत्येक भाग कोणत्या हेतूनें व कसा रचला गेला याचें संपूर्ण चित्र वाचकांच्या डोळ्यांपुढें उभें करण्याचा हा प्रयत्न आहे. व त्याबरोबरच कवीच्या कृतींतील निवडक स्थळांशीं वाचकांचा परिचय व्हावा या हेतूनें शक्य तेवढे उतारे देण्याचेंही धोरण ठेवलें आहे. वरील उद्देश डोळ्यांपुढें ठेवून केलें जाणारें येथूनसून सुरू होणारें भागवती काव्यांचें निरीक्षण कोणत्या विशिष्ट मुद्यांवर लक्ष ठेवून केलें आहे तें खालीं जास्त स्पष्ट केलें आहे. त्यावरून वाचकालाही पुढील विवेचन वाचतांना कोणच्या तऱ्हेच्या प्रतिपादनाची अपेक्षा करावी याचा निःसंदेहपणें बोध होईल.

(१) आपल्याला जिचें निरीक्षण करावयाचें आहे ती काव्यरचना सर्व रूपांतरात्मक आहे. अशा रूपांतरात्मक रचनेचें खरें स्वरूप मूळ ग्रंथाशीं तुलना केल्याखेरीज कधींही यथार्थ प्रकट होत नाहीं हें लक्षांत घेऊन पंतकृतीबरोबरच मूळ भागवतांतील वर्णित विषयही एकसारखा वाचकांच्या नजरेसमोर ठेवला आहे. किंबहुना अथपासून इतिपर्यंत मूळ भागवताचा सारांशच पुढील विवेचनांत समाविष्ट केला आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. मूळ भागवत एकसारखें नजरेसमोर ठेवून पंतकृति सर्वत्र त्याच्याशीं ताडून पाहिल्याकारणानें पंतांच्या काव्यरचनेचें रहस्य तर प्रकट होईलच पण भागवतकथाश्रवणाचें फलही वाचकास आयतेंच येथें मिळेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. सतत मुळाशीं तुलना करण्याची दृष्टि ठेवल्याकारणानें भागवतांतील कोणता विषय पंतांनीं गाळला आहे, कोणचा संक्षिप्त केला आहे, कोणचा विस्तृत केला आहे वगैरे गोष्टी स्पष्ट होऊन पंतांचें धोरण व त्यांची रचनाचातुरी रेखल्याप्रमाणें वाचकांच्या नजरेस येईल. प्रस्तुत निरीक्षणांतला हा सर्वांत महत्त्वाचा अंश होय.

(२) पंतांची भूमिका व त्यांच्या काव्याचे उद्दिष्ट हेतु आपण सामान्यतः यापूर्वीच पाहिले आहेत. त्यांनीं केलेली काव्यरचना त्यांच्या भूमिकेस व उद्दिष्ट हेतूंसच कशी अनुसरून आहे हें दाखविण्याकडे येथें विशेष लक्ष ठेवलें आहे.

(३) त्यांच्या काव्याची परिणति, निरनिराळ्या काव्यांचा परस्पर संबंध व परिणाम या गोष्टींकडेही अवश्य तेथें लक्ष पुरविलें आहे. उदाहरणार्थ, पंतांनीं अगोदर रचलेल्या भागवतावरील स्फुट प्रकरणांचा मंत्रभागवताच्या रचनेवर परिणाम झालेला दिसून येतो. अमुक ठिकाणीं अशीच रचना पंतांनीं कां केली याचें

स्पष्टीकरण पुष्कळ वेळां स्फुट काव्यांकडे लक्ष दिल्यानें आपणास मिळतें. तेव्हां या दृष्टीनेंही येथें विचार केला आहे.

( ४ ) क्वचित् पंतांच्या वयोवस्थेवरून व मनोरचनेवरून त्यांच्या काव्यांतील कांहीं विशेषांचा छडा लावतां येतो. उदाहरणार्थ, मंत्रभागवताचा दशम पूर्वार्धच विशेष रमणीय व कृष्णविजयाचा उत्तरार्धच जास्त भरदार व सुंदर, असें कां हें पंतांच्या आयुःक्रमाकडे लक्ष दिल्यानें तेव्हांच समजतें.

इतरत्र फारसे न आढळणारे पुढील विवरणाचे हे चार विशेष झाले. याशिवाय, ५ यथार्थ स्वरूपाविष्करण; ६ गुणदोषविवेचन व ७ निवडक स्थलांचें अवतरण या इतरांनीं अंगीकारलेल्या गोष्टीही येथें आढळून येतील.

( ५ ) यथार्थ स्वरूपाविष्करण, म्हणजे निरीक्षणास घेतलेल्या काव्यांतील विषय व त्याची अंतर्बाह्य रूपरेखा वाचकांच्या दृष्टीसमोर उभी करणें. हें कार्य पांगारकरांनीं केलें आहेच; त्यापेक्षां अधिक सूक्ष्मतेनें येथें करण्याचा मानस आहे.

( ६ ) गुणदोषविवेचन, अर्थात् ' उत्तम ' ' मध्यम ' ' कनिष्ठ ' इत्यादि ' सर्टिफिकिटां ' चा यथायोग्य बटवडा. हा देखील वामन दाजी ओक इत्यादि-करून काव्यसंग्रहाच्या संपादकांनीं टीपांच्या द्वारा व पांगारकरांनीं आपल्या काव्यविवेचनपर प्रकरणांच्या द्वारा केला आहेच. तथापि पूर्वींचे सर्व प्रयत्न जमेस धरून अधिक सूक्ष्मपणानें येथील निरीक्षण केलें असल्यानें यांतील गुणदोषविवेचन अधिक ग्राह्य ठरेल असा भरंवसा आहे.

( ७ ) निवडक स्थलांचें अवतरण; हेंही हंसादिक रसिकांनीं व मुख्यत्वेंकरून पांगारकरांनीं केलेंच आहे. काव्यसंग्रहकारांनींही टीपांमध्यें अलंकारादिकांचें विवेचन करून अशा पद्यांचें दिग्दर्शन केलें आहेच. तथापि प्रस्तुतचा प्रयत्न वरील प्रयत्नांपेक्षां जास्त सूक्ष्म व विस्तृत असल्यानें तो निष्फळ ठरण्याची भीति नाहीं.

२. भागवतासारख्या महत्वाच्या, प्रसंगविशेषीं क्लिष्ट व वेदान्तप्रचुर अशा ग्रंथाचें रूपांतर करतांना स्वभावतःच टीकेची मदत कोणीही घेईल. त्याप्रमाणें पंतांनींही अद्वैतमतप्रतिपादक प्रसिद्ध श्रीधरी टीकेची मदत घेतली आहेच. टीकें-तील आशय पंतांनीं काव्यग्रंथांत आणला असल्याचीं कांहीं ठिकाणें पुढील विवरणांत आपल्याला आढळून येतीलच. शिवाय प्रल्हादचरित्र नामक आपल्या

म्हणनशा स्फुट प्रकरणांत पंतांनीं स्वतः श्रीधरी टीकेला आपण अनुसरलें असल्याचें आदरपूर्वक नमूद केलें आहे.

सत्यं विधातुमिति ज्या पद्याचें मूळ हें तयावरिल ।
श्रीश्रीधरकृतरम्यव्याख्यान, विशुद्धबुद्धि या वरिल ॥ १९ ॥

---

[ पुढील विवेचनांत आरंभीं आरंभीं कंसामध्यें जाड ठशांत जे आंकडे छापले आहेत ते मूळ भागवतांतील अध्यायांचे आहेत. बहुधा त्या त्या अध्यायाचें विवेचन संपल्यावर अध्यायाचा आंकडा टाकला आहे. शिवाय पुढील विवेचनांत जागोजाग कवितांचे जे उतारे घेतले आहेत त्यांत मंत्रभागवतांतील कवितांचा स्थलनिर्देश मुळींच केलेला नाहीं. फक्त स्कंधांतील आर्यांचा क्रमांक तेवढा दिला आहे. अशा स्थलनिर्देश न केलेल्या कविता मंत्रभागवतांतील व ज्या स्कंधाच्या विवेचनांत त्या आल्या असतील त्या स्कंधांतील आहेत असें समजावें. दशमांतील विवेचनांत कृष्णविजयांतील उतारे घेतांनाही कोठें कोठें असाच प्रकार केला आहे. तथापि ज्या काव्याच्या विवेचनांत कवितेचा उतारा घेतला आहे त्याच काव्यांतील ती कविता आहे हें वाचकांच्या सहज लक्षांत येण्याजोगें आहे. ]

---

## [ प्रथम स्कंध ]

३. आतां आपणांस 'सूत उवाच' करण्यास हरकत नाहीं. आपल्या सर्व अष्टादश पुराणांस सूत व शौनक या जोडीच्या संवादानें प्रारंभ होतो हें सुप्रसिद्धच आहे. नैमिषारण्यांत सहस्रवार्षिक सत्र चालू असून तत्प्रीत्यर्थ मोठमोठे पावन महर्षि तेथें जमले असतां सूत पुराणिकांचें तेथें आगमन होतें. तेव्हां यज्ञदीक्षित ऋषींचे प्रमुख शौनक ऋषि, पुढें पुराणांत जो प्रतिपाद्य विषय यावयाचा असेल तो ज्याचें सुसंगत उत्तर होईल अशा तऱ्हेचे प्रश्न सूतांस विचारतात; व नंतर सूत त्यांचें आदरानें उत्तर देऊं लागतात. अशा रीतीनें पुराणास प्रारंभ होतो. या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें भागवतांतही पहिल्या अध्यायांत शौनकांनीं सूतांला बरेच प्रश्न केले आहेत. शौनक विनंति करतातः—हे सूता, १ सर्व पुराणांचें, इतिहासाचें, शास्त्रादिकांचें सारभूत व मनुष्याला निःश्रेयसकर असें जें ज्ञान तुम्ही विनिश्चित केलें असेल तें आम्हांला सांगा. २ भगवंतांनीं वसुदेवदेवकीच्या पोटीं कशाकरितां अवतार घेतला व ३ त्या अवतारांत बलरामासह त्यांनीं कोणकोणचीं ईश्वरकृत्यें

केली तीं आम्हांस निवेदन करा. ४ त्याचप्रमाणें श्रीहरीच्या इतर सर्व अवतारांच्या कथाही आम्हांस कथन करा. याप्रमाणें प्रश्न करून शौनकांनीं

ब्रूहि योगेश्वरे कृष्णे ब्रह्मण्ये धर्मवर्मणि ।
स्वां काष्ठामधुनोपेते धर्मः कं शरणं गतः ॥ भा. १.१.२३.

कृष्ण निजधामास गेल्यानंतर सध्यां धर्म कोणाच्या आश्रयास गेला आहे ? अशीही शेवटीं पृच्छा केली आहे. यथयावत् भागवत ज्याचें उत्तर होऊं शकेल असेच हे प्रश्न आहेत हें त्यांच्या या दिलेल्या सारांशावरून दिसून येईलच. (१). सूतांनीं शुकाचार्यांस वंदन करून उत्तर देण्यास प्रारंभ केला. विरक्त होऊन अधोक्षजाची निर्हेतुक भक्ति करणें हाच सर्वश्रेष्ठ मार्ग असें सूतांनीं प्रतिपादन केलें. ( २ ). प्रथम सृष्टि करण्याच्या इच्छेनें प्रेरित होत्सात्या भगवानानें पुरुषस्वरूप धारण करून योगनिद्राशयन केलें तो इतर सर्व अवतारांचा बीजभूत असा नित्य अवतार सांगितला व नंतर त्याच्या चोवीस अवतारांचें परिगणन करून अशा परमात्मस्वरूपाचें शुद्ध ज्ञान तर्कादिकांनीं होणारें नसून त्याच्या पादसरोजगंधाचा आश्रय केल्यानेंच होईल असा सिद्धांत कथन केला. व, " याकरितांच

सर्ववेदेतिहासानां सारं सारं समुद्धृतम् ।
निःश्रेयसाय लोकस्य धन्यं स्वस्त्ययनं महत् ॥ भा. १. ३. ४१,४२.

असें हें भागवत व्यासांनीं रचून आपला पुत्र जो शुक त्याला पढविलें; तें शुकाचार्य परीक्षितीला कथन करीत असतां मी त्यांच्या अनुग्रहानें ऐकलें; तेंच यथामति तुम्हांला सांगतों, " असेंही सूत म्हणाले. ( ३ ). भागवताचें नांव ऐकतांच शौनकांनीं अधीरतेनें, भागवताची रचना व्यासांनीं केव्हां कोठें व काय हेतूनें केली; त्यांचे पुत्र शुकाचार्य, जे गोदोहनकालपर्यंतदेखील एका ठिकाणीं ठरावयाचे नाहींत, त्यांनीं इतका काल एका स्थानीं वास्तव्य करून परीक्षितीला भागवतसंहिता कशी सांगितली; व परीक्षितराजाला तरी राज्यत्याग करून प्रायोपवेशन करण्यास काय कारण झालें होतें; असे प्रश्न सूतांना केले. सूतांनीं क्रमानें त्यांच्या प्रश्नांस उत्तरें देण्यास आरंभ करून प्रथम भागवतरचनेचा प्रसंग कसा घडून आला तें सविस्तर वर्णन केलें. पूर्णपणें व्रतस्थ राहून वेदांची व गुरूंची सेवा केल्यानंतर व 'सर्वार्थपरिबृंहित' असें भारत रचल्यानंतर देखील स्वतःच्या मनास शांतता प्राप्त होत नाहीं असें आढळून आल्याकारणानें व्यास महर्षि आपल्या आश्रमांत चिंताक्रांत होऊन बसले असतां अकस्मात् नारदमुनि त्यांच्या

आश्रमांत येऊन पातले. ( ४ ). व्यासकृत सत्काराचा स्वीकार करून नारदांनीं " आपण असे खिन्न कां दिसतां ? " असें त्यांना विचारिलें. तेव्हां " कांहीं केल्या माझ्या आत्म्याला शांति मिळत नाहीं, तर याचें कारण काय तें आपण सांगा. " असा काकुळतीचा प्रश्न भगवान् व्यासांनीं त्यांस केला. व्यासांनीं भारत रचून, वेदांची व्यवस्था लावून या जड जगतावर अनंत उपकार केले होते व स्वत: ब्रह्मज्ञानही प्राप्त करून घेतलें होतें; तथापि सर्वस्वीं भक्तिमय, परमार्थमय असें त्यांचें अंत:करण अजून झालें नव्हतें. आणि या दृष्टीनें नारदांची भूमिका त्यांच्याहून वरचढ होती. जिकडे तिकडे श्रीकृष्णभक्तीचा प्रसार करण्यासाठीं नारदांचा संचार त्रिभुवनांत असावयाचा; त्यांनीं अर्थातच व्यासांच्या मन:स्थितींतील दोष तेव्हांच ओळखला व निरामय मनानें भगवद्यश वाखाणण्यास त्यांस सांगितलें. ईशभक्तीचें परमभाग्य कसें असतें तें सोदाहरण सांगण्याकरितां नारदांनीं आपलेंच पूर्वजन्मीचें चरित्र व्यासांस सांगितलें. नारद हे पूर्वजन्मीं केवळ एक दासीपुत्र होते व त्यांची आई हरिभक्तिपरायण अशा कांहीं साधूंच्या आश्रमीं कामास होती. फक्त चातुर्मास्यांत साधु आश्रमीं येत व त्यांची सेवा करणें त्या-वेळीं छोट्या नारदास भाग पडे. पण हळुहळु ते संत जें परमेशाचें भजन करीत त्याची गोडी बाल नारदास लागूं लागली व त्या संतांची सेवा करणें हें त्याचें अत्यंत आवडीचें काम होऊन बसलें. अशा रीतीनें परमात्म्याच्या ठायीं रति उत्पन्न झाल्यानंतर साधूंनीं त्या 'अनुरक्त, नम्र, निष्पाप, श्रद्धाळू, निग्रही व सेवा-शील' अशा बालकास ब्रह्मज्ञानाचा उपदेश केला व ते आश्रमांतून निघून गेले. त्यावेळीं नारद केवळ पांच वर्षांचा बालक होता. कर्मयोगानें त्याची आईही सर्प-दंशानें मरण पावली. तथापि हा आयताच एक मायापाश नाहींसा झाला म्हणून त्या लोकविलक्षण मुलानें आनंद मानून अरण्याचा रस्ता धरला. भक्तिप्रेमाची पराकाष्ठा झाल्यानंतर भक्तवत्सल परमात्मा त्याच्या हृदयांत हळुहळु प्रकट झाला. परंतु दर्शन होतें न होतें तोंच तें परमेश्वरस्वरूप त्याच्या हृदयांतून नष्ट झालें. तथापि लवकरच " कर्मप्राप्त भोग सरल्यानंतर ही शूद्रतनु सोडून पुढच्या जन्मीं तूं माझा परमभक्त होशील, " अशी भगवंताची वाणी त्याच्या कानीं पडली व तो स्वस्थ झाला. नंतर भोग सरेपर्यंत हरिनामस्मरण करीत नारदानें काळ कंठला. व अंतीं शूद्रतनु सोडून पुढील जन्माचे वेळीं ब्रह्मदेवाचा मानसपुत्र या नात्यानें त्रिभुवनांत ईशभक्तीचा प्रसार करण्यासाठीं त्या नित्यमुक्त मुनीचा अवतार या

जगतीतलावर झाला. याप्रमाणें नारदांनीं आपलें पूर्ववृत्त व्यासांस सांगितलें व त्याच्या योगानें भगवद्भक्तीचें माहात्म्य केवढें मोठें आहे हें त्यांच्या मनावर बिंबवून आपण अंतर्धान पावले. ( ५, ६ ). तदनंतर व्यासांनीं सरस्वतीच्या तीरीं शम्याप्रास नामक आश्रमामध्यें ही मनास शांति देणारी सात्वतसंहिता रचली व आपला मुलगा शुक याला ती पढवली.

४. याप्रमाणें भागवतरचनेची हकीकत प्रथमच्या सवासहा अध्यायांत भागवतकारांनीं वर्णिली आहे. आतां पंतांनीं मंत्रभागवतांत याचा कसा काय तर्जुमा वठविला आहे तो पाहूं. सवासहा अध्यायांपैकीं पहिल्या चार अध्यायांतील सूत-शौनकांचीं प्रश्नोत्तरें, सूतांचा वेदान्त व त्यांनीं केलेलें चोवीस अवतारांचें वर्णन वगैरे गोष्टींची पंतांनीं पहिल्या चारच आर्यांत वासलात लावून टाकली आहे. त्यानंतर व्यास सचिंत बसले असतां नारद त्यांस येऊन भेटतात व त्यांचें प्रश्नोत्तर होतें तो प्रसंग मात्र पांच आर्यांत पंतांनीं मनोहर रीतीनें वर्णिला आहे.

> वाखाणावें प्रेमें भगवद्यश मुनिवरा तुवां आतां ।
> हृदय प्रसन्न होतें प्रभुच्या महिमांचि आदरें गातां ॥ ७ ॥

ही सुंदर आर्या स्वतःचीच रचून घालून नंतर नारदांच्या तोंडच्या मुळांतील दोन श्लोकांचें बहारीचें भाषांतर पंतांनीं दोन आर्यांत केलें आहे. पैकीं दुसरा श्लोक—

> मूळ—तद्वाग्विसर्गो जनताघविप्लवो यस्मिन्प्रतिश्लोकमबद्धवत्यपि ।
> नामान्यनन्तस्य यशोऽङ्कितानि शृण्वन्ति गायन्ति गृणन्ति साधवः ॥
> भा. १. ५.११.

> पंतकृति—देवाचीं ज्यामध्यें नामें सुयशोंकितें प्रतिश्लोकीं ।
> अघ नुरवीच अबद्धहि असतां तो वाग्विसर्ग या लोकीं ॥ ९ ॥

चवथ्या चरणाखेरीज सर्व श्लोकाचें पंतांनीं अक्षरशः परंतु सुंदर भाषांतर केलें आहे. यानंतर मुळांत नारदांचें भाषण पुष्कळ लांब पण सुंदर आहे. तथापि संक्षेपाकरितां पंतांनीं तें गाळलें आहे. त्यानंतर नारदांनीं सांगितलेल्या पूर्वजन्मींच्या आत्मचरित्राचा ( मूळ श्लोक ४७ ) पंतांनीं एकाच आर्येंत खुबी-दार संक्षेप केला आहे.

> वाक्यें भागवतांचीं कृष्णयशोमृतपरिप्लुतें प्यालों ।
> धालों, असोनि दासीसुत, मी बा ब्रह्मपुत्र कीं झालों ॥ १० ॥

मुळांतील ही नारदचरित्राची हकीकत फार रमणीय असूनही पंतांनीं तिचा अतिसंक्षेप केला याचें कारण याच हकीकतीवर बरोबर ४७ आर्यांचेंच 'नारदाभ्युदय' नांवाचें स्फुट प्रकरण पंतांनीं लिहिलें आहे हें होय. हें प्रकरण मुळाच्या आधारानेंच रचलें असलें व याची पद्यसंख्याही मुळाइतकीच असली तथापि हें केवळ भाषांतररूप नाहीं. आर्या १० ते १४ पर्यंत पंतांनीं प्रथम महत्सेवा, त्यानंतर महत्कृपा, त्यामुळें धर्मश्रद्धा वगैरे जो भगवत्कृपा होईपर्यंतचा आत्मोन्नतीचा क्रम सांगितला आहे त्यास मुळांत फारसा आधार नाहीं. असें असूनही पंतांनीं या आर्या स्वतःच्या कल्पनेनें सुंदर बठविल्या आहेत. मुळामध्यें नारद अरण्यांत ज्या वाटेनें गेला तिनें लागलेल्या प्रदेशाचें स्वभावोक्तिपूर्ण वर्णन आहे. ( अ. ६, श्लो. ११–१४ ) पंतांनीं तें प्रधान कथाभागास अनुपयुक्त म्हणून गाळून टाकलें आहे. असें आहे तरी कांहीं ठिकाणीं मुळाचें सुंदर रूपांतरही पंतांनीं केलेलें आहे. एक उदाहरण,—

मूळ—तस्मिंस्तदा लब्धरुचेर्महामुने प्रियश्रवस्यस्खलिता मतिर्मम ।
यथाहमेतत्सदसत्स्वमायया पश्ये मयि ब्रह्मणि कल्पितं परे॥ भा. १.५.२७

पंतकृति–करितां नित्य हरिकथाश्रवण न वाटेचि अन्य रुचिर मला ।
श्रीकृष्णींच महात्मा, व्यासमुनिवरा, धरूनि रुचि रमला ॥ ना भ्यु. ८

येथें पंतांनीं मुळांतील ब्रह्माची व अद्वैतप्रतिपादनाची भानगड ( 'मयि परे ब्रह्मणि') काढून टाकून त्या ठिकाणीं मार्मिकपणें भाविक लोकांस समुचित वाटणाऱ्या श्रीकृष्णाची योजना केली आहे. अशा रीतीनें ठिकठिकाणीं मुळांत स्वतःच्या भूमिकेस अनुकूल अशा सुधारणा करून, कोठें कोठें

ज्यांच्या बुद्धींत सुनय शोभति मणिदीप जेविं समयांत । ना. भ्यु. २

असे स्वतःचे समर्पक दृष्टांत घालून पंतांनीं हें आख्यान फार सुंदर केलें आहे. तथापि मूळही अत्युत्कृष्ट आहे. केव्हां केव्हां मुळांत एका तऱ्हेचें वर्णन असतें तर पंत जरा निराळ्या तऱ्हेनें, त्यांत थोडासा अलंकार वगैरेचा चटकदारपणा घालून वर्णन करतात. दोन्ही वर्णनें अत्युत्कृष्टच; त्यांत सरस कोणचें निरस कोणचें हें निवडण्याची पंचाईत पडते. ध्यानधारणेच्या योगानें नारदास प्रथम भगवद्दर्शन झालें तो प्रसंग पहा.—

ध्यायतश्चरणाम्भोजं भावनिर्जितचेतसा ।
औत्कण्ठ्याश्रुकलाक्षस्य हृद्यासीन्मे शनैर्हरिः ॥ भा. १.६.१७.

प्रेमातिभरनिर्भिन्नपुलकाङ्गोऽतिनिर्वृतः ।
आनन्दसंप्लवे लीनो नापश्यमुभयं मुने ॥ भा. १.६.१८.

हें साधेंच पण सद्भावानें आर्द्र झालेलें वर्णन उत्कृष्ट नाहीं असें कोण म्हणेल ? पण पंतांनीं त्या प्रसंगाचें

पांचा वर्षाचा मीं दासीसुत काय ! विश्वगुरु काय ! ।
ध्यातां हलुहलु हृदयीं स्फुरला सच्चित्सुखैकमय काय ॥ ना. भ्यु २०.

असें विषमालंकाराची थोडीशी चटक घालून जे वर्णन केलें आहे तेंही सुंदरच आहे. तथापि एकादेवेळेस यमकाकरितां पंत रसहानिकर दृष्टांताची योजना करतात.

थोरीं तसाचि दावी देव दयानिधि अनुग्रह ल्हानीं ।
काय लघूचि क्षेत्रीं न करी, होउनि अनुग्र, हल हानी ? ॥ ना भ्यु २१.

या ठिकाणीं नांगराचा दृष्टांत केवळ यमकाकरितां आणला आहे तो लहान मोठ्या सर्वांशीं सारखें वागण्याची प्रवृत्ति येवढ्यापुरता समर्पक आहे. पण नांगर क्षेत्रांची ' हानी ' करतो, त्यांना कणून काढतो, त्याचा दृष्टांत ईश्वराला देणें म्हणजे औचित्याची हानीच करणें होय. नांगराच्या खणण्यामुळें पुढें शेतें चांगलीं पिकतात हें खरें पण अलंकाराची समर्पकता ठरवण्यास इतक्या दूरचे व कवीनें उल्लेख न केलेले परिणाम शोधीत बसणें हेंही इष्ट नाहीं. कवीनें तर उलट ' देव दया दावी ' व ' हल हानी करी ' असें म्हणून दृष्टान्त व दार्ष्टा-न्तिक यांचे धर्म अगदीं विरुद्ध असल्याचें वर्णन केल्यामुळें येथील अलंकार दुष्ट व रसहानिकर झाला आहे. वस्तुतः येथें शेतांवर सर्वत्र सारख्या पडणाऱ्या पावसाचा दृष्टांत समुचित दिसला असता. पण यमकाकरितां पंतांना नांगर ( हल ) ओढून आणणें भाग पडलें आहे. याच्या उलट केवळ यमकाकरितां आणलेले पंतांचे कांहीं दृष्टान्त अत्यंत समर्पकही असतात. उदाहरणार्थ,—

बहु वाढेल प्रेमा, हा गेला जेंवि मंडपा वेल ॥ ना. भ्यु. २२.

येथें पूर्वीच्या ओळींतील ' खंड पावेल ' या अक्षरांशीं जुळण्याकरितां वेलाची व मंडपाची उपमा योजिली आहे. पण ती समर्पक व सुंदर असल्यानें येथें फार शोभली आहे.

तेव्हां याप्रमाणें हें साधेंच परंतु मधून मधून पंतांनीं आपल्या स्वतंत्र कल्प-नांनीं सजविलेलें ' नारदाभ्युदय ' प्रकरण फार सुंदर बठलें आहे.

येथें शौनकांच्या भागवतरचनेविषयींच्या पहिल्या प्रश्नावरील सूतांचें उत्तर संपलें. यापुढें दुसऱ्या प्रश्नास उत्तर देण्याकरितां सूत पुराणिक परीक्षितीच्या हकीकतीकडे वळले आहेत.

५. अश्वत्थाम्यानें द्रौपदीच्या सर्व पुत्रांचा घात केल्यामुळें ती अतिशय विव्हळ झाली, तिचें सांत्वन करून श्रीकृष्णासहित अर्जुन अश्वत्थामावर चालून गेला. अश्वत्थाम्यानें सोडलेल्या ब्रह्मास्त्राचें श्रीकृष्णकृपेनें परिमार्जन करून अश्वत्थामाला बांधून अर्जुनानें द्रौपदीसमोर आणिलें पुत्रशोकानें अगोदरच विव्हल झालेल्या त्या प्रेमळ माउलीचें हृदय अश्वत्थामाची, आपल्या गुरुपुत्राची, ती करुण स्थिति पाहून जास्तच कळवळून गेलें. अश्वत्थामाला नमस्कार करून आपल्या पतींना ती म्हणाली,—" मुच्यतां मुच्यतामेष ब्राह्मणो नितरां गुरुः ।

मा रोदीदस्य जननी गौतमी पतिदेवता ।

यथाहं मृतवत्सार्ता रोदिम्यश्रुमुखी मुहुः ॥ " भा. १.७ ४७.

आईचें हृदय आईला कळतें. अश्वत्थाम्यानें जरी तिचा घोर अपराध केला होता तरी त्याला मारून त्याच्या आईला आपल्यासारखेंच दुःख करायला लावावें ही कल्पना तिला सहन झाली नाहीं. नंतर अश्वत्थामाला त्याच्या मस्तकांतील मणि काढून घेऊन सोडून देण्यांत आलें. ( ७ ). पुढें युधिष्ठिराच्या राज्याची सर्व व्यवस्था लावून श्रीकृष्ण द्वारकेला जावयास निघाला. तो रथांत पाय टाकतो आहे इतक्यांत निष्पांडवी पृथ्वी करण्याच्या उद्देशानें अश्वत्थाम्यानें सोडलेलें ब्रह्मास्त्र पांडवांना व उत्तरेच्या गर्भाला ताप देऊं लागलेलें पाहून आपल्या सुदर्शनाच्या योगानें त्यानें ब्रह्मास्त्राचें निवारण केलें व पुनः तो जाण्यास निघाला. परंतु कुंतीनें व इतरांनीं त्याची प्रार्थना करून त्याला राहवून घेतलें.

विपदः सन्तु नः शश्वत्तत्र तत्र जगद्गुरो ।

भवतो दर्शनं यत्स्यादपुनर्भवदर्शनम् ॥ भा. १.८. २५.

अशा रीतीनें कुंतीनें केलेली कृष्णाची प्रार्थना सर्वच अतिशय प्रेमळ व हृदयद्रावक आहे. भागवतांत देखील तिला तोड क्वचित्च सांपडेल. ( ८ ).

६. पंतांनीं ह्या सर्व सुरुवातील अतिसुंदर कथाभाग २१ आर्यांत वर्णिला आहे. व पंतांच्या नेहमींच्या धावत्या पद्धतीनें तो सुंदरही वठला आहे. द्रौपदीनें अश्वत्थामाला सोडून दिल्याचा प्रसंग पंतांनीं एकाच आर्येत उत्कृष्ट रेखाटला आहे.

यद्यपि बंधादि उचित कृष्णेला दैन्य तें पहावेना ।

' सोडा ' म्हणे ' गुरुसमचि गुरुसुत, अपमान मज सहावेना ' ॥२१॥

तथापि एकुलता एक पुत्र मेल्यानें अश्वत्थामाच्या आईला जें अपरंपार दुःख होईल त्याची कल्पना येऊन द्रौपदीचें हृदय कळवळल्याचा मुळांतील उल्लेख पंतांनीं अगदींच गाळला आहे. त्याचप्रमाणें कुंतीची हृदयस्पर्शी कृष्णप्रार्थनाही गाळून टाकली आहे. पंतांस केव्हां केव्हां घाई फार होते त्यामुळें मुळांतील सुंदर काव्यस्थळेंही कित्येकवेळां सुटून जातात.

७. यानंतर युद्धांत मारले गेलेल्या बांधवांबद्दलची धर्मराजाच्या मनाची तळमळ कांहीं केल्या शांत होईना तेव्हां तो व इतर मंडळी स्यमन्तपंचकीं भीष्माकडे उपदेश ऐकण्याकरितां जातात. भीष्म या मंडळींना सर्व धर्मांचें व तत्वज्ञानाचें कथन करून व अंतकाळीं श्रीकृष्णाची स्तुति करून प्राण सोडतात. ( ९ ). श्रीकृष्णाची स्तुति करून त्याच्या डोळ्यासमोर हा जडदेह सोडून त्याच्याच कैवल्यस्वरूपीं मिळून जाण्याचें हें भीष्मांचें भाग्य पंतांनीं आपल्या एका सुंदर स्फुट प्रकरणांत वर्णिलें आहे. मुळांत भीष्मनिर्याणाच्या अध्यायाचे ४९ श्लोक असून पंतांनीं त्याचीं २०० पद्यें केलीं आहेत. पहिल्या १९० आर्या असून पुढील श्लोक आहेत. पहिल्या सहा आर्यांनीं मंगलाचरण करून सत्कथा गाण्याचा झालेला आपला निश्चय पंत नंतर प्रकट करतात.

भगवद्भक्तानुज्ञा कीं गाव्या सत्कथा यथामति तें ।
स्वीकारिलें स्वहित म्यां नमुनि स्वसुरद्रुमा रमापतितें ॥ भी. भा. ७.

यानंतर, शुकभाषणानुकार प्रेमें करितो मयूर हें चित्र । भी. भा. ९.
असें स्वतःच्या कृतींविषयीं धन्यतामूलक आश्चर्य प्रकट केलें आहे. वस्तुतः या भीष्मनिर्याणाच्या कथेंत शुकभाषणाचा कांहींएक संबंध नाहीं. सध्या सूताचेंच भाषण चाललें असून शुकाचार्यांना कथाप्रांतांत येण्यास अजून पुष्कळ अवकाश आहे. तथापि सर्व भागवत हें शुकाचार्यांचें, तेव्हां उपलक्षणानें येथेंही आपण शुकभाषणाचाच अनुवाद करितों आहों असें पंतांनीं वर्णन केलें असावें. नंतर ‘ आर्या आर्यांसि रुचे ’ या सुप्रसिद्ध आर्येनें आर्याच्छंदाची प्रशंसा करून

म्हणऊनि याचि च्छंदें नवर्मींची वर्णितों कथा सुरसा ।
त्यजित कदापि न अर्था कृपण जसा, कीं नभःपथा सुरसा ॥ भी.भा.११

असा आपला उद्देश निवेदन केला आहे. याप्रमाणें प्रास्ताविक ( भी. भा.१-११ ) झाल्यानंतर, पंतांनीं मुळांतील कथाभागास आरंभ केला आहे. प्रथम कौरवांच्या मनांत दुराग्रह दृढ करून युद्धापर्यंत पाळी आणावयाची; युद्धामध्यें पांडवांकडून

कौरवांस मारवून नंतर त्याबद्दल धर्मराजाच्या मनांत खंती उत्पन्न करावयाची व आपला भक्त जो भीष्म त्याला यश प्राप्त करून देण्याकरितां त्याच्या तोंडून धर्मराजाच्या सांत्वनार्थ तत्त्वज्ञान वदवायचें – वगैरे सर्व श्रीकृष्णाच्या योजनेचें मुळांत नसलेलें वर्णन पंतांनीं पुढील तेरा आर्यांत फार मार्मिकपणें केलें आहे. ( भी. भा. १२–२५)

भगवदभिप्राय असा कीं झाला तप्त दुःसहें प्रीष्में ।
तो जेंवि मयूर घनें, बोधावा धर्म सज्जनें भीष्में ॥ भी. भा. २१.
कुरुगुरु कवि रवितेजा संप्रति करणार देहसंन्यास ।
धन्यास त्यास यावें हें यश देवूं नयेचि अन्यास ॥ भी. भा. २२.

अशा मायावी श्रीकृष्णाच्या योजनेच्या अधीन असलेले सर्व, स्वतः श्रीकृष्ण सुद्धां, उपदेशग्रहणार्थ नंतर भीष्माकडे जातात. तो प्रसंग ओळखून अनेक तपोधन ऋषींही तेथें येतात. ( भी. भा. २६–४१ ) भक्तश्रेष्ठ भीष्मांनीं श्रीकृष्णाची मनोमय पूजा केली तो उदात्त प्रसंग दोघांनींही एकेका पद्यांत गंभीर रीतीनें वर्णिला आहे.

मूळ–कृष्णं च ' तत्प्रभावज्ञ ' आसीनं जगदीश्वरम् ।
हृदिस्थं पूजयामास माययोपात्तविग्रहम् ॥ भा. १. ९. ५.
पंतकृति–मायायोगें मानववेष धरुनि ' भार भूमिचा हरिला ' ।
ज्या जगदीशें कृष्णें पूजी हृदयांत भीष्म त्या हरिला ॥ भी. भा. ४२.

' तत्प्रभावज्ञ ' याचा अर्थ पंतांनीं जरी मार्मिक रीतीनें विशद केला आहे तथापि त्या मुग्धार्थक शब्दानेंच मुळाला जी गोडी आली आहे, ती अप्रतिम आहे. नंतर भीष्म ' निर्मळ विवेकमानसहंस कसे शोककर्दमें किटलां । ' अशी पांडवांस पृच्छा करून अत्यंत गोड, प्रेमळ व वात्सल्ययुक्त वाणीनें त्यांचें सांत्वन करतात. ( भी भा. ४३–८४ ). मुळांत हें भीष्मांचें भाषण १२ श्लोकांचें आहे, व तें उत्कृष्टच आहे. पण येथें पंतांनीं वात्सल्यांत व प्रेमळपणांत, मुळावर ताण केली असें म्हणावें लागतें. या ४१ आर्या आम्हांस तरी या प्रकरणांत अति उत्कृष्ट वाटतात. कुंतीनें पतिनिधनानंतर पुत्रांकरितां जे अनेक कष्ट सोसले त्यांचा भीष्म कळवळ्यानें उल्लेख करितात. पतिनिधनोत्तर अनाथ झालेली स्त्री हें संसारांतील नेहमींचें करुण दृश्य होय.

मूळ— संस्थितेऽतिरथे पाण्डौ पृथा बालप्रजा वधूः ।
युष्मत्कृते बहून्क्लेशान्प्राप्ता तोकवती मुहुः ॥ भा. १. ९. १३.

पंतकृति– बहुकष्ट तुम्हां बाळांकरितां त्या पांडुमृत्युपासून
अद्यापि पावती ती माझी सुगुणामृतप्रपा सून ॥ भी. भा. ५५.

यानंतर, मुलगे शोकग्रस्त किंवा संसारांत उदास असले म्हणजे आईला फार दुःख होतें तेव्हां तुम्ही दुःखी होऊं नका, असें भीष्म सांगतात.

मातेचें मन असतां संसारीं सुत उदास कळकळतें ।
गंगेच्या वात्सल्यावरुनि असें मज, बुधा, सकळ कळतें ॥ भी. भा.५७

येथें प्रकट झालेली पंतांची सहृदयता केवळ अनुपम आहे. मुलांच्या उदासीनतेमुळें मातेच्या मनाला फार दुःख होतें, हें वर्णन व त्याच्या समर्थनाकरितां भीष्मांनीं स्वमाता गंगा इचा दिलेला दाखला मुळांत नाहीं. कौटुंबिक प्रेमाचा उल्लेख करण्याचा प्रसंग आला कीं पंतांच्या सहृदयतेला कसा पाझर फुटतो व ते कसें हृदयंगम वर्णन करतात याचा आर्या ५५–६० हा एक उत्कृष्ट मासला आहे.

" होणार जाणार सर्व कालरूपी परमेश्वराच्या अधीन असतें तेव्हां तुम्ही परमेश्वराची भक्ति करा. अंतकाळीं प्रत्यक्ष श्रीकृष्ण मज भक्तापुढें येऊन उभा राहिला आहे हें माझें केवढें भाग्य ! " येथें पंतांनीं एका श्लोकाचें भाषांतर मुळाशीं जरा विसंगत असें केलें आहे.

मूळ —तस्मादिदं दैवतन्त्रं व्यवस्य भरतर्षभ ।
तस्यानुविहितोऽनाथा नाथ पाहि प्रजाः प्रभो ॥ भा. १. ९.१७.

यांतील उत्तरार्धाचा अर्थ, ' त्याचा ( श्रीकृष्णाचा ) अनुवर्ती होऊन, हे राजा, **आपल्या अनाथ प्रजांचें पालन कर** ' असा उघड असतांना पंतांनीं त्याचें

व्हावें अनुवर्ती या प्रभुचें, याचि प्रभूत्तमा मागें ।
' स्वामी प्रभुजी, पाळा प्रजा अनाथा ' असेंचि मागावें ॥ भी. भा.६६

असें भाषांतर केलें आहे. येथें ' श्रीकृष्णापाशीं असें मागावें ' असा अर्थ पंतांनीं कोठून उसना आणला आहे व असें विपर्यस्त भाषांतर कशाच्या आधारानें केलें आहे याचा कांहीं बोध होत नाहीं. पुढें पंतांनीं उत्कृष्ट भाषांतराचा एक नमुना दाखविला आहे.

मूळ—तथाप्येकान्तभक्तेषु पश्य भूपानुकम्पितम् ।
यन्मेऽसूंस्त्यजतः साक्षात्कृष्णो दर्शनमागतः ॥ भा. १. ९. १२.

पंतकृति—जे निरुपाधिक सेवक देव करी त्यांवरीच फार कृपा ।
आला मरणावसरीं मज भेटाया पहा मुकुंद, नृपा! ॥ भी. भा. ७९
नंतर, जेव्हां मानेल मना तेव्हां टाकीन या शरीरा हो ।
तोंवरि मदग्रभागीं हा गीतामृतनिधी उभा राहो ॥ भी. भा. ८४.

असें म्हणून भीष्म स्वस्थ राहतात. मुळांत नसलेला गीतेचा उल्लेख पंतांनीं येथें फार मार्मिकपणें केला आहे.

यापुढें युधिष्ठिर चतुर्विध पुरुषार्थ, बहुविध धर्म वगैरे जाणण्याकरितां भीष्मास प्रश्न विचारतो. भीष्म त्याचें व सभोंवार असलेल्या मंडळींचें ज्ञानसंतर्पणानें समाधान करतात (भी. भा. ८४–१०२). भीष्मांकडून वदविण्याची ही सर्व श्रीकृष्णाचीच योजना होती असें एक मनोहर कल्पना योजून पंत सांगतात.

वाजविला कृष्णें तो सद्गुंशज मधुर शांत नव पावा ।
कीं बहु सुखावि, जन हो, सेवुनि हा स्वहित बोधपर, पावा ॥भी.भा. ९७

ही कल्पना व हें वर्णन पंतांचें स्वतःचेंच आहे. येथें श्लेषानुप्राणित रूपक अलंकार आहे. अशा तऱ्हेचे सुंदर रूपक, अतिशयोक्ति, इत्यादि अलंकार या काव्यांत पुष्कळच आढळतात. नंतर कृष्णाच्या ठिकाणीं निश्चल ध्यान लावून भीष्म श्रीकृष्णाची स्तुति करूं लागतात. (१०३–१२०) श्रीकृष्णानें कृपादृष्टीनें भीष्मांकडे अवलोकन केलें तेव्हां

प्रभुदृष्टि माय, भीष्मा वत्साला होय भव्य धारा हे ।
आलिंगी करुणार्द्रा, देहीं कांहींच न व्यथा राहे ॥ भी. भा. १०८.

यानंतर मुळांत पुष्पिताग्रा वृत्तामध्यें ११ श्लोकांत भीष्मांनीं श्रीकृष्णाची स्तुति केली आहे. या 'गंगासुतकृत भगवन्नुतिची गोडी उदंड असे कांहीं । अमृतनदींतहि नाहीं' असें जें पंतांनीं म्हटलें आहे तें अगदीं खरें आहे. ही स्तुति मराठींत उतरतांना 'वृत्त जरि तेंच । अवलंबावें तरि तें अडचण कांहीं तरीहि करितेंच ॥' म्हणून पंतांनीं आपल्या सवयीच्या आर्यावृत्तामध्येंच त्या स्तुतीची रचना केली आहे. मुळांतील ११ श्लोकांच्या पंतांनीं ५२ आर्या केल्या आहेत. पंतांच्या आर्या चांगल्या साधल्या आहेत. पण मुळांतील सुश्लिष्ट श्लोकाचा अर्थ ४।५ आर्यांमध्यें वांटावा लागल्याकारणानें जरा फाकटपसारा झाल्यासारखा वाटतो. शिवाय या स्तुतीच्या बाबतींत मुळांमध्यें फारशी भर घालावयाची नाहीं व मुळांतील एक अक्षरही वर्ज करावयाचें नाहीं असा पंतांनीं बेत केलेला दिसतो.

यामुळे प्रतिभेस थोडें बंधन पडल्यासारखें झालें आहे. तथापि अशा बंधनाच्या स्थितींत पंतांनीं केलें आहे तें काम खरोखरच आश्चर्यजनक आहे. रूपांतर करतांना प्रथम अंगीकारलेला आटोपशीरपणा पुढें तसाच कायम राहिलेला दिसत नाहीं. प्रथमच्या श्लोकांपेक्षां पुढील पुढील श्लोकांचा पंतांनीं अधिक अधिक विस्तार केला असल्याचें दिसून येतें. मुळांतील तिसरा श्लोक पंतकृत भाषांतरासहित येथें देतों. म्हणजे त्यांची एकंदर घाटणी कळून येईल.

मूळ—युधितुरगरजोविधूम्रविष्वक्कचलुलितश्रमवार्यलंकृतास्ये ।
मम निशितशरैर्विभिद्यमानत्वचि विलसत्कवचेऽस्तु कृष्ण आत्मा ॥
भा. १. ९. ३४.

पंतकृति – युद्धीं अश्वखुरांनीं धूळ उडविली, तिणें सकळ भरले ।
मुखरुचि न मळो म्हणउनि, जाणों रक्षावया पुढें सरले ॥
सर्वत्र चपल धांवति, अलक हरिति परि पुनः पुन्हा येती ।
श्रमजलबिंदु जयाच्या वदना शोभा मनोहरा देती ॥
माझ्या तीक्ष्णशरांहीं ज्याचें खंडूनि कवच, वपु मम ।
केलें त्या कृष्णीं हो मन जैसें लवण सागरीं मम॥ भी.भा.१२७–१२९.

येथें पहिल्या आर्येतील मनोहर उत्प्रेक्षा पंतांचीच आहे. तिला मुळामध्यें 'विष्वक्लुलित' या शब्दांमध्यें किंचित् आधार आहे. मुळांतीलच वर्णन आपल्या कल्पनाशक्तीनें किंचित् वळवून पंत त्याचे अलंकार कसे घडवतात याचें हें एक सुंदर उदाहरण आहे. मूळ भागवतामध्यें अलंकार थोडे आढळतात पण पंतांनीं आपलीं भागवती काव्यें त्याच्याच आधारानें लिहिलीं असूनही त्यांच्या ग्रंथांत चमत्कृतिपूर्ण व आल्हादक अलंकार रचून भरले आहेत. भीष्मभक्तिभाग्यांतच कांहीं नाहीं तरी पन्नास एक अलंकार सहज आढळतील. त्यांपैकीं कांहीं तर फार सहृदय व रसपोषक असे आहेत. स्तुति संपल्यावर भीष्मांच्या देहावसानाचा प्रसंग मुळाप्रमाणेंच पंतकृतींतही उत्कृष्ट साधला आहे. (१७२–१९०). पुढील आर्यांतील वर्णन अत्यंत उदात्त असून त्यांतील अलंकारही बहारीचे आहेत.

(उपमा) भगवान् कृष्णचि साक्षात् ब्रह्म म्हणुनि भीष्मराय तो यांत ।
मिसळे जसें नभ नभीं, कीं तेजीं तेज, तोय तोयांत ॥
भी. भा. १७४

( उत्प्रेक्षा ) पुष्पांची वृष्टि गमे ये खगमेला रडें अनावर तें ।
तद्बाष्पबिंदुवृंदचि पडलें तत्पुत्रसज्जनावरतें ॥ भी. भा. १८०.

या आर्या स्वतंत्र पंतांच्याच आहेत. स्वपुत्राचें निधन पाहतांच आकाशांतील गंगेला रडें आलें व पुष्पांच्या रूपानें जणूं काय तिनें ढाळलेले अश्रूच तिच्या प्रियपुत्राच्या शवावर पडले ही दुसऱ्या आर्येतील कल्पना अत्यंत हृदयंगम आहे पंत स्वतः वात्सल्याची मूर्तीच होते. त्यांनीं या काव्यांत मातापुत्रांच्या प्रेमाचा अनेकवार उल्लेख मोठ्या सहृदयतेनें केला आहे ( वर उद्धृत केलेल्या आर्या ५७, १०८ पहा. ) याप्रमाणें **भीष्मभक्तिभाग्य** हें काव्य सर्व बाजूंनीं सुंदर व रसिकांस वेड लावणारें झालें आहे. त्याच्याबद्दल येथें फार विस्तार झाला, परंतु त्याच्या गुणांस अनुरूप अशी त्याची प्रसिद्धि अद्यापि सर्वत्र झाली नसल्याकारणानें वाचकांच्या लक्षांत येण्याकरितां त्याचें विवरण येथें जास्त विस्तारानें केलें आहे. अगोदर श्रीकृष्णपरमात्मा व भक्तश्रेष्ठ भीष्म यांचा अति उदात्त प्रसंग; त्यांतून भागवतकारांची अलौकिक वाणी त्याचें वर्णन करणारी व पंतांसारखे प्रेमळ व भाविक सहृदय त्याचा विस्तार करणारे मग तो परिपाक उत्कृष्ट कां उतरूं नये ?

८. मंत्रभागवतांत पंतांनीं या भीष्मनिर्याणाच्या अध्यायाचें चारच आर्यांत वर्णन केलें आहे. हा संक्षेप अर्थातच ' भीष्मभक्तिभाग्य ' पंतांनीं निराळें लिहिलें असल्यामुळें केला आहे. बहुतेक ठिकाणीं असें दिसून येतें कीं पंतांनीं जेथें जेथें स्फुट आख्यानें अगोदर लिहिलीं होतीं तेथें तेथें मंत्रभागवतामध्यें त्यांनीं अतिसंक्षेप केला आहे. पंतांच्या एकंदर संक्षेपाच्या धोरणास हें अनुरूपच आहे.

९. भीष्मनिर्याणानंतर श्रीकृष्ण द्वारकेस निघून जातात. हस्तिनापुरांतील त्यांची पांडवप्रमुख सर्वांनीं केलेली पाठवणी व द्वारकेंत प्रजेनें त्यांच्याप्रीत्यर्थ केलेला स्वागतमहोत्सव यांचें भागवतकारांनीं सुंदर वर्णन केलें आहे ( १०, ११ ). पंतांनीं हे दोन्ही अध्याय तीनच आर्यांत आणले आहेत; व स्वागतोत्सवाचें वगैरे सर्व वर्णन गाळून टाकलें आहे. कृष्णाच्या द्वारकेप्रत गमनाचें पंत एकाच खुबीदार उपमेनें वर्णन करितात.

वत्सलवर विभु गेला निज नगरीप्रति पुसोनि धर्मातें ।
जेंवि उदयगिरिपासुनि विधु जाया कुमुदिनीस शर्मातें ॥ ३८ ॥

येथें चंद्राप्रमाणें श्रीकृष्णही पूर्वेकडून पश्चिमेकडेच गेला होता हें साम्य लक्षांत ठेवण्यासारखें आहे. नंतर बाराव्या अध्यायांत परीक्षिज्जन्माचें, त्याच्या विष्णुरात, परीक्षित् इत्यादि नामकरणाचें वर्णन असून तें मात्र पंतांनीं बऱ्याच विस्तारानें म्हणजे १२ आर्यांत केलें आहे. येथें पंतांनीं काव्यसौंदर्यापेक्षां कथा-भागाकडे अधिक लक्ष दिलें आहे. कारण परीक्षितीची हकीकत पुढील कथाभागास आवश्यक आहे. ( १२ ). तेराव्या अध्यायांत विदुर तीर्थयात्रेहून येऊन धृतराष्ट्रास अरण्यांत घेऊन जातो; त्यामुळें युधिष्ठिर शोकमग्न झाला असतां त्रिकालज्ञ नारद त्याचें येऊन सांत्वन करतात व धृतराष्ट्रनिधनाचा पुढें घडून येणारा वृत्तांत सांगतात, वगैरे हकीकत आहे व आपल्या पौराणिक कथाप्रिय वृत्तीस अनुसरून पंतांनीं ती नेहमींच्या मानानें बऱ्याच विस्तारानें सांगितली आहे. ( १३ ). यानंतर श्रीकृष्णनिधनाचा काल येतो, कलि प्रवृत्त होऊन सगळीकडे अशुभ चिन्हें व उत्पात दिसूं लागतात. युद्धिष्ठिर शोकाकुल होतो व सरतेशेवटीं अर्जुन येऊन भयंकर निस्तेज व फटफटीत चेहेऱ्यानें ती सर्वनाशाची हकीकत सांगतो. परीक्षितीस हस्तिनापुरीं व वज्रास इंद्रप्रस्थीं राज्यावर बसवून पांडव महाप्रस्थानास जातात ( १४, १५. ) ही हकीकत पंतांनीं आपल्या नेह-मींच्या धावत्या पद्धतीनें १६ आर्यांत ( मूळ श्लोक ९५ ) वर्णिली असून ती चांगली साधली आहे. नगरांत दिसणाऱ्या अशुभ चिन्हांचें पंत अलंकारमय वाणीनें वर्णन करतात:—

> वार्ता नकळे कांहीं दुष्ट व्यवहार आयके पाहे ।
> बा, हे विपरीता क्षिति असतीसी नवनवा गुणा वाहे ॥ ( उपमा ) ७२ ॥

कृष्णनिधनानें पांडवांस अत्यंत दुःख झालें व कुंतीनें तर दुःखानें प्राण सोडला ! तेथें विस्तार न करण्याबद्दल पंत सबब सांगतात.—

> वदले हा ! माद्रीसुत, बहु दीनचि धर्म भीम गमला हो ।
> शोकें मरे पृथा, कां तद्विस्तर दे न भी मग मला हो ॥ ८२ ॥

अर्थात् ही केवळ चातुर्याची एक कोटि होय. खरोखरच पंतांस भीति वाटून त्यांची लेखणी स्तब्ध झाली असें कोणी म्हणणार नाहीं.

१०. यानंतर शेवटल्या चार अध्यायांत परीक्षितीचें चरित्र आलें आहे. त्याच्या राज्यांत कलीचा कसा प्रादुर्भाव व्हावयाला लागला व तो दृष्टोत्पत्तीस आल्यानंतर परीक्षितीनें कलीचें दमन करून त्यास आपल्या राज्यांतून हद्दपार करून लावलें पण

त्याचा वध कां केला नाहीं वगैरे गोष्टींचे वर्णन मुळांत गाईचें व वृषभाचें ( पृथ्वी व कलि ) रूपक योजून केलें आहे. व पंतांनींही तें तसेंच परंतु संक्षेपानें केलें आहे. पुढें परीक्षितीची मृगया, त्यानें शमीक ऋषीची, त्याच्या गळ्यांत मेलेला सर्प घालून केलेली थट्टा व त्या थट्टेचा शमीकपुत्र शृंगीनें शापाच्या रूपानें दिलेला घोर मोबदला, वगैरे सर्व गोष्टी मोठ्या सुंदर रीतीनें मुळांत सांगितल्या आहेत. ( १६-१८ ). पंतांनींहि त्या अगदीं थोडक्यांत म्हणजे १८ आर्यांत आणल्या आहेत. यानंतर एकोणिसाव्या अध्यायांत शाप झालेला कळल्यानंतर परीक्षितीला झालेली उपरति, त्यानें केलेला प्रायोप्रवेशनाचा निश्चय, गंगातीरीं प्रायोप्रवेशनार्थ आसन घालून बसल्यानंतर सभोंवार जमलेल्या ऋर्षीस निःश्रेयसाचा उपदेश करण्याबद्दल त्यानें केलेली प्रार्थना या गोष्टी आल्या आहेत, व सरतेशेवटीं त्या जमलेल्या ऋषिवर्यांच्या मेळ्यामध्यें शुकाचार्यांचें झालेलें आकस्मिक आगमन वर्णिलें असून परीक्षितीनें त्यांस केलेली प्रार्थना आली आहे ( १९ ). मुळांत ४० श्लोक असलेल्या या अध्यायाप्रीत्यर्थ पंतांनीं १६ आर्या खरचल्या आहेत. ' देवनदीच्या तीरीं अनशनसंकल्प ' करून बसलेला तो परीक्षित् राजा ' जातों, म्हणे शरण मी हरिस, विषामीस तूं शरीरा जा ॥ १०८ ॥ ' येथें तुल्ययोगिता अलंकार उत्कृष्ट साधला आहे. ऋषींची प्रार्थना करतांना त्यांच्या प्रभावाचें परीक्षितीनें केलेलें वर्णन —

हरितां गुहागत तुम्हीं कवि रविहि न हरिल कोण अन्य तम ॥ १११ ॥

येथें श्लेषयुक्त व्यतिरेक आहे. रवीदेखील गुहांच्या आंतलें तम ( म्हणजे अंधार ) नाहींसें करीत नाहीं परंतु तुम्हीं गुहागत ( म्ह० हृदयांतील ) तम (म्ह० अज्ञान) नाहींसें करतां असें वर्णन आहे. तसेंच परीक्षितीनें ऋषींसमोर बोलून दाखविलेली आपली अंतिम आकांक्षा —

गति भलती हो, श्रीमत्कृष्णयशोमृतनिधींत मज्जन हो ।
सत्संग घडो, मैत्री सर्वत्र तुम्हां नमोऽस्तु सज्जन हो ॥ ११५ ॥

ही आर्या वाचून ' सुसंगति सदा घडो ' इत्यादि केकावलींतील शेवटच्या तीन केकांचें कोणासही स्मरण होईल. ही आर्या म्हणजे त्या सुप्रसिद्ध श्लोकांची छोटीशी छबीच आहे.

११. याप्रमाणें पहिला स्कंध पंतांनीं वठविला आहे. मुळांत हा स्कंध काव्याच्या दृष्टीनें फार उत्कृष्ट व सुगम आहे. व पंतांनीं मंत्रभागवतांत भीष्मस्तुति, कुंतीची

प्रार्थना वगैरे मुळांतील कांहीं उत्कृष्ट भाग गाळले आहेत. तेव्हां मुळाच्या मनानें पंतकृति थोडीबहुत फिकी दिसल्यास नवल नाहीं. कांहीं झालें तरी मूळ भागवताचें तेजच अलौकिक आहे. शिवाय अत्तर एका कुपींतून दुसऱ्या कुपींत ओततांना जसा कांहीं सुगंध बाहेर जावयाचाच त्याप्रमाणें रूपांतर करतांनाही मुळांतील कांहीं रस नष्ट होणें अपरिहार्य आहे हें लक्षांत ठेवलें पाहिजे. मंत्रभागवताच्या प्रथम स्कंधाबरोबरच नारदाभ्युदय व भीष्मभक्तिभाग्य हीं गोड प्रकरणें जर विचारांत घेतलीं तर सर्वांचें मूल्य एकदम पुष्कळच चढेल हीहि गोष्ट ध्यानांत धरणें अवश्य आहे.

---

## [ द्वितीय स्कंध ]

१२. पहिल्या स्कंधाच्या शेवटीं, अंतकाळीं मनुष्यास जें कांहीं श्रेयस्कर ज्ञान व कर्तव्यकर्म असेल तें आपण मला सांगा अशी पृच्छा परीक्षिन् शुकाचार्यांस करतो व दुसऱ्या स्कंधाच्या प्रारंभापासून शुकाचार्यांचें उत्तर सुरू होतें. अर्थात् श्रीशुकप्रणीत भागवताला प्रारंभ खरा दुसऱ्या स्कंधापासूनच असून पहिला स्कंध केवळ प्रस्तावनारूप होय हें उघड आहे. असो. शुकाचार्यांनीं उत्तर द्यावयास आरंभ केला तो जरा व्याघ्रमुखानेंच केला. द्वितीय व तृतीय स्कंधांत शुकाचार्यांनीं बहुतेक सर्व वेदान्ताचें, तत्वज्ञानाचें व सृष्ट्युत्पत्तिस्थितिलयाचेंच वर्णन केलें आहे. प्रारंभीं ' माझ्या पित्यापासून जें भागवतपुराण मी पढलों तेंच तुला संशयनिवृत्त्यर्थ निवेदन करतों; ' असें म्हणून शुकाचार्यांनीं अंतकाळीं साधकानें कशी ध्यानधारणा करावी तें सांगितलें आहे. नंतर ब्रह्मांडरूपी परमेश्वराच्या विराट्स्वरूपाचें वर्णन केलें आहे, व चराचर सृष्टीचे सर्व भाग परमेश्वराच्या अंगप्रत्यंगांचे ठायीं कसे स्थित आहेत तें सांगितलें आहे. ( १ ). परमेश्वराचें विराट्स्वरूपवर्णन तर पंतांनीं अजीबात गाळलेंच आहे. इतर मजकुराचा मात्र ८ आर्यांत तोटक समावेश केला आहे.

१३. या विराट्स्वरूपवर्णनाविषयीं थोडेसें लिहिणें आवश्यक आहे. सर्व विश्व हें परमेश्वराचें शरीर होय अशी कल्पना मूलभूत धरून ह्या विश्वांतील निरनिराळीं तत्वें व निरनिराळ्या वस्तु परमेश्वराच्या म्हणजे विराट्पुरुषाच्या निरनिराळ्या अवयवांच्या ठिकाणीं आहेत अशा तऱ्हेचें वर्णन करणारीं विराट्स्वरूपें भागवतांत

अनेक ठिकाणीं सांगितलेलीं आढळतात. कोठें कोठें हें विश्व सध्यां आहे तसेंच विराट्पुरुषाच्या ठिकाणीं कल्पून त्याच्या निरनिराळ्या अवयवांचें वर्णन केलेलें आढळतें. ( याप्रमाणेंच वरील अध्यायांत वर्णन केलें आहे. ) तर कोठें कोठें सृष्टीच्या उत्पत्तीची कल्पना त्याच्याशीं जोडून, परमात्म्यानें प्रथम हिरण्मय अंड उत्पन्न केलें, त्यांतून विराट्पुरुष उत्पन्न झाला व त्याच्या शरीराच्या ठिकाणीं विश्वांतील सर्व वस्तु व सर्व तत्वें आविर्भूत झालीं असें वर्णन करण्यांत येतें. कोठें कोठें या परंपरेमध्यें सांख्यतत्वांचा समावेश करण्यांत येऊन विराट्पुरुषापासून प्रकृति, प्रकृतीपासून महत्, महत्पासून अहंकार, अहंकारापासून मन व सत्वरज-स्तमादि गुण व त्यांपासून सृष्टि अशा क्रमानें वर्णन करण्यांत येतें. केव्हां केव्हां, परमेश्वरानें पंचतन्मात्रें व पंचभूतें उत्पन्न केल्यानंतर त्यांच्यामध्यें एकमेकांमध्यें मिसळून जाऊन सृष्टि उत्पन्न करण्याची शक्ति येईना तेव्हां परमेश्वरानें आपल्या संकल्पानें विराट्पुरुष उत्पन्न केला व त्या पुरुषापासून अव्यक्त अथवा प्रकृति, प्रकृतीपासून महत्, त्याच्यापासून अहंकार उत्पन्न झाला; नंतर त्या अहंकाराचे वैकारिक, राजस व तामस असे तीन भाग होऊन ते, अमिश्र स्थितींत असलेलीं जीं पंचतन्मात्रें व पंचभूतें, त्यांच्याशीं संयुक्त झाले व अहंकाराशीं संयोग झाल्या-नंतर त्यांच्यांत परस्पर संयुक्त होण्याचें व परिणाम पावण्याचें सामर्थ्य येऊन त्यांपासून सृष्टि उत्पन्न झाली असेंही वर्णन आलें आहे. क्वचित् हिरण्मय अंडा-तून नारायण नामक तत्व अथवा व्यक्ति उत्पन्न झाली व तिच्या शरीरापासून हें विश्व प्रादुर्भूत झालें असेंही वर्णिलें आहे. ( पहा; भा. स्कंध २ अ. ५, ६; भा. स्कंध ३अ. ६, ७; वगैरे). या सर्व तऱ्हेच्या विस्तीर्ण, व सृष्टीच्या उगमाशीं जाऊं पाहणाऱ्या कल्पना आपल्या पूर्वजांच्या व्यापक, अफाट व सूक्ष्म विवेचकबुद्धीची साक्ष पटवतात. या, ऋग्वेदांतील पुरुषसूक्त ( मं. १०, सू. ९० ), हिरण्यगर्भ-सूक्त, ( मं. १०, सू. १२१ ) नासदीयसूक्त, ( मं. १०, सू. १२९ ) वगैरे सूक्तांतून उगम पावलेल्या असून पुढें उपनिषदादि ग्रंथांतून विस्तार पावलेल्या आहेत हें उघड आहे. ऋग्वेदांतील पुरुषमेधाची कल्पनाही भागवतांत घेतलेली दिसून येते, ( भा. स्कं. २ अ. ६ ). याशिवाय अगाध जलामध्यें शेषशायी भगवान् सुषुप्तावस्थेंतून किंचित् जागृतावस्थेंत आला असतां ' बहु स्याम् । प्रजायेय, ' ' सृष्टि उत्पन्न करावी, ' अशी त्याला इच्छा झाली, तेव्हां त्याच्या नाभींतून मालासहित कमळ उत्पन्न झालें व त्यांत ब्रह्मदेव निर्माण झाला. त्या सर्वलोक-

पितामहास आपण कोठें, कशासाठीं, केव्हां उत्पन्न झालों, आपलें कर्तव्य काय वगैरे गोष्टींचें प्रथम कांहीं आकलन होईना तेव्हां त्यानें शतसंवत्सरपर्यंत तपश्चर्या केली; त्या तपश्चर्येच्या अंतीं परमेश्वराचा अनुग्रह त्याच्यावर होऊन तो जगत् उत्पन्न करण्यास समर्थ झाला व त्यानें नंतर सर्व सृष्टि उत्पन्न केली.—अशा प्रकारचींही वर्णनें भागवतांत आहेत. (पहा; स्कं. ३ अ. ८,९.; स्कं. २ अ. ९; वगैरे.) सर्व भागवतभर असल्या तऱ्हेचीं वर्णनें मधून मधून येतातच; पण दुसरा व तिसरा स्कंध यांमध्यें तीं विशेष प्रामुख्यानें येतात; कारण या दोन स्कंधांत बहुतेक वेदांत व सृष्टयुत्पत्तिविषयक तत्वज्ञान हेंच मुख्यत्वेंकरून सांगण्याचा भागवतकारांचा हेतु दिसतो. वेदांत या शब्दानें येथें साधकास आपल्या परमपुरुषार्थ प्राप्त करून घेण्याच्या इच्छेस उपकारक होईल अशा तऱ्हेचें धारणा, उपासना व भक्तियोग यांचें प्रतिपादन अशा तऱ्हेचा अर्थ घेतला आहे. अशा तऱ्हेचा साधकोपयोगी वेदांत हा वर सांगितलेल्या नानातऱ्हेच्या सृष्टयुत्पत्तिविषयक सिद्धान्तांहून अगदीं भिन्न होय. सृष्टयुत्पत्तिविषयक वर्णनें हीं बहुधा निरपेक्ष व या विश्वाच्या उत्पत्तीच्या गहन प्रश्नाविषयीं निरनिराळ्या तऱ्हेचे कसकसे सिद्धान्त रूढ आहेत यांचें ज्ञान करून देण्याच्या उद्देशानें सांगितलेलीं असतात. व निरनिराळ्या ठिकाणीं त्यांचें स्वरूप अगदीं भिन्न तऱ्हेचें आढळतें. अनेक ठिकाणीं आढळणाऱ्या सृष्टयुत्पत्तिविषयक कथांचा वर सारांश सांगितलाच आहे त्यावरून या गोष्टी किती भिन्न तऱ्हांनीं वर्णन केल्या आहेत हें लक्षांत येईल; पण साधकोपयोगी वेदान्त हा खरोखरच एकाद्या परमार्थपर साधकास उपयोगी पडण्याजोगा सांगितला असतो व तो भागवतांत सर्व ठिकाणीं एकाच स्वरूपाचा सांगितला आहे. कदाचित् किरकोळ बाबतींत कांहीं भिन्नता आढळेल पण साधकानें मुख्य आचरण्याचा जो भक्तियोग व तत्सिध्यर्थ करण्याच्या ज्या ध्यान, धारणा, उपासना, त्यांच्या वर्णनांत कोठेंही बदल व्हावयाचा नाहीं. आणि या बाबतींत सर्वत्र दिसून येणाऱ्या ऐक्यावरून कांहीं तरी विशिष्ट, व्यवहार्य, सर्वांस सुलभ व सामान्य मनुष्यांसुद्धां प्रेममयतेनें व सद्भावानें लोभविणारें असें प्रतिपाद्य भागवताचें असल्याचा क्षणोक्षणीं भास होतो. व हा भक्तियोग भागवतकार जसा जास्त जास्त मनावर ठसवितात तसतसा तो सुलभ रीतीनें ठसत जाऊन जर कांहीं पूर्वकर्मार्जित सुकृत असेल तर मनुष्य भक्तिवश होऊन परमात्मपदीं लीन होतो.

१४. सृष्ट्युत्पत्तीचे सिद्धान्त व साधकोपयोगी वेदान्त या दोन्ही गोष्टींचा भागवतकारांच्या उद्दिष्ट हेतूंत समावेश होत असल्यामुळें भागवतांत जें ठिकठिकाणीं त्या तऱ्हेचें वर्णन आलें आहे तें सर्व युक्तच आहे; परंतु पंतांनीं आपल्या मंत्रभागवताची रचना मूळ भागवताहून निराळ्या तत्वांवर केली आहे हें आपण पाहिलेंच आहे. आत्मोन्नत्यर्थ श्रीकृष्णगुणानुवर्णन, कथाकथन व सुश्लिष्टकाव्यनिर्मिति हे उद्देश त्यांनीं डोळ्यापुढें ठेवल्याचें दिसून येतें. तत्वज्ञानाचें चर्वितचर्वण हें या दृष्टीनें अगदीं अप्रस्तुत होय. अर्थातच त्यांनीं सृष्ट्युत्पत्तीचीं वर्णनें व भक्तियोगप्रतिपादक वेदान्त हे दोन्ही विषय बहुतेक सर्व ठिकाणीं गाळले आहेत द्वितीय स्कंध बहुतेक वेदान्तमय व तत्वज्ञानमयच आहे. पहिल्या चार अध्यायांत शुकाचार्यांनीं साधकोपयोगी वेदान्ताचा विस्तार केला असून, कर्मफलाचा निषेध, विरक्ति, भक्तियोग, सगुणोपासना, परमेश्वरमूर्तीचें ध्यान वगैरे गोष्टी सांगितल्या आहेत. दुसऱ्या अध्यायांत सद्योमुक्ति व क्रममुक्ति या मोक्षास पावलेल्या लोकांच्या दोन मार्गांचें वर्णनही त्यांनीं केलें आहे. पांचव्या अध्यायाचे आरंभीं नारदांनीं ब्रह्मदेवास परमात्मस्वरूपाविषयीं व सृष्ट्युत्पत्तिस्थितिलयाच्या गूढ तत्वांविषयीं पृच्छा केली आहे. त्यानंतर ब्रह्मदेवाच्या सृष्ट्युत्पत्तिविषयक वर्णनास प्रारंभ झाला आहे. हें वर्णन पांचव्या व सहाव्या अध्यायभर पसरलेलें असून त्यांत सात्विक राजस तामस अशी तीन प्रकारची सृष्टि, विराट्पुरुषाची उत्पत्ति, वगैरे सर्व कांहीं आलें आहे. येथपर्यंतच्या सहा अध्यायांचे मुळांत २१६ श्लोक असून ते पंतांनीं फक्त १८ आर्यांत आणले आहेत. प्रत्येक अध्यायांतील विषयांचा त्यांनीं अगदीं त्रोटक व निसटता उल्लेख केला असून मुळाच्या प्रत्येक अध्यायामध्यें काय काय प्रतिपादन केलें आहे याची वाचकाला स्पष्ट परंतु थोडक्यांत कल्पना यावी अशी योजना ठेवली आहे. पुढें सातव्या अध्यायांत ब्रह्मदेवानें परमेश्वराच्या चोवीस अवतारांचें वर्णन केलें आहे. या अवतारांचें मुळांत ३८ श्लोकांत वर्णन केलें असून पुढें ईश्वराची स्तुति आहे व परमेश्वराचें स्वरूप ज्यांनीं परमार्थतः जाणलें अशा परमभक्तांची नामावलि शेवटीं दिली आहे. सर्व अध्यायाचे श्लोक ५३ आहेत. पंतांनीं याच अध्ययाचा विस्तार ६१ आर्याइतका केला असून त्यांपैकीं ५३ आर्या चोवीस अवतारांच्या वर्णनार्थ खरचल्या आहेत. बाकीच्या ८ पैकीं १ प्रास्ताविक असून राहिलेल्या सातांमध्यें शेवटीं ईश्वरमहिम्याचें वर्णन आहे. चोवीस

अवतारांपैकीं बहुतेकांना मूळ भागवतांत एक एक, ( क्वचित् दोन ), श्लोक दिला असून रामावतारास ३, कृष्णावतारास १० याप्रमाणें जास्त श्लोक दिले आहेत. पंतांनींही रामावतारास ३ व कृष्णावतारास १४ आर्या दिल्या असून नारायणावतारास ५ व पृथ्ववतारास ४ याप्रमाणें जादा वांटणी केली आहे. मूळांतील वृत्त वसंततिलका हें जरा मोठें, व भागवतकारांची भाषा सूत्रमय असल्यानें पंतांस मुळाइतकाच अर्थ आणण्यास जास्त पद्यें घालावीं लागलीं आहेत. उदाहरणार्थ मुळामध्यें नरनारायणअवताराचें दोन श्लोकांत वर्णन केलें आहे; परंतु पंतांनीं त्याच्याकरितां पांच आर्या खरचल्या असून देखील मुळापेक्षां जास्त अर्थ त्यांना आणतां आलेला नाहीं. तथापि पंतांनीं मुळापेक्षां जास्त अर्थ कोठेंच घातलेला नाहीं असें मात्र नाहीं. ध्रुवावताराच्या एका श्लोकाचा अनुवाद पंतांनीं पांच आर्यांत केला आहे त्यांमध्यें पुष्कळच नवीन अर्थ त्यांनीं आपल्या पदरचा घातला आहे.

मूळ—विद्धः सपत्न्युदितपत्रिभिरन्ति राज्ञो
बालोऽपि सन्नुपगतस्तपसे वनानि
तस्मा अदाद्ध्रुवगतिं गृणते प्रसन्नो
दिव्याः स्तुवन्ति मुनयो यदुपर्यधस्तात् ॥ भा. २.७.८.

पंतकृति—तेजस्वी शिशुहि जनकनिकट वृथा आइनें उरीं विद्ध ।
शब्दशरांहीं करितां त्यजि गृह, होउनि तपोर्जना सिद्ध ॥ ५० ॥
बाळा स्वाराधनपथदर्शक सद्दर्शन प्रथम घडवी ।
नेउनि सिद्धक्षेत्रीं स्वध्यानीं तत्सुबुद्धिला जडवी ॥ ५१ ॥
सुखमूर्तिदर्शन निजस्तवनीं निपुणत्व पदहि दे वरि तें ।
जें परमर्षिजनमहित, नतकामित दे पडों न देव रितें ॥ ५२ ॥
देता झाला ध्रुवगति देव ध्रुवबालकासि अवतारीं ।
तो भक्तवत्सल प्रभु दीना घडवूनि दास्यलव तारी ॥ ५३ ॥
वात्सल्य प्रभुचें बहु, बा, करुणेचा अगाध अर्णव तो ।
महिमा न सहस्रास्या मज चतुरास्यासि काय वर्णव तो ॥ ५४ ॥

हें ध्रुवावताराचें पंतकृत वर्णन मोठें सुंदर आहे. याच्या उलट मुळांतील पन्नास पद्य कायम ठेवावयाचें असलें म्हणजे पंतांना कसें गोळाबेरीज वर्णन करावें लागतें याचें उदाहरण—( व्यास अवतार )—

मूळ--कालेन मीलितधियामवमृश्य नृर्णा
स्तोकायुषां स्वनिगमो बत दूरपारः ।
आविर्हितस्त्वनुयुगं स हि सत्यवत्यां
वेदद्रुमं विटपशो विभजिष्यति स्म ॥ भा. २.७.३६.

पंतकृति--नष्टायु नष्टमति जे त्यांही थाया निका मह व्यास ।
प्रभु आपण होइल, कीं आर्तत्राणीं निकाम हव्यास ॥ ८९ ॥

मुळांतील ज्या पदांचें भाषांतर पंतकृतींत आलें नाहीं तीं जाड ठशांत छापलीं आहेत. त्यावरून पंतकृति किती त्रोटक झाली आहे तें समजेल. मुळांतील वेद-विभागाचा उलेख टाळून पंतांनीं कांहींतरी गोळाबेरीज वर्णन केलें आहे.

सर्वांत प्रमुख जे रामकृष्णांचे अवतार त्यांचें वर्णनही चांगलें साधलें आहे. कृष्णावताराचें वर्णन तर भागवतकारांपेक्षां पंतांनीं अधिक सूक्ष्मपणानें केलें असून दशमस्कंधाचा सारांशच त्यांनीं येथें कथन केला आहे. परंतु बाकीच्या अवतारांचीं वर्णनें मात्र सरळ व प्रसन्न दिसत नाहींत. पंतांची आर्या येथें फिकट व नीरस वाटते. कांहीं आर्या तर ( उदा० ४७, ५८, ६३; इ. इ. ) अगदीं क्लिष्ट व पंतांच्या कीर्तीस न साजेशा म्हणून काढून दाखवितां येतील

१५. या अवतारवर्णनाच्या सातव्या अध्यायावर पंतांनीं '**अवतारमाला**' म्हणून एक स्वतंत्र प्रकरण रचलें आहे. मुळांतील आशय येथें पुष्कळच विस्तृत करून ३१० आर्याइतका पंतांनीं त्याचा वाढावा केला आहे. मुळांतला सातवा अध्याय फक्त ५३ श्लोकांचा आहे व त्यांत प्रत्येक अवताराचें अगदीं त्रोटक वर्णन केलें आहे. परंतु या सर्व चोवीस अवतारांच्या, भागवतामध्यें निरनिराळ्या स्कंधांत आलेल्या, ग्राम्य कथांचा आधार घेऊन पंतांनीं आपली '**अवतारमाला**' इतकी विस्तृत केली आहे. हर्यवतार ( गजेंद्रमोक्ष ), कूर्मावतार व मत्स्यावतार या तिघांच्या विस्तृत कथा आठव्या स्कंधांत आल्या आहेत. नृसिंहावतार सातव्यामध्यें, पृथ्व्यवतार चौथ्यामध्यें व ऋषभावतार पांचव्या स्कंधामध्यें वर्णन केला आहे. त्याचप्रमाणें वराहावतार, यज्ञावतार व कपिलावतार हे तिसऱ्या स्कंधांत विस्तृत वर्णिले आहेत हे ठिकठिकाणचे सविस्तर कथाभाग पंतांस करतलामलकवत् असल्यानें त्यांतील आशयाची भरती पंतांनीं आपल्या या प्रकरणांत केली आहे. या प्रकरणाच्या ३१० आर्यांपैकीं शेवटच्या २० आर्या ईशस्मरणपर आहेत. त्या सोडून दिल्या म्हणजे बाकीच्या २९० आर्यांत पंतांनीं २४ अवतारांचें वर्णन केलें आहे. पहिला यज्ञवराहावतार व राम, कृष्ण हे दोन प्रसिद्ध

अवतार यांखेरीज सर्व अवतारांचें वर्णन पंतांनीं बहुशः पांच पांच आर्यांत केलें आहे. यज्ञवराहावतार सर्व अवतारमालिकेंत पहिलाच म्हणून पंतांनीं त्यास ११ आर्या दिल्या आहेत. पण राम व कृष्ण या अवतारांचें वर्णन पंतांनीं जरा विस्तारानें केलें आहे; आणि तें साहजिकच आहे. मुळांत रामचंद्रावताराचें फक्त ३ श्लोकांत वर्णन आहे, व कृष्णावताराकडे १० श्लोक दिले आहेत; हें भागवतकारांच्या कृष्णपरतेस अनुरूपच आहे. पण पंत हे रामभक्त होते तेव्हां त्यांनीं रामचंद्राच्या वर्णनास ११० आर्या दिल्या आहेत व कृष्णावताराचें ५५ आर्यांत वर्णन केलें आहे या अवतारमालेंतील वर्णनपद्धति वगैरे सामान्यच आहे. भीष्मभक्तिभाग्य, अंबरीषोपाख्यान, पृथुकोपाख्यान वगैरे प्रकरणांतली तन्मयता व रचनाकौशल्य येथें उतरलें असल्याचें दिसून येत नाहीं. काव्यस्फूर्ति झाली नसतांना, भगवद्‍गुणगानाची जी लालसा पंतांच्या मनांत नेहमीं वसत असे तिलाच केवळ वश होऊन पंतांनीं हें काव्य लिहिलें असावें असें वाटतें. शेवटच्या उपसंहारांत त्यांनीं नामस्मरणावर जो कटाक्ष ठेवला आहे त्यावरूनही हाच ग्रह दृढ होतो. ' पंतांचे मित्र जगन्नाथपंत यांच्या सांगण्यावरून पंतांनीं ही अवतारमाला लिहिली' असें पांगारकरांनीं म्हटलें आहे (मो. च. पृ. ३९२) तें कशाच्या आधारानें हें कांहीं समजत नाहीं.

१६. मुळांतील अवतारवर्णनाच्या सातव्या अध्यायासंबंधीं येवढा विस्तार झाला. पुढें ८ व्या अध्यायांत परीक्षितीनें शुकाचार्यांना नानातऱ्हेचे कर्मकांडविषयक व तत्वज्ञानविषयक प्रश्न केले आहेत. तो अध्याय दोन आर्यांचा त्रोटक उल्लेख करून पंतांनीं गाळलाच आहे. पुढें नवव्या अध्यायांत, परमेश्वराच्या नाभिकमलांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाला; उत्पन्न झाल्यावर आपण कोठें, कशासाठीं उत्पन्न झालों, आपलें कर्तव्य काय वगैरे गोष्टींचें त्याला मुळींच ज्ञान होईना; तेव्हां त्याला तप करण्याची प्रेरणा झाली; प्रेरणा होताच त्यानें शंभर वर्षे तप केलें; नंतर त्यास भगवद्दर्शन झालें; ब्रह्मदेवानें आपल्या अज्ञानाची व निर्बळीपणाची स्थिति भगवंतांस निवेदन केली तेव्हां भगवंतांनीं त्यास चतुःश्लोकी भागवताचा उपदेश करून सृष्टि उत्पन्न करण्यास सांगितलें;—इतका कथाभाग आला आहे. हें जें भागवत भगवंतांनीं ब्रह्मदेवास सांगितलें तेंच ब्रह्मानें नारदास, नारदानें व्यासांस व व्यासांनीं शुकाचार्यांस सांगितलें अशी भागवताची परंपराही येथें सांगितली आहे. ( ९ ). याप्रमाणें सर्व द्वादशस्कंधात्मक भागवताचें मूळ जें

चतुःश्लोकी भागवत तें यांत अंतर्भूत होत असल्यामुळें या अध्यायाचें महत्त्व फार मोठें आहे. जरी हा सृष्ट्युत्पत्तिविषयक असला तरी अतिशय सुंदर व काव्यमय आहे त्यामुळें काव्यसौंदर्यलोलुप अशा पंतांनीं तो न गाळतां १९ आर्यांमध्यें त्याचा सुंदर संक्षेप केला आहे. दहाव्या अध्यायांत, भागवतांत कोणकोणचे अध्यात्मविषय प्रतिपादिले आहेत त्यांची परिगणना केलेली आहे. तो पंतांनीं गाळलाच आहे. एवंच द्वितीय स्कंधांत अवतारवर्णनाचा ७ वा अध्याय व ब्रह्मदेवास भगवद्दर्शन झाल्याचा ९ वा अध्याय हे दोन खेरीज करून पंतांनीं सर्वत्र अतिसंक्षेप केला आहे. अ० ७ व ९ यांची मुळांत श्लोकसंख्या ९८ असून पंतांची आर्यासंख्या ८० आहे. पण बाकीच्या अध्यायांची मुळांतील श्लोकसंख्या २९३ असून पंतांनीं मात्र ते ४१ च आर्यांत आणले आहेत.

---

## [ तृतीय स्कंध ]

१७. मूळ श्रीमद्भागवतामध्यें तृतीयस्कंध फार महत्त्वाचा आहे. यांत प्रारंभीं विदुराच्या तीर्थयात्रांचें वर्णन असून तो फिरत फिरत यमुनेच्या तीरीं आल्यानंतर उद्धवाची व त्याची भेट होते असें वर्णन आहे. पहिल्या चार अध्यायांत उद्धवविदुरांचा संवाद सर्व आलेला असून त्यांत श्रीकृष्णाचें अल्पचरित्र, श्रीकृष्णनिधन, यादवांचा नाश वगैरे हकीकती उद्धवानें विदुरास सांगितलेल्या आल्या आहेत. पुढें भक्तश्रेष्ठ उद्धव बदरिकाश्रमीं जाण्यास निघाला असतां विदुरानें त्याला विनंती केली कीं, योगेश्वर कृष्णानें जें आत्मस्वरूपबोधक ज्ञान तुला सांगितलें तें तूं मला सांग. उद्धवानें मैत्रेय ऋषींवर हवाला दिला व तो स्वतः बदरिकाश्रमीं गेला. पुढें परम जिज्ञासु असा विदुर गंगातीरीं हरिद्वार येथें मैत्रेयांकडे गेला. ( १-४ ). पांचव्या अध्यायापासून विदुरमैत्रेयांच्या संवादास सुरवात झाली असून हा तिसऱ्या व चौथ्या, दोन्ही स्कंधभर चालू राहातो. विदुर हा प्रश्न असून मैत्रेय ऋषि विदुरास सर्व प्रकारचें ज्ञान सांगतात. या ज्ञानाचा पहिला हप्ता अ. ५ ते ७ यांत आला आहे. परमेश्वरानें प्रथम महदादिक तत्वें व त्यांच्या अभिमानी देवता उत्पन्न केल्या. परंतु संघशक्तीच्या अभावामुळें त्या सृष्टीची उत्पत्ति करण्यास समर्थ झाल्या नाहींत; व त्यांनीं परमेश्वराची स्तुति केली. तेव्हां परमेश्वरानें त्या तेवीस तत्वांच्या समुदायांत प्रवेश केला व त्यांत चळन उत्पन्न

करून त्यांच्या अंशांपासून विराट्पुरुष उत्पन्न केला. त्या विराट्पुरुषाचे ठायीं सर्व सृष्टि प्रादुर्भूत झाली. ( ५–७ ). पुढें विदुरानें आणखी प्रश्न केला असतां, " भगवान् शेषापासून सांख्यायनऋषींना, सांख्यायनांपासून पराशरांना व पराशरापासून मला जें भागवतपुराण ऐकण्यास मिळालें तें मी तुला सांगतों," अशी आपली पूर्वपीठिका कथन करून परमेश्वराच्या नाभिकमलांतून उत्पन्न झालेल्या ब्रह्मदेवानें कसकशी सृष्ट्युत्पत्तीस सुरवात केली तें मैत्रेयऋषि सांगते झाले. (८–९). पुढें १० - १२ अध्यायांपर्यंत याच ब्रह्मदेवाच्या सृष्ट्युत्पत्तीचें वर्णन असून कालमान, आयुर्गणना वगैरे गोष्टीही कशा उत्पन्न होऊन चालू झाल्या त्याचें वर्णन आलें आहे. बाराव्या अध्यायाच्या शेवटीं स्वायंभुव मनु व शतरूपा या प्राथमिक जोडप्याचें वर्णन आहे. मनूला राहाण्यास व राज्य करण्यास पृथ्वी पाहिजे होती म्हणून जलांत बुडालेली पृथ्वी वर काढण्याकरितां श्रीविष्णूनें यज्ञवराहाचा अवतार घेतला. या अवताराचें वर्णन, हिरण्याक्ष व हिरण्यकशिपु या दैत्यांची उत्पत्ति, वराहाचें हिरण्याक्षाशीं झालेलें युद्ध, हिरण्याक्षाचा वध, पृथ्वीचा उद्धार, वगैरे गोष्टींचें वर्णन १३ ते १९ या सात अध्यायांत आहे. पुढें ब्रह्मदेवानें निरनिराळीं शरीरें धारण केलीं व त्यापासून सात्विक, राजस, तामस वगैरे सृष्टि उत्पन्न झाली त्याचें वर्णन २० व्या अध्यायांत आहे. यानंतर कथाप्रिय लोकांस पसंत होण्याजोगें कर्दमदेवहूतींचें आख्यान २१ ते २४ अध्यायांत आलें आहे. पत्नीप्राप्तीसाठीं कर्दमऋषि घोर तपश्चर्या करितात. त्यांस भगवद्दर्शन व ईश्वरप्राप्ति होते व लगेच स्वायंभुव मनूचें त्यांजकडे आगमन होऊन मनु आपली कन्या देवहूति कर्दमऋषींस अर्पण करतो. याप्रमाणें कपिलावताराच्या उत्पत्तीची योजना सिद्ध होते. दीर्घकालपर्यंत खडतर व्रताचें आचरण केल्यानंतर देवहूतीची भोगविलासविषयींची उत्सुकता पाहून, कर्दमऋषींनीं योगसिद्धीनें सर्व तऱ्हेच्या विलाससामग्रीनें परिपूर्ण असें अद्भुत विमान उत्पन्न केलें; व त्या विमानामध्यें वसति करून शेंकडों वर्षे देवहूतीसह विहार केला. नंतर देवहूतीपासून नऊ कन्यांची उत्पत्ति व शेवटीं महर्षि कपिलाचें जन्म वगैरे हकीकत आली आहे. ( २१–२४ ). पंचविसाव्यांत देवहूतीनें ज्ञानप्राप्त्यर्थ आपला पुत्र कपिल यास विनवणी केलेली असून कपिलाचा आपल्या मातेस वेदान्तोपदेश त्याच अध्यायांत सुरू होतो. हा अत्यंत महत्त्वाचा, भागवताच्या प्रतिपाद्याचा सारभूत असा उपदेश अतिसाव्या अध्यायापर्यंत एकसारखा चालू असून त्यांत सांख्यांच्या सव्वीस तत्वांचें

वर्णन, सृष्ट्युत्पत्तीचे सिद्धान्त व साधकास उपयोगी असे वैराग्य, भक्तियोग, सगुणोपासना, ईश्वराच्या ध्यानाचें वर्णन वगैरे विषय आले आहेत. (२५-३२). तेहतिसाव्या अध्यायांत देवहूतीचें निर्याण वर्णिलेलें असून स्कंधसमाप्ति झाली आहे. याप्रमाणें या स्कंधांत प्रारंभीं ५ ते १२ अध्यायांत सृष्ट्युत्पत्तीचें तत्वज्ञान वर्णिलें असून पुढें २५ ते ३२ अध्यायांत कपिलाचा वेदान्तोपदेश सांगितला असल्यामें भागवताच्या प्रतिपाद्याच्या दृष्टीनें हा स्कंध फार महत्त्वाचा झाला आहे. अकराव्या स्कंधांत भक्तश्रेष्ठ उद्धवास श्रीकृष्णांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणेंच हा कपिल महर्षींनीं आपल्या मुमुक्षु मातेस सांगितलेला सांख्ययोग अतिशय महत्त्वाचा आहे. वेदान्ताच्या काथ्याकूटांत आपल्याला येथें शिरावयाचें नाहीं. तथापि भागवतांत या ठिकाणीं व इतर अनेक ठिकाणीं प्रतिपादिलेला सांख्यवेदान्त सांख्य कारिकांतील मतांशीं, त्याचप्रमाणें महाभारतांत जें सांख्यतत्वांचें प्रतिपादन झालें आहे त्याच्याशीं व शंकराचार्यादिकांनीं ज्या सांख्याचें खंडन केलें आहे त्याच्याशीं कितपत सुसंगत आहे व कोणच्या बाबतींत भिन्न आहे वगैरे गोष्टी अवश्य पाहण्यासारख्या आहेत. त्यामुळें पुष्कळ अनिर्णित गोष्टींवर, कदाचित् भागवताच्या रचनाकालावरही, कांहीं प्रकाश पडण्याजोगा आहे. भागवतकार हे अर्थात् सेश्वर सांख्यवादी आहेत हें येथें नमूद करण्याजोगें आहे.

१८. याप्रमाणें मूळ भागवतांतील विषयाच्या दृष्टीनें तिसरा स्कंध जरी कितीही महत्त्वाचा असला तरी पंतांनीं त्याला तितकें महत्त्व दिलेलें नाहीं असें आपणास दिसून येतें. मुळांतील १४११ श्लोकांचा स्कंध त्यांनीं केवळ १३२ आर्यांत आणला आहे म्हणजे मुळाचा एक अकरांशाइतका आश्चर्यकारक संक्षेप त्यांनीं येथें करून दाखविला आहे. शिवाय या स्कंधांतील कथाभागावर एकही स्फुट आख्यान पंतांनीं लिहिलेलें नाहीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. या सर्व गोष्टी पंतांनीं आपल्या मंत्रभागवतास जें धोरण आखून घेतलें आहे व जे उद्दिष्ट हेतु पुढें ठेवले आहेत त्यांना सुसंगतच आहेत हें सहज ध्यानांत येईल. पंतांना जाणून-बुजून तत्वज्ञान व भक्तियोगाचें साधकास उपयोगी असें प्रतिपादन टाळावयाचें होतें. तेव्हां त्यांनीं अशा वेदान्तप्रचुर स्कंधाचा अतिसंक्षेप केला असल्यास नवल नाहीं. या स्कंधांत ज्या ज्या अध्यायांत वेदान्त व सृष्ट्युत्पत्तिवर्णन आलें आहे तेच अध्याय नेमके निवडून गाळल्यासारखें पंतांनीं त्यांजकडे कसें दुर्लक्ष केलें आहे व बाकीचा कथामय भाग कसा विस्तारानें वर्णिला आहे हें पुढील आंकड्यांवरून दिसून येईल.

| अध्याय. | प्रतिपाद्य विषय. | मंत्रभागवतांतील दर अध्यायास आर्यासंख्या. | पंतांच्या आर्यांचें पडणारें प्रमाण. |
|---|---|---|---|
| १ ते ४. | उद्धवविदुरसंवाद. श्रीकृष्णनिधनकथन.... | ३० | ७½. |
| ५ ते १२ | तत्वज्ञान. सृष्टीची उत्पत्ति इ० ... | ११ | १⅜. |
| १३ ते १९. | यज्ञवराहावतार हिरण्याक्षाची उत्पत्ति व वध. | ४७ | ७. |
| २०. | ब्रह्मदेवापासून प्रजांची उत्पत्ति... | ० | ०. |
| २१ ते २४. | कर्दमदेवहूतींचें आख्यान कपिलाचें जन्म. | ३५ | ९. |
| २५ ते ३२. | सांख्यतत्वज्ञान, भक्तियोग यांचे प्रतिपादन. | ४ | ½ |
| ३३. | देवहूतीचें निर्याण वगैरे. ... ... | ५ | ५. |

यावरून वेदान्तानें व्यापलेल्या ५ ते १२, २० व २५ ते ३२ या अध्यायांत मोरोपंतांच्या आर्यांचें प्रमाण किती कमी पडतें व बाकीच्या कथामय अध्यायांत तें कसें एकदम वाढून ७, ७॥, ९ पर्यंत जातें हें चटकन लक्षांत येईल वेदान्तमय अध्याय पंतांनीं गाळल्यासारखेच केले आहेत त्यांतही प्रत्यक्ष वेदान्ताचें विवरण अजीबात गाळलें असून प्रष्टा व श्रोता यांचीं परस्पर अभिनंदनपर प्रश्नोत्तरें, तत्वज्ञानाची पूर्वपीठिका वगैरे अवांतर गोष्टींनीच सर्व जागा अडवून टाकली आहे. ( उदा० आर्या ३१ ते ३७ पहा. ) प्रथमारंभींचीं उद्धवविदुरांचीं प्रश्नोत्तरें, विदुरतीर्थयात्रा, त्यानंतर यज्ञवराहाचें कथानक हीं पंतांनीं आपल्या नेहमींच्या सुंदर धांवत्या पद्धतीनें वर्णिलीं आहेत. त्याचप्रमाणें सनत्कुमारांच्या शापानें पदभ्रष्ट झालेल्या जयविजयांचा हिरण्यकशिपु व हिरण्याक्ष दैत्यांच्या रूपानें दितीच्या उदरीं जन्म झाला ती कथाही बऱ्याच विस्तारानें सांगितली आहे. कर्दमदेवहूतींचें आख्यानही योग्यरीतीनें थोडक्यांत, परंतु मुळांतील सौंदर्य न सोडतां आणलें आहे.

१९. धृतराष्ट्रगृहीं दुर्योधनानें अपमान केल्यानंतर विदुर तीर्थयात्रेस जातो. प्रभासक्षेत्रीं त्याला कौरवक्षयवार्ता कळते, नंतर तेथून तो यमुनातीरीं गेला असतां उद्धवाची व त्याची गांठ पडते. त्यावेळेस श्रीकृष्णाचें निधन झालें होतें. उद्धवास त्यानें अजाणतेपणीं श्रीकृष्णाची व यादवांची वार्ता विचारली असतां उद्धवाचा कंठ दाटून येतो; त्याच्यानें कांहीं बोलवत नाहीं, तथापि तो कसेतरी बोलण्यास सुरवात करतो. या प्रसंगाचें वर्णन पंतांनीं फार सहृदयतेनें केलें आहे.

देवाचें सेवकिल प्रेमळभक्तासि वृत्त नच कथवे ।
अप्रिय वदतां होती दुःखाचे सज्जनास वचक थवे ॥ २० ॥
बाष्प गळां बहु दाटे, फाटे उर सांगतां, तथापि कसा ।
न वदेल ? विस्वर वदे स्वबसंतवियोगविषकथा पिकसा ॥ २१ ॥

पहिल्या आर्येत अर्थांतरन्यास व दुसऱ्यांत उपमा हे अलंकार सहज आलेले फार शोभादायक होत असून एकंदर वर्णनच फार करुण व कोमल असें केलें आहे. मुक्तांतही उद्धवाच्या या प्रसंगींच्या प्रेमनिर्भर स्थितीचें अत्यंत प्रेमळ पण अगदीं निराळया तऱ्हेचें वर्णन केलें आहे. त्यांत बाललीलेंतही उद्धवाचें कृष्णाविषयींचें अनुपम प्रेम कसें प्रकट होत असे याचा उल्लेख फारच मनोहर रीतीनें केला आहे.

यः पंचहायनो मात्रा प्रातराशाय याचितः ।
तन्नैच्छद्रचयन्यस्य सपर्यां बाललीलया ॥
स कथं सेवया तस्य कालेन जरसं गतः ।
पृष्टो वार्तां प्रतिब्रूयाद्भर्तुः पादावनुस्मरन् ॥
स मुहूर्तमभूत्तूष्णीं कृष्णांघ्रिसुधया भृशम् ।
तीव्रेण भक्तियोगेन निमग्नः साधुनिर्वृतः ॥ भा. ३.२.२,३,४.

या उदाहरणावरून प्रसंगविशेषीं मुक्तांतील व पंतकृतींतील वर्णनें किती निरनिराळ्या तऱ्हेचीं परंतु आपआपल्या तऱ्हेनें उत्कृष्ट असतात याची कल्पना येईल. उद्धव शोकमग्न झाला येवढया एकाच कल्पनेवर दोघांनीं अगदीं निरनिराळ्या तऱ्हेचें काव्य रचलें आहे. पुढें वराहावताराच्या कथानकांत हिरण्याक्षास मारून यज्ञवराह जेव्हां वर येतो तेव्हां त्याचें वर्णनः—

बघुनि तया ये त्याच्या घनरक्तें सर्व वदन सरवटुनी ।
अवगाहिलें सुकविनीं सुयश जसें स्वगुरुसदनसर बटुनीं ॥ ४९ ॥

शेवटच्या चरणांतील उपमा मोठी विनोदपर व समर्पक आहे. 'जयविजयांना शाप दिला हें आपण योग्यच केलें,' असें विष्णूनें सनत्कुमारांस म्हटलें.—

मोठा अपराध इहीं प्रभुनीं यां योग्य दंड हा केला ।
योग्य प्रतिक्रिया हे, नभ दे अनुरूप हाक हाकेला ॥ ६८ ॥

वातावरणांतून मिळणाऱ्या अनुरूप प्रतिध्वनीचा दृष्टान्त येथें अत्यंत उचित व हृद्य आहे. हिरण्याक्षाच्या जलक्रीडेचें वर्णनः—

तेजस्वी कनकाक्ष क्रीडे निःशंक अर्णवामध्यों ।
जाणों लहरींस म्हणे, ' कीर्तिच वर्णूनि वर्णवा माझी ' ॥ ८३ ॥

ही आर्या अतिशयच सुंदर आहे. निःशंक या एका शब्दानें हिरण्याक्षाची निर्भय, उद्दाम व बेफिकिरीची वृत्ति उत्कृष्ट व्यक्त केली आहे. उत्तरार्धातील कल्पना तर बहारीचीच आहे. पाण्यावरील लहरी एकापुढें एक अशा उमटत जातात. मागची जेथें लुप्त होते तेथेंच तिचाच वेग घेऊन पुढची उत्पन्न होते. व अशा लहरी एकापुढें एक सर्व बाजूंनीं पसरत जातात. या साध्या निसर्गांत दिसून येणाऱ्या व्यापारावर पंतांनीं येथें हृद्य उत्प्रेक्षा केली आहे. लाटांचा सळसळ असा शब्द होत असल्यामुळें त्यांना कीर्ति वर्णन करावयास सांगणें यांच्यामध्यें औचित्य दिसून येतें. मागच्या लाटेची शक्ति घेऊन पुढची उत्पन्न होते हा नैसर्गिक क्रम लक्षांत घेतला असतां ' तुम्ही स्वतः कीर्ति वर्णन करून तीच क्रिया पुढच्यांकडून-ही करवा ' असा आदेश लाटांना करणें किती समर्पक आहे हें सहज लक्षांत येईल. पुनः, लाटा अत्यंत दूरवर, जलाशयाच्या सीमेपर्यंत सर्व दिशांना पसरत जातात; तेव्हां लाटांबरोबर कीर्तीही अशीच दूरवर पसरत जाईल असा इष्ट अर्थ येथें सुंदर रीतीनें ध्वनित होतो. पंतांनीं येथें अत्यंत हृद्य असा कल्पनाविलास प्रकट केला आहे. निसर्गाचें इतकें मार्मिक निरीक्षण व त्याचा काव्यांत हृदयंगम उपयोग महाकवींसच साध्य होय यांत शंका नाहीं.

कर्दमदेवहूतीच्या कथेमध्यें देवहूतीची दृढ निष्ठा व पतिसेवातत्परता पाहून कर्दमऋषींनीं आपण होऊन तिला वर मागावयास सांगितलें तेव्हां पतीच्या वैराग्यानें व व्रताचरणानें भिऊन गेलेली संसारसुख इच्छिणारी ती—

यमनियमवती प्रार्थी पूजाया पुरुष अनघ संतानें ।
' स्वकलत्र शोभवावें त्वां प्रभुनें जेंवि वन वसंतानें ॥ ९९ ॥
मोकलिलें आपण हें स्पष्ट विरक्तिस मनांत वाटावें ।
बहु शांतिच्याहि कंठीं बाष्पें, कल्पूनि विरह दाटावें ' ॥१०१॥

हेंही सुंदर ध्वनिकाव्य आहे. दुसऱ्या आर्येत पर्यायोक्त अलंकाराचा अवलंब करून पंतांनीं फारच खुबीदार वर्णन केलें आहे. विरक्ति व शांति या जणूं देवहूती-च्या सवती. 'त्या दोघींचा आपण त्याग करावा (अर्थात् भोगविलासांचा अंगीकार करावा), व त्यांना विरहाचें दुःख कसें असतें याचा चांगला अनुभव घडवावा.' अशा तऱ्हेची विनंति देवहूतीसारख्या उत्सुक स्त्रीच्या तोंडीं फार शोभते यांत संशय नाहीं.

अशा मधुनमधून आढळणाऱ्या सुरम्य वनःस्थलींखेरीज प्रस्तुत स्कंधांतील बाकीचा प्रदेश साधारणच आहे. आणि त्यावरून पंतांची गाडी अत्यंत द्रुतगतीनें धावत असल्यामुळें त्याचें बारकाईनें निरीक्षण करण्यास सवडही मिळण्यासारखी नाहीं.

---

## [ चतुर्थ स्कंध ]

२०. तृतीय स्कंधाप्रमाणें चतुर्थ स्कंध वेदान्तप्रचुर नाहीं. याच्यांत मुख्यतः स्वायंभुव मनूचा पहिला मुलगा जो उत्तानपाद त्याचा वंश सांगितला आहे. आमच्यांतल्या आबालवृद्धांसही ज्याची कथा परिचित आहे व आमच्या जुन्या कवींनींही ज्याच्या कथेचें शतशः गायन केलें आहे तो ध्रुवबालक या उत्तानपादाचा तनय होय. त्याची कथा अर्थात् याच स्कंधांत आली आहे. याप्रमाणें हा स्कंध बहुतेक कथाभागानें व्यापलेला असल्याकारणानें यांत पंतांनीं मंडूकप्लुतीचा प्रकार कोठें केलेला नाहीं. इतर स्कंधांत जेथें वेदान्तमय भाग असतो तेथें त्यास फारसा स्पर्श न करितां पंत बहुधा त्याच्यावरून उडी मारून जातात. येथें वेदान्ताच्या बहुतेक अभावामुळें त्यांस तसें करण्याचें कारणच पडलें नाहीं. तथापि अध्याय २५ ते २९ पर्यंत जें वेदान्तमय रूपक आलें आहे त्याचा निर्देश मात्र करून त्यांनीं तें गाळलेंच आहे शिवाय निरनिराळ्या व्यक्तींनीं केलेल्या ईशस्तुत्या या स्कंधांत बऱ्याच आल्या आहेत; त्याही पंतांनीं गाळल्या आहेत. अशा रीतीनें गाळागाळ करून व मूळ कथाभागाचा संक्षेप करून पंतांनीं आपला चतुर्थस्कंध मुळापेक्षां ८॥ पटींनीं आकुंचित केला आहे मुळाची श्लोकसंख्या १४४५ असून पंतांची प्रतिकृति सारी १७६ आर्या आहे. तथापि मुळांतील कोणताही कथाभाग अजीबात सोडून न देतां पंतांनीं सर्व आशय इतक्या अल्प अवकाशांत, घोटाळा न करितां, अगदीं व्यवस्थित रीतीनें आणिला आहे! इतकेंच नव्हे तर त्याला काव्यकल्पनांचें मधुनमधून लेणें लेववून सजविलाही आहे.

२१. मुळामध्यें पहिल्या अध्यायांत स्वायंभुव मनूच्या दोन कन्या आकूति व प्रसूति यांचा वंशविस्तार सांगितला असून स्वायंभुव मनूची तिसरी मुलगी जी देवहूति तिच्या नऊ कन्यांचीही संतति वर्णन केली आहे. तो पंतांनीं सर्व व्यवस्थितपणें आपल्या काव्यांत आणला आहे ( आर्या १ ते २७ ). पुढें अ. २ ते ७ पर्यंत स्वायंभुव मनूचा जावई व प्रसूतीचा पति जो दक्ष प्रजापति त्याच्या व शंक-

राच्या अंगी वैराची हकीकत आली आहे. दक्षाची मुलगी सती नांवाची शंकरास दिली होती. एके प्रसंगीं दक्षाला त्याच्या जामातानें म्हणजे शंकरानें योग्य उत्थापन दिलें नाहीं म्हणून श्वशुरांची स्वारी गरम झाली व भांडण सुरू झालें. या भांडणाच्या पायीं सतीनें आपला देहांत करून घेतला व त्यामुळें रागावून शंकरानें आपल्या जटेतून 'वीरभद्र' नामक राक्षस उत्पन्न करून त्याजकरवीं दक्षाचा शिरश्छेद करविला. पुढें ब्रह्मदेवानें व इतर देवांनीं मनधरणी केल्यामुळें शांत होऊन शंकरानें दक्षास मनुष्याच्या मस्तकाऐवजीं बोकडाचें मस्तक देऊन जिवंत केलें. याप्रमाणें हें सासराजावयांचें भांडण मिटलें पण त्यांत मुलगी बिचारी मेली ती मेलीच. पुढच्या जन्मीं तिनें हिमालयाच्या पोटीं पार्वतीच्या रूपानें जन्म घेतला. हा सर्व मुळांतील २४० श्लोकांचा कथाभाग पंतांनीं ४८ आर्यांत सुंदर रीतीनें वर्णिला आहे. शंकर नको म्हणत असतां बाप आपला कांहीं तरी सत्कार करील या आशेनें सती दक्षाचा यज्ञ चालला होता तेथें गेली. परंतु,

भगवत्कथित समस्तहि जातांचि प्रत्यया तिच्या आलें ।
कीं होय तिचें दर्शन दुःसह शिवशत्रुलोचनीं आलें ॥ ४७ ॥

आल्याचा क्षुल्लक दृष्टान्त केवळ यमकाकरितां आणिलेला आहे तरी तो समर्पक व अर्थोत्कर्षकारक आहे. शिवद्वेषाबद्दल तिनें केलेली दक्षाची निर्भर्त्सना व दक्षासारख्या दुष्टापासून प्राप्त झालेल्या स्वशरीराचा धिक्कार फार जोरदार व सणसणीत आहे.

ते पाय सुमंगल तुज काय खलशिरोमणीस हातनया ।

हा ! तनया तव मी, हें वपु अघ, लावू महेश हात न या ॥ ५० ॥

नंतर तिनें 'हृदयीं शिवमूर्ति धरुनि' आपल्या शरीराचा योगाग्नीनें दाह करून टाकला. पुढें रुद्रजटोत्पन्न वीरभद्रानें दक्षाचा वध केला. तेव्हां सुरांसह ब्रह्मदेव दक्षाला उठवावें म्हणून कैलासी शिवाकडे रदबदली करण्याकरितां गेले. या वजनदार शिष्टमंडळाला शंकरांनीं योग्य आश्वासन दिलें.

गरहि गिळायाचा जो प्रभु न गिळिल काय तदपराधा त्या ? ।
विधिस म्हणे, 'हा ईश्वर नच दंडी, मदचि मदपरा, धात्या !' ॥ ५८ ॥

'परमेश्वराची करुणा व क्षमाशीलता अपार आहे. मनुष्याला भोगावें लागणारें शासन हें सर्वोदित त्याच्याच दुर्गुणाचें फळ असतें.' हें उदात्त तत्व या आर्येत किती सुंदर रीतीनें गोवलें आहे ! या दक्षयज्ञाच्या कथेवरील शिवमहिम्नांतला 'क्रियादक्षो दक्षः... ' इ० सुंदर श्लोक प्रसिद्धच आहे.

२२. दक्षाच्या कथेनंतर मनुपुत्र उत्तानपादाच्या वंशास आरंभ होतो; व आठव्या अध्यायापासूनच उत्तानपादाचा मुलगा ध्रुव याच्या कथेस सुरवात होते. ध्रुवाची कथा सर्वश्रुतच आहे, परंतु प्रचलित समजापेक्षां एकदोन ठिकाणीं मुळां-तील कथेचें स्वरूप थोडेंसें भिन्न आहे. ध्रुव रागावून चालता झाल्यानंतर उत्तान-पाद राजा त्याच्या मागून त्याची समजूत काढण्याकरितां गेला असें वर्णन सामान्य-जनांत प्रचलित असलेलें आढळतें व कांहीं कवींनींही तसा उल्लेख केला आहे. पण भागवतास हें अभिप्रेत नाहीं. ( कदाचित् पुराणांतरीं तसा उल्लेख असल्यास न कळे. ) ध्रुव निघून गेला तो प्रथम बापास न कळतांच. व बापही त्याची समजूत काढण्याकरितां त्याच्या मागून कधीं गेला नाहीं. अर्थात्

फीर मागें देईन एक गांव । ध्रुव बोले देईल देवराव ॥
पांच गावें दीधलीं फीर आतां । ध्रुव बोले मागेन जगन्नाथा ॥

अशा तऱ्हेच्या पितापुत्रांच्या संवादास मुळांत जागाच नाहीं. दुसरी गोष्ट, परमेश्वर-स्वरूपाचें दर्शन झाल्यानंतर निश्चल स्थानाची प्राप्ति होऊन तेथेंच ध्रुवाचें चरित्र संपतें असें सामान्यतः समजण्यांत येतें. पण वस्तुतः ध्रुवाचें चरित्र सगळें त्याच्या पुढें व्हावयाचें असून छत्तीस हजार वर्षें सिंहासनावर बसून त्यास राज्य करावयाचें होतें. त्याच्या या दीर्घ कारकीर्दीचें व त्यानें केलेल्या युद्धाचेंही वर्णन भागवतांत आलें आहे; असो. या ध्रुवोपाख्यानाचे मुळांत पांच अध्याय ( ८–१२ ) असून श्लोक २६६ आहेत. पैकीं तपश्चर्या करून श्रीनारायणदर्शन होईपर्यंतचे १४९ श्लोक असून पुढील हकीकतीचे ११७ आहेत. पंत ध्रुव-चरित्राचें वर्णन करितांना यातील पूर्वार्धाला अतिशय महत्त्व देतात व उत्तरार्ध अगदीं त्रोटक रीतीनें वर्णितात. ध्रुवचरित्राचा पूर्वार्धच काव्यमय असून उत्तरार्ध युद्धादिकांच्या वर्णनांनीं भरलेला नीरस असा आहे. तेव्हां पंत उत्तरार्धाचा अतिसंक्षेप करतात हें त्यांच्या धोरणास अनुरूपच होय.

२३. पंतांनीं ध्रुवचरित्र दोनदां वर्णन केलें आहे. एकदां ' ध्रुवचरित्र ' नामक १०७ साक्यांच्या स्वतंत्र प्रकरणांत व दुसऱ्यांदा मंत्रभागवतांत. पैकीं मंत्र-भागवतांतील वर्णन अगदीं त्रोटक, केवळ १० आर्यांचें असूनही काव्यदृष्टीनें सुंदर वठलें आहे. बापानें मांडीवर बसूं दिलें नाहीं व सापत्नमाता टोंचून बोलली तेव्हां

रडत सुनीतिकडे जाय तिचा जो बहिश्चर प्राण ॥ ७२

मुलाची छळणूक व सपत्नीकृत अपमान ऐकून ध्रुवमाता

वार्ता परिसुनि तेही रडली, बहु कांपली जसी कदली।
'पदलीनासि पदप्रद हरिच' म्हणे 'हा खरेंच ती वदली' ॥ ७३॥

असें सुंदर व थोडक्यांत चित्र वठवणारें वर्णन मुळांत नाहीं. ध्रुवमातेचें भाषण तर पुष्कळच लांब आहे. पुढें ध्रुवानें भगवद्ध्यानपूर्वक प्राणनिरोध केल्यामुळें श्वासाचा अवरोध होऊन सर्व सृष्टि पीडित झाली.

गडबडले बहु याच्या प्राणनिरोधें सुरादि चट सारे।
विदुरा, प्रपंच होऊं पाहे निश्चेष्ट चित्रपटसा रे ॥ ८१ ॥

इतकें झालें तेव्हां श्रीनारायण गरुडस्कंधावर बसून दर्शन देण्याकरितां पुढें येऊन उभे राहतात. पण ध्रुव डोळे उघडून बाहेर कशाला पाहतो आहे! तो हृदयस्थ मूर्तीच्या चिंतनानंदांत गढून गेला होता. नारायणानें हृदयांतली मूर्तीच काढून घेऊन अंधार केला. तेव्हां

सुटतां थान मुखींचें शिशुसा ध्रुव गडबडोनि जों पाहे।
तों जो ध्यानीं होता सुखमूर्ति तसाचि तो पुढें आहे ॥ ८५ ॥

येथलि ध्रुवासारख्या लहान मुलाला शोभणारी सुंदर उपमा पंतांची आहे. ती मुळांत नाहीं. पुढें आनंदातिशयानें ध्रुवाला वाचा फुटेना! तेव्हां

बालमनोरथ पुरवी श्रुतिमयशंखें सिवोनि गल्ल हरी।
उठवी स्तुतिसूक्ति जसा अनिळ क्षीरार्णवांत सल्लहरी ॥ ८७ ॥

ही 'स्तुतिसूक्ति' अर्थात् आपल्या नेहमींच्या रिवाजास अनुसरून पंतांनीं गाळली आहे.

दुसरें साकीमय ध्रुवचरित्रही सुंदर साधलें आहे. यांतही नारदाचीं दोन तीन भाषणें अतिसंक्षिप्त केलीं असून ध्रुवानें केलेली 'योऽन्तः प्रविश्य मम वाचम्' इत्यादि स्तुति गाळलीच आहे. ही स्तुति तरी सबंध गाळायला नको होती असें पांगारकर म्हणतात. पण ईशस्तुति, मग ती कितीही सुंदर असो, गाळून टाकण्याचा पंतांचा प्रघातच आहे. असो. बाकी सर्व ध्रुवाचा कथाभाग श्रीनारायणदर्शनापर्यंतचा ७० साक्यांत वर्णिला असून पुढील ध्रुवानें यक्षांशीं केलेल्या युद्धाचा इतिहास वगैरे १७ साक्यांत वर्णिला आहे. बहुधा वर्णन मुळास अगदीं धरून केलें असून कित्येक ठिकाणीं मुळांतील शब्द देखील वापरले आहेत. तथापि पुष्कळ ठिकाणीं संक्षेपही केला आहे. ध्रुव आईकडे रडत गेला याचें वर्णनः—

मूळ—मातुः सपत्न्याः सुदुरुक्तिविद्धः श्वसन्रुषा दंडहतो यथाहिः।
हित्वा मिषन्तं पितरं सन्नवाचं जगाम मातुःप्ररुदन्सकाशम्॥भा.४.८.१४.

पंतकृति—अहिसा खवळुनि मातेपाशीं तेथुनि रडतचि गेला। ध्रु. च. १२
येथें मुळांतील पहिला व तिसरा चरण सोडून देऊन दुसऱ्या व चवथ्या चरणाचा आशय फक्त साकीमध्यें आणला आहे. पुढें मातेचा विलाप—

मूळ—सोत्सृज्य धैर्यं विललाप शोकदावाग्निना दावलतेव बाला।
वाक्यं सपत्न्याः स्मरती सरोजश्रिया दृशा बाष्पकलामुवाह॥भा.४.८.१६.

पंतकृति—दवदहनात लता तैसी ती बाला शोकीं पडली।
आलिंगुनि बाळातें, सोडुनि धैर्यातें, बहु रडली॥ ध्रु च. १३.
येथेंही मुळांतील शेवटचे दोन चरण बहुतेक गाळलेच आहेत. पण पहिल्या दोन चरणांतील शब्द व उपमा देखील भाषांतरांत आणलीं आहेत. पुढें ध्रुव वैतागून अरण्यांत निघून गेला तेथें त्यास नारद भेटले.

संसृतिपारद परमविशारद भेटे श्रीनारद या।
शारदयामवतीश चकोरीं, तेंवि करीं फार दया॥ ध्रु. च. २५

पंतांच्या अनुप्रासाचें हें सुंदर उदाहरण आहे. परमेश्वर पुढें येऊन उभा राहिल्यानंतर ध्रुवाच्या हृदयांतली मूर्ति माहींशी झाली. तेव्हां

हृदयीं भगवन्मूर्ति न दिसतां पावे व्युत्थानातें।
ध्रुव गडबडला चुकला शोधी बाळ जसा थानातें॥ ध्रु. च. ५४
नेत्रें उघडी घाबरला तो ध्रुव सहसा जो पाहे।
तों आंत जसी तसि बाहेर प्रभुमूर्ति उभी राहे॥ ध्रु. च. ५५

या साक्या सुंदर आहेत, व स्तनाची आणि बाळकाची उपमाही समर्पक आहे. पण याच अर्थाची हुबेहूब पुनरुक्ति मंत्रभागवतांत झालेली आहे. ( वर उद्धृत केलेली आर्या ८५ पहा ). यानंतर ध्रुवानें केलेल्या स्तुतीचें तिन्हाईतपणानेंच पंतांनीं सुरेख वर्णन केलें आहे.

जागविली निजली होती त्या बाळाची जी वाचा।
बोध दिला ऐसा लाजावा ज्या महिमा जीवाचा॥ ५९॥
बालमुखींचीं जरि अव्यक्तें अक्षररूपें सार्थी।
केवळ अमृताचि होतीं वत्सल गुरुजनकर्णी आर्थी॥ ६१॥
परमानुग्रह करुनि शिकविलें प्रभुनें भाषण मग तें।
किति वर्णावें अमृत कसें हो त्या सूक्तिपुढें तगतें॥ ६२॥

पृथ्वीवर ज्यानें सप्तद्वीपें व सप्तसमुद्र निर्माण केले त्या भगवद्भक्तशिरत प्रियव्रत राजाची कथा मुळांत पहिल्याच अध्यायांत सांगितलेली पंतांनीं १९ आर्यांत वर्णन केली आहे. अतिशय उग्र तप केल्यानंतरही अप्सरेला पाहतांच तिच्यावर भाळून स्त्रैण बनलेला त्याचा पुत्र आग्नीध्र याची कथा त्याच्यापुढें थोडक्यांत सांगितली आहे. आग्नीध्राचा मुलगा नाभि व नाभीचा मुलगा ऋषभदेव हा होय. हा ऋषभदेव पृथ्वीवरील लोकांस योगमार्गाचा व जीवन्मुक्त स्थितीचा उपदेश करण्यासाठीं झालेला परमेश्वराचा अवतार होय. हा जेव्हां नाभिराजाच्या भार्येच्या पोटीं आला तेव्हां ती,

वाळे, बहु पुष्टि धरी मग कीं ती अमृत मूर्त सेवी तें ॥ २१ ॥

ऋषभदेवानें आपल्या मुलांस केलेला वेदान्तोपदेश मुळांत दोन तीन अध्यायांत वर्णिला आहे, पण पंतांनीं तो सर्व गाळला आहे. ऋषभदेवाचा पुत्र अतिविख्यात भरत हा होय. या भरतामुळेंच भारतवर्ष हें नांव या देशास प्राप्त झालें. तत्पूर्वी यास अजनाभवर्ष असें नांव होतें. रामचंद्राचा धाकटा भाऊ भरत किंवा दुष्यन्त शकुन्तला यांचा पुत्र सर्वदमन भरत यांजपासून भारतवर्ष हें नांव या देशास मिळालेलें नाहीं ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. भरताला ऐतिहासिक दृष्ट्या जें हें महत्व आहे तें जरी सोडून दिलें तरी त्याचें एकंदर चरित्रसुद्धां फार सुंदर व बोधप्रद आहे. दहा कोटि वर्षे राज्य केल्यानंतर भरत विरक्त होऊन आपला पुत्र सुमति याच्यावर राज्य सोपवून परमार्थ साधण्याकरितां पुलहाश्रमीं गेला. पण त्याच्या नशिबांत त्या जन्मीं तपश्चर्या व ईश्वरभक्ति लिहिलेली नव्हती. नदीकांठीं ईश्वराराधन करीत बसलेला असतां भरतास एकदां एक आईवेगळें मृगबालक सांपडलें आणि त्याचा कळवळा येऊन त्यानें त्याला स्वतःच्या आश्रमांत नेऊन वाढविलें. हळुहळू त्या हरिणशिशूवर त्याची इतकी प्रीति बसली कीं स्वप्नीं, आसनीं, शयनीं त्याला त्या हरिणशिशूचाच ध्यास लागला व ईश्वराराधना बाजूसच राहिली. मृगाच्या ध्यासामुळें भरत मेल्यानंतर पुढील जन्मीं मृगयोनींत जन्मास आला. मात्र गेल्या जन्मीं कांहीं दिवस हरिस्मरण घडल्यामुळें ईश्वराच्या प्रसादानें या जन्मांत देखील मागील जन्माची त्याला स्मृति होती. ती स्मृति असल्यामुळें या जन्मीं त्याला उपरति झाली व तो

ती हरिण तनु त्यजितां पावे सुब्राह्मणालयीं जनुतें ।
होतां हरिप्रसादें स्मृति चुचकारीत धरुनियां हनुतें ॥ ३९ ॥

येथें पूर्वजन्मींच्या स्मृतीवर सचेतनत्वाचा आरोप सुंदर रीतीनें केला आहे. जडभरत या नावानें, एका विद्वान् ब्राह्मणाच्या कुळांत तो जन्मास आला. या जन्मांत मात्र कोणाचा संग न करितां केवल जडाप्रमाणें वागून त्यानें परमार्थाचा मार्ग चोखाळला व अंतीं तो सायुज्यपदास पावला. हा जडभरत धष्टपुष्ट असून नेहमीं वेड्यासारखा वागत असे. एकदां सामान्य मजूर समजून त्याला रहूगण नामक सिंधुसौवीर देशाच्या राजाची पालखी वाहण्यास लाविलें होतें. त्याची योग्यता न समजून रहूगण त्याला पालखी नीट न वाहिल्याबद्दल दुरुत्तरें बोलला तरी त्यानें रहूगणाचा राग न धरितां त्याला अमृतोपम वाणीनें आत्मज्ञानाचा उपदेश केला, व मुक्तिमार्गाला लाविलें. पंत म्हणतात—

> वाहे स्कंधीं, बाळ न जाणुनि मलतेंचि जरि वदे काय ।
> स्वसुखामृतें तयातें निववी, सत्पुरुष कां नव्हे माय ॥ ५४ ॥

ही आर्या फारच सुंदर आहे. अनुमान * अलंकारानें युक्त असें रूपक येथें साधलेलें असून रहूगणाला खांद्यावर वाहणाऱ्या सत्पुरुष जडभरताचें मुलाला खांद्यावर घेऊन वागविणाऱ्या मातेशीं साम्य फारच सहृदयतेनें वर्णन केलें आहे. मातेच्या साम्याची कल्पना मुळांत अर्थात्च नाहीं. जडभरतानें रहूगणाला केलेला उपदेश व भवाटवीच्या रूपकाच्या द्वारें प्रतिपादिलेली संसाराची अनर्थकता वगैरे गोष्टी मुळांत बऱ्याच विस्तारानें वर्णिल्या आहेत. परंतु हा सर्व वेदान्त पंतांनीं आपल्या नेहमींच्या प्रवृत्तीस अनुसरून गाळला आहे. पुढें पंधराव्या अध्यायांत भरतराजाचा पुत्र जो सुमति त्याच्या वंशाचें वर्णन आहे.

२७. यापुढील सोळाव्या अध्यापासून सुरू होणारें भुवनकोशादिकांचें वर्णन पंतांनीं गाळलें आहे हें वर सांगितलेंच आहे. ही गाळागाळ पंतांनीं वस्तुतः आपल्या धोरणास अनुसरून हेतुपुरस्सरच केली आहे. पौराणिक तऱ्हेचीं सृष्टिवर्णनें वगैरे आपल्या ग्रंथांत आणून आपला ग्रंथ म्हणजे एक सर्वसंग्राहक बाड तयार व्हावें अशी त्यांची योजना नव्हती. अर्थात् केवळ पौराणिक तऱ्हेस अनुसरून जीं वर्णनें मुळांत आलीं आहेत, मग तीं कितीही मोठीं असोत, तीं गाळणें त्यांना प्राप्तच होतें. तथापि एकदम दहा अध्यायांइतका बराच मोठा भाग आपण गाळून टाकतों आहोंत हें वाचकांना चमत्कारिक वाटेल म्हणून त्यांनीं प्रत्येक विवक्षित गोष्ट गाळल्याबद्दल निरनिराळ्या सबबी सांगून वाचकांना भुलविण्याचा

थोडासा प्रयत्न केला आहे. पृथ्वीचें वर्णन गाळल्याबद्दल त्यांची सबब पहा.—

वसुधेवरील लोकालोकापर्यंत जे पदार्थ, तथा ।
गगनांत जे त्यांची कथिली श्रीमच्छुकेंचि सांग कथा ।। ६० ।।
ते जरि पदार्थ इतरें वर्णावे, ग्रंथ बहु न कां वाढे ।
रसिकहि निरलस सादर साधु सदा स्वस्थ थोडके गाढे ।। ६१ ।।

सप्त पाताळें वर्णन न करण्याबद्दल पंत सांगतात—

वानावीं पाताळें सप्त बाळे श्री अनंत वानावे ।
परि मंत्रवर्ण अडविति, आदरिले गुरु कसे न मानावे ।। ६२ ।।

फक्त पाताळेंच वर्णन करितांना मंत्रवर्ण अडवीत होते काय ?

देवांच्या कीं गाती तद्भक्तांच्या यशास नर कां तें ।
हर्षद सोडुनि वर्णूं तापद जे त्यां कशास नरकांतें ।। ६४ ।।

देवांच्या व भक्तांच्या यशास सोडून तापदायक नरकांचें मी कशास वर्णन करूं ? प्रत्येक गोष्टीबद्दल भिन्नभिन्न तऱ्हेनें सांगितलेल्या या सबबी मोठ्या मजेदार आहेत व त्या क्षणभर वाचकांत रिझवतात यांत शंका नाहीं. परंतु यापलीकडे, पंतांनीं आपल्या संक्षेपाचीं सर्व तत्त्वें त्यांत सांगितलेलीं आहेत असें मानतां येत नाहीं. पंत म्हणतात कीं इतर कोणी कांहीं म्हणो, श्रीहरि व सुज्ञ रसिक लोक तरी संक्षेप केल्याबद्दल माझा अव्हेर करणार नाहींत.

सुज्ञ समाज सुरसिक श्रीहरिच म्हणेल न लघु पृथु कांहीं ।
स्वल्पार्थस्कंधाहीं तृप्तचि होईल जेंवि पृथुकांहीं ।। ६३ ।।

श्रीहरि व सुज्ञ रसिक लोक यांचीच पर्वा पंतांना वाटत होती यावरूनही भगवद्यशोगान करावें व रसिकमान्य असें सुंदर आटोपशीर काव्य निर्माण करावें हेच पंतांचे दोन मुख्य हेतु होते असें सूचित होतें.

---

## [ षष्ठ स्कंध ]

२८. पंचमस्कंधाप्रमाणें षष्ठस्कंधांत कांहीं विशेष गाळण्यासारखा भाग पंतांस आढळला नाहीं. कारण तो कथामय आहे. आतां या कथांमध्यें मधुनमधून ज्या ईशस्तुत्या व लहान लहान वेदान्त प्रकरणें आलीं आहेत तीं पंतांनीं नेहमींप्रमाणें अतिसंक्षिप्त केलीं आहेतच; पण पंचमस्कंधांत ज्याप्रमाणें पौराणिक तऱ्हेचें स्वर्ग,

भूमि, पातालांचें अध्यायचे अध्याय विस्तृत पसरलेलें वर्णन पंतांनीं अजीबात खोडून दिलेलें आहे असा प्रकार यांत कोठें दिसत नाहीं. म्हणूनच या स्कंधाची आर्यासंख्या १९८ झाली असून भागवताच्या पहिल्या आठ स्कंधांमध्यें हा सर्वांत मोठा झाला आहे. रचनेची घाटणी नेहमींप्रमाणेंच असून भाषेचा धावता ओघ अस्खलित वहात आहे.

प्रारंभींच

> नरपति म्हणे, 'शुकमुने, भ्यालों श्रवणचि करुनि नरकास ।
> वद तरतो कोणाची पापसमुद्रीं धरुनि नर कास' ॥ १ ॥

असा परीक्षितीनें प्रश्न केल्यावरून शुकाचार्यांनीं अजामिळाची कथा सांगितली आहे, ही कथा पहिल्या चार अध्यायांत आली असून पंतांनीं ती ४४ आर्यांत वर्णिली आहे. पुढें प्राचेतस दक्ष प्रजापतीची हकीकत असून त्यानें दोनदां निर्मिलेले हजार हजार पुत्र नारदोपदेशानें विरक्त झाले हें पाहून त्यानें साठ कन्या उत्पन्न करून त्या धर्म, कश्यप वगैरेंस दिल्या व त्या कन्यांपासून पुढें सर्व सृष्टि उत्पन्न झाली वगैरे वृत्तांताचें वर्णन पुढील २५ आर्यांत केलेलें आहे. यापुढें लांबलचक वृत्राख्यानास प्रारंभ होतो. हें सातव्या अध्यायापासून तेराव्या अध्यायापर्यंत मुळांत वर्णिलेलें असून पंतांनीं तें ६७ आर्यांत वर्णन केलें आहे. (आर्या ६९–१३६) सर्व देव वृत्राच्या भयानें परमेश्वरास शरण जातात व तो त्यांना अभय देऊन वृत्रवधाचा उपाय सांगतो. दधीचि ऋषीपासून त्यांच्या अस्थि मिळवून त्या अस्थींचें वज्र करावें म्हणजे त्या वज्रानें वृत्र मारला जाईल अशी युक्ति शेषशायी भगवान् देवांस सांगतात. त्याप्रमाणें महास्वार्थत्यागी दधीचीकडून अस्थि घेऊन तन्निर्मित वज्राच्या योगानें इंद्र वृत्राला मारतो—याप्रमाणें मुळांत हकीकत आली आहे व पंतांनीही त्याचप्रमाणें वर्णन केली आहे. पण ब्रह्मोपदेश करणाऱ्या दधीचि ऋषीच्या अश्वशिर नामक स्वरूपाची हकीकत त्यांनीं मध्येंच आणली आहे. देवांचे वैद्य अश्विनीकुमार हे एकदां दधीचीकडे गेले व त्यांनीं त्याला ब्रह्मज्ञानाचा उपदेश करण्याची प्रार्थना केली. तेव्हां ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यास अश्विनीकुमार हे आपल्यापेक्षां वरचढ होतील अशा भयानें इंद्र दधीचीकडे आला व 'तुम्हीं जर अश्विनीकुमारांना ब्रह्मज्ञानाचा उपदेश कराल तर मी तुमचें शिर तोडून तुम्हांला ठार करीन' अशी त्याला धमकी देऊन निघून गेला. यावर अश्विनीकुमारांनीं पुढील युक्ति काढली. प्रथमतःच दधीचि ऋषीचें मस्तक कापून त्या जागीं

घोड्याचें मस्तक कापावें व त्या मस्तकानेंच दधीची ऋषींनीं कुमारांना ज्ञान सांगावें; ज्ञान सांगतांच इंद्र येऊन तें मस्तक छाटून टाकील; तें छाटून टाकल्यानंतर दधीचि ऋषींनीं पुन: आपलें पहिलें मानवाचें मस्तक धारण करावें; याप्रमाणें युक्ति योजून शेवटीं ती त्या गुरुशिष्यांनीं अमलांतही आणली व इंद्रास फजीत केलें. ही पंतांनीं वर्णिलेली समग्र हकीकत ( आर्या ८९-९८ ) मूळ भागवतांत नाहीं. परमेश्वराच्या भाषणामध्यें फक्त एका श्लोकांत दधीचि ऋषीच्या अश्वशिरस्वरूपाचा उल्लेख आहे. पंतांनीं आपली विस्तृत हकीकत फक्त टीकेस अनुसरून दिली आहे असें दिसतें. टीकेचा आशय घेऊन व इतर ठिकाणच्या माहितीचा समावेश करून मुळांत नसलेल्या गोष्टींचें वर्णन पंतांनीं केल्याचें हें एक ठळक उदाहरण होय.

२९. तृतीय स्कंधाप्रमाणेंच या स्कंधांतील कथाभागावरही पंतांनीं कांहीं स्फुट आख्यान लिहिलेलें नाहीं. स्फुट काव्य लिहिण्याजोग्या या स्कंधांत दोन कथा आहेत. एक अजामिळाची कथा व दुसरें वृत्रासुराख्यान. अजामिळाची कथा भगवन्नाममहिम्याचें उत्कृष्ट रीतीनें वर्णन करणारी असून पंतांसारख्या नामस्मरणलोलुप प्रेमळ भगवद्भक्तानें आपल्या सद्भावपूर्ण वाणीनें गावी अशीच ती आहे यांत शंका नाहीं. तथापि याच नामस्मरणमहिमा दाखविणाऱ्या गोष्टीवर वामनपंडितांनीं सुरस व विस्तृत असें ' हरिनामसुधा ' नांवाचें प्रकरण रचिलें आहे. याकरितांच पंतांनीं या कथेवर स्फुट रचना केली नाहीं असें दिसतें. सामान्यत: पहातां वामनपंडितांनीं ज्या ज्या कथाभागांवर काव्यरचना केली आहे त्याच्यावर पंतांनीं स्फुट रचना करण्याचें टाळलें आहे असें दिसतें. हा कांहीं अगदीं निरपवाद असा नियम नाहीं; तथापि सामान्यत: पंडितांनीं वर्णन केलेले भाग सोडून इतर भागांवर रचना करण्याचीच पंतांची प्रवृत्ति विशेष दिसून येते. पंडितांचा भर दशमपूर्वार्धावर व कृष्णाच्या बाललीलांवर जास्त; तेव्हां पंतांनीं दशम पूर्वार्धांतील कथांस आधारभूत धरून एकही स्फुट काव्य रचिलेलें नाहीं. अजामिळाची कथा त्यांनीं सोडून दिली आहे हेंही त्याच प्रवृत्तीचें द्योतक होय. उलट ध्रुवकथा, नारदकथा, दशम उत्तरार्धांतील सुदामकथा, भृगुचरित्र वगैरे अनेक पंडितांनीं न वर्णिलेलीं आख्यानें पंतांनीं आदरून मराठींत आणलीं आहेत. अशी ही पंतपंडितांची परस्परपूरक कामगिरी मोठी अपूर्व व लक्षांत ठेवण्याजोगी आहे. वृत्रासुराख्यान पंतांनीं सोडून दिलें याचें कारणही अगदीं स्पष्ट

आहे. वृत्राच्या कथेंत रमणीयता मुळींच नसून काव्यास उपयुक्त असे गुण तिच्यां-त दिसून येत नाहींत; आणि भगवद्भक्तांस प्रिय होण्याजोगा असाही कोणताच भाग त्यांत आढळून येत नाहीं; भगवद्यशोगान नाहीं, नाममहिमा नाहीं, भगव-द्भक्ताचें चरित्र नाहीं, कांहींच नाहीं. उलट देवांच्या, विशेषतः इंद्राच्या मत्सरी-पणाचें व दुष्टपणाचें उदाहरण मात्र त्यांत भरपूर आहे अशी स्थिति असल्या-मुळें पंतांनीं, किंबहुना सद्भावपूर्ण अशा आमच्या इतर सर्व मराठी कवींनींही वृत्रकथेचा आदर केलेला दिसून येत नसल्यास त्यांत आश्चर्य नाहीं.

पंतांनीं स्वतंत्र आख्यान जरी लिहिलें नसलें तथापि सहाव्या स्कंधांत या कथांचें यथाक्रम वर्णन करण्यांत कसूर केलेली नाहीं. पंतांची आर्या उत्तरोत्तर अधिकच सोपी, सुंदर व मधुर होत चाललेली दृष्टीस पडते. व अशा मोहक वाणीनें अजामिळ व वृत्र या दोन्ही कथा त्यांनीं बऱ्याच विस्तारानें वर्णिल्या आहेत.

---

## [ सप्तम स्कंध ]

१०. चवथ्या स्कंधामध्यें ज्याप्रमाणें आमच्या प्राकृत कवींना अत्यंत प्रिय झालेली ध्रुवाची कथा आहे त्याप्रमाणें सातव्या स्कंधांतही कवींना तितकीच प्रिय झालेली प्रह्लादाची रमणीय कथा आहे. ध्रुवाच्या कथेनें चवथ्या स्कंधाचा केवळ एक लहानसा भाग व्यापला आहे. आमच्या प्राकृत कवींना अत्यंत आवडलेला ध्रुवाच्या लहानपणींचा वृत्तांत व त्याची ईश्वराराधना यांनीं चवथ्या स्कंधाच्या ३१ अध्यायांपैकीं फक्त २ अध्याय व्यापले आहेत. पण हिरण्यकशिपूच्या व प्रह्लादा-च्या कथेनें जवळ जवळ सर्व सप्तमस्कंध व्यापला आहे. पंतांच्या मंत्रभागवतांत तर सातव्या स्कंधांत सर्वस्वीं प्रह्लादकथाच वर्णन केली आहे. मुळामध्यें हिरण्य-कशिपूच्या कथेस प्रत्यक्ष सुरवात अशी दुसऱ्या अध्यायांत झाली असून प्रह्लादा-ख्यानाचा उपसंहार दहाव्या अध्यायांत झालेला आहे. यानंतर त्याच अध्यायांत त्रिपुरासुराख्यान नामक एक लहानसें आख्यान आलेलें असून बाकी उरलेल्या ११ ते १५ अध्यायांत वर्णाश्रमधर्म, श्राद्धविचार, वगैरे धर्मशास्त्रांतील विषयांचें विवेचन आलें आहे. अगदीं शेवटीं थोडेंसें प्रवृत्तिमार्ग, निवृत्तिमार्ग वगैरे वेदान्त-विषयांचें विवेचन करून स्कंध समाप्त केला आहे.

११. ' यथामति सत्कथा गाव्या ' ह्या उद्दिष्ट हेतूस अनुसरून पंतांनीं या

स्कंधांत फक्त प्रल्हादकथा तेवढी गायिली आहे. बाकी शेवटचें धर्मशास्त्रविषयक विवेचन व वेदांतप्रतिपादन हें त्यांनीं जवळ जवळ गाळून टाकलें आहे. भक्तश्रेष्ठ प्रल्हादाचें चरित्र फारच सुंदर व प्रेमळ; तेव्हां पंतांसारख्या सहृदय कवीनें व प्रेमळ भक्तानें तें कोठें तरी निराळें गायिलें असायचेंच. त्याप्रमाणें त्यांनीं तें 'प्रल्हाद-विजय' नामक काव्यांत मंत्रभागवत लिहिण्याच्या फार पूर्वी गाऊन ठेविलें होतेंच. पण प्रस्तुत 'प्रल्हादविजय' हा काव्यदृष्ट्या कांहीं फार उत्तम साधलेला ग्रंथ नाहीं. शिवाय तो आर्यागीतिवृत्तांत रचलेला असून दुसरी मोठी गोष्ट ही कीं, तो भागवतांतील कथेला आधार धरून लिहिलेला नव्हे. विष्णुपुराणांतील कथा पाहून हा ग्रंथ मी लिहिला असें पंत स्वतःच म्हणतात.—

श्रीमद्विष्णुपुराणीं पाहुनि अत्यंत आदरें रचिला ।
प्रल्हादविजयनाम ग्रंथ पहा नगचि मणिगणीं खचिला ॥ ना.र. १०५

खुद्द प्रल्हादचरित्राच्या शेवटींही पंतांनीं खालीलप्रमाणें उल्लेख केला आहेः—

श्रीमद्विष्णुपुराणसागरसुधा प्रल्हादजीची कथा ।
साधुश्रोत्रपथासि येउनि हरी संसाररोगव्यथा । इ० प्रल्हादविजय.

तेव्हां विष्णुपुराणाच्या आधारानें रचलेला हा ग्रंथ पंतांच्या भागवती काव्यांत कांहीं समाविष्ट होऊं शकत नाहीं. ही गोष्ट लक्षांत येऊनच पंतांनीं प्रल्हादाच्या आख्यानाचा मंत्रभागवतांत बराच विस्तार केला असावा. पहिल्या स्कंधांतील नारदाभ्युदय व भीष्मभक्तिभाग्य यांचे कथाभाग पंतांनीं मंत्रभागवतांत अगदींच संक्षिप्त केले आहेत. व आठव्या स्कंधांतही अमृतमथन, वामनचरित वगैरे जीं प्रकरणें त्यांनीं स्वतंत्र लिहिलीं आहेत त्यांचे कथाभाग मंत्रभागवतांत आख-डतेच घेतले आहेत. अंबरीषाच्या कथेवर पंतांनीं 'अंबरीषाख्यान' व 'भक्तभूषण' हीं दोन प्रकरणें रचलीं आहेत. त्यामुळें मंत्रभागवतांत त्यांनीं ती कथा, इतर सर्व नवमस्कंधांतील कथांचा बराच विस्तार केला असतांनाही, केवळ १० आर्यांत आटपून टाकली आहे. दहाव्या स्कंधांतील सुदामचरित्राचाही तोच प्रकार झाला आहे. कृष्णविजयांत व इतरत्र सुदामचरित्र विस्तृतपणें वर्णिलें असल्यामुळें मंत्र-भागवतांत पंतांनीं त्याचाही केवळ संक्षेप केला आहे. तेव्हां ज्या आख्यानावर स्वतंत्र खंडकाव्यें रचलीं असतील त्यांचा मंत्रभागवतांत अतिसंक्षेप करावयाचा अशी बहुधा सर्वत्र पंतांची प्रवृत्ति दिसत असल्याकारणानें येथें सातव्या स्कंधांत जो प्रल्हादकथेचा पंतांनीं बराच विस्तार केला आहे त्याचें कारण दुसरीकडे

भागवताच्या आधारानें त्यांनीं ती कथा गायिली नव्हती हेंच असलें पाहिजे. शिवाय सप्तमस्कंधांत ही प्रह्लादकथाच काय ती मुख्य आहे. शेवटच्या सहा अध्यायांत आलेलें धर्मशास्त्रांतील विषयांचें विवेचन पंतांच्या हेतूला अगदीं अनभिप्रेत, तेव्हां तें गाळणेंच भाग; त्रिपुरासुराख्यान तर अगदींच क्षुल्लक, तेव्हां सातव्या स्कंधांतील वर्णनीय असें कथानक म्हणून प्रह्लादाच्या कथेवरच टेकणें पंतांस भाग होतें. आणि हें पंतांच्या सातव्या स्कंधाच्या रचनेकडे बघितलें म्हणजे तेव्हांच लक्षांत येतें. प्रथमाध्याय केवळ प्रास्ताविक असल्यानें पंतांनीं तो एका पहिल्या आर्येंतच आटपून टाकला आहे. प्रह्लादाच्या कथेस मूळामध्यें दुसऱ्या अध्यायापासून सुरवात होऊन दहाव्या अध्यायांत तिचा उपसंहार होतो. पंतांनीं आपल्या सातव्या स्कंधाच्या दुसऱ्या आर्येंपासून प्रह्लादकथेस सुरवात केली आहे व १५६ व्या आर्येपर्यंत तिचा विस्तार केला आहे. तेव्हां एकंदर १५५ आर्यांत पंतांनीं प्रह्लादचरित्र वर्णिलें आहे असें झालें. आणि या स्कंधाच्या एकंदर आर्या पंतांनीं १७६ केल्या आहेत अर्थात् प्रह्लादचरित्राशिवाय बाकीचा भाग केवळ २१ आर्यांत आणिला आहे. यावरून प्रह्लादचरित्राचा जर पंतांनीं अगदीं संक्षेप केला असता तर हा सर्व स्कंध पंतांना कसा अगदींच रोडका बनवावा लागला असता हें लक्षांत येतें. द्वितीयस्कंधांतही पंतांची हीच स्थिति झाली आहे असें आपण मागें पाहिलेंच. तेथें बाकीचे सर्व अध्याय वेदान्तमय असल्याकारणानें पंतांनीं त्यांचा अतिसंक्षेप केला आहे पण सर्व स्कंध अगदींच रोडका दिसूं नये म्हणून सातव्या अध्यायांतील चोवीस अवतारांचें-इतर स्फुट प्रकरणांत त्यांचें वर्णन केलें असून सुद्धां-६१ आर्यांत विस्तृत विवरण केलें आहे.

३२. असो. या भक्तश्रेष्ठविषयक पंतकृतीचें आतां आपण नीट अवलोकन करूं. प्रह्लादकथेचे स्वभावतः तीन निराळे भाग पडतात. त्यांपैकीं पहिला भाग म्हणजे हिरण्यकशिपूसंबंधाच्या हकीकतीचा होय. हिरण्यकशिपु घोर तपश्चर्या करून त्यामुळें मिळालेल्या सामर्थ्यानें सर्व जगास भारी होतो इतका कथाभाग यांत आलेला आहे:- अध्याय २,३,४. दुसऱ्या भागांत प्रह्लादाची विष्णुभक्ति व तत्प्रीत्यर्थ त्याचा बापाकडून झालेला छळ यांचें वर्णन आहे:-अ० ५,६,७. नृसिंहरूपी परमेश्वराचें स्तंभांतून प्रकट होणें, हिरण्यकशिपूचा वध, देवांनीं व प्रह्लादानें केलेली नृसिंहस्तुति, प्रह्लादास वरदान इ० अंतिम वृत्तांत ज्यांत आलेला आहे तो तिसरा भाग मानतां येईल:— अ० ८, ९, १०.

पंतांनीं येथें प्रारंभ अरा सूचीमुखानेंच केला आहे. दुसऱ्या अध्यायांत मुळा-मध्यें, भ्रातृवधामुळें हिरण्यकशिपूचा झालेला संताप, त्यामुळें त्यानें केलेली विष्णु-वधाची प्रतिज्ञा, भावाच्या मरणाबद्दल त्याच्या पत्नीपुत्रादि परिवारानें केलेलें सांत्वन व मानवीआयुष्याच्या वैयर्थ्याबद्दल त्यानें सांगितलेली सुयज्ञ राजाची गोष्ट इतका कथाभाग आलेला आहे. या सर्व गोष्टींचें पंतांनीं केवळ दिग्दर्शन मात्र केलें आहे. सुयज्ञ राजाची गोष्ट तर अजीबात गाळलीच आहे. याप्रमाणें ६१ श्लोकांचा अध्याय पंतांनीं फक्त ४ आर्यांत आटपला आहे. पुढें हिरण्यकशिपूनें विष्णूवर दांत धरून घोर तपास सुरवात केली. त्याच्या तपाच्या उग्रतेनें सर्व जग तप्त होऊन प्रलय होण्याचा समय येऊन ठेपला. तेव्हां ब्रह्मदेवानें त्याला तपा-पासून परावृत्त करण्यासाठीं इच्छित वर मागण्यास सांगितलें. हिरण्यकशिपु हर्ष-निर्भर मनानें ब्रह्मदेवाची स्तुति करून वर मागतो.—

वरदा, जीं त्वन्निर्मित भूतें व्यसु सासु भूमिवर, देहा ।
त्यांपासुनि मृत्यु नसो, न नभीं रात्रिंहि, दिवाहि वर दे हा ॥ १६ ॥

येणेंप्रमाणें कथाभाग असलेल्या तिसऱ्या अध्यायाचा ( श्लोक ३८ ) पंतांनीं १५ आर्यांत फार सुंदर संक्षेप केला आहे. मुळांतील कांहीं विशेष गोष्टी पंतांनीं गाळल्या नाहींत. फक्त हिरण्यकशिपुकृत ब्रह्मस्तुति मात्र गाळली आहे.

पुढें हिरण्यकशिपु उन्मत्त होऊन इंद्रपद बळकावून बसला. हिरण्यकशिपूच्या भयानें देवांची कशी लाचारीची स्थिति झाली त्याचें थोडक्यांत परंतु ठसठशीत वर्णन,—( मुळांत हें वर्णन बरेंच विस्तृत आहे. )—

भजली जे सुरमुनिवर यांची सुज्ञानसिंधु राजी जी ।
भव विधिविष्णु निराळे करुनि म्हणे असुरसिंधुरा जी जी ॥ २५ ॥
गट करि आपणचि कनककशिपु प्रभु यज्ञभाग, दे खाया ।
लवहि न सुरांसि, लावी घोटाया लाळ, तोंड देखाया ॥ २६ ॥

यापुढें देवांस आश्वासन देणारी आकाशवाणी झाली असून हिरण्यकशिपूचा पुत्र प्रह्लाद याच्या ईश्वरभक्तीचें वर्णन नंतर आलें आहे. त्याचा मात्र पंतांनीं अतिसंक्षेप केला आहे. याप्रमाणें हा ४६ श्लोकांचा अध्याय ११ आर्यांत आट-पला आहे.

३३ येथून पुढें हिरण्यकशिपूचा वृत्तान्त संपून प्रह्लादाच्या छळाचा भाग सुरू होतो. हिरण्यकशिपु प्रह्लादास 'तुला सर्वांत काय उत्तम वाटतें ?' असा

एकदां प्रश्न करतो. ' श्रीविष्णुभक्ति ' असें प्रल्हादानें उत्तर दिल्यावर त्याला चांगला ताळ्यावर आणण्याकरितां गुरुपुत्र जे शंड व अमर्क त्यांच्या ताब्यांत पिता त्याला देतो. तरीही तो वळणीवर येत नाहीं असें दिसून आल्यानंतर प्रल्हादाच्या अनन्वित छळास सुरवात होते; त्याचाही कांहीं उपयोग होत नाहीं व इतके आसुरी उपाय केले तरी तो मरतही नाहीं असें पाहून हिरण्यकशिपु घाबरतो व शुक्राचार्य परत येईपर्यंत शंडामर्कांच्या सल्ल्यावरून त्यास बांधून ठेवण्याची आज्ञा करतो. हा सर्व कथाभाग जवळ जवळ मुळाइतक्याच विस्तारानें पंतांनीं आर्यांत उतरला आहे. या आर्यांत कित्येक ठिकाणीं पंतांनीं मुळाचें श्लोकाबरहुकूम भाषांतरही केलें आहे. मंत्रभागवताच्या पहिल्या आठ स्कंधांत संक्षेप फारच केला असल्यामुळें असें मुळास धरून केलेलें भाषांतर क्वचितच आढळतें. एक नमुना—(तुला ईश्वरभक्ति कोणी शिकवली असें गुरुपुत्रांनीं विचारलें असतां प्रल्हाद सांगतो.)—

मूळ—यथा भ्राम्यत्ययो ब्रह्मन्स्वयमाकर्षसंनिधौ ।
तथा मे भिद्यते चेतश्चक्रपाणेर्यदृच्छया ॥ भा. ७. ५. १४.

पंतकृति—वाडव हो चुंबकमणिसंनिधि असतां जसें अय भ्रमतें ।
हरिसंनिधिनें मम मन भेद तसें पावतें, पदीं रमतें ॥ ४३ ॥

येथें मुळांतील दृष्टान्त पंतांनीं जशाचा तसा उचलून घेतला आहे. पण मुळांत ' स्वयम् ' व ' यदृच्छया ' या पदांवर विशेष जोर आहे. ज्याप्रमाणें चुंबकमण्यासंनिध लोखंड स्वतः होऊन भ्रमण पावतें त्याप्रमाणें आपोआप, ईश्वरेच्छेनेंच माझें मन ईश्वराच्या ठिकाणीं रत झालें आहे, दुसऱ्या कोणी त्याला शिकवून तयार केलें नाहीं, असें प्रह्लादास सांगावयाचें आहे. पण पंतांच्या भाषांतरांत हीं मुद्याचीं पदें राहून गेलीं आहेत. पुढें ' श्रवणं कीर्तनं विष्णोः ' इ० दोन श्लोकांचें भाषांतर—

मूल—श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ।
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥
इति पुंसार्पिता विष्णौ भक्तिश्चेन्नवलक्षणा ।
क्रियते भगवत्यद्धा तन्मन्येऽधीतमुत्तमम् ॥ भा. ७. ५. २३, २४.

पंतकृति—तेव्हां प्रह्लाद म्हणे, श्रीहरिचें श्रवण कीर्तन स्मरण ।
स्वार्पण सख्य समर्चन पदसेवन दासता नमस्करण ॥ ५० ॥

बापा, असी नवविधा भक्ति करावी, समर्पिली हरितें ।
उत्तम अध्ययन जरीं सर्वाध्ययनांत मानितो तरि तें ॥ ५१ ॥

या पांचव्या अध्यायाचे मुळांत ५७ श्लोक असून पंतकृतींत ४० आर्या आहेत. यापुढें सहाव्या अध्यायांत, एकेसमयीं आपल्या बरोबरिच्या इतर दैत्यपुत्रांना बोलावून त्यांना प्रल्हादानें जो ईश्वरभक्तीचा उपदेश केला तो आलेला आहे. मुळांतील ३० श्लोकांचें सार पंतांनीं १३ आर्यांत खुबीनें आणलें आहे. हें अलौकिक ज्ञान तुला कोठून प्राप्त झालें असें प्रल्हादाच्या सोबत्यांनीं त्याला विचारिलें. तेव्हां, " माझी माता माझ्या वेळेस गर्भिणी असतां इंद्र सर्व दैत्यांचा पराभव करून तिचा वध करण्याकरितां तिला घेऊन चालला होता; वाटेंत इंद्राला नारद भेटले. त्यांनीं त्याचा निषेध केला व त्याच्या हातून माझ्या आईस सोडवून तिला ते आपल्या आश्रमीं घेऊन गेले. तेथें गर्भाचें क्षेम व इच्छाप्रसूति हे दोन वर माझ्या आईला नारदांनीं दिले आणि तिला व मला उद्देशून ब्रम्हज्ञानाचा व ईश्वभक्तीचा उपदेश केला. स्त्रीत्वामुळें व बराच काळ लोटल्यामुळें आईचें ज्ञान सर्व विसरलें, पण नारदांनीं उपदेश केला त्यावेळीं मी जवळ ( मातेच्या गर्भांत ) असल्यामुळें तें मला ऐकायला मिळून ऋषींच्या अनुग्रहामुळे माझ्या मनांत मात्र तें दृढ होऊन बसलें." अशी हकिकत सांगून प्रल्हादानें आणखीही नारदानें सांगितलेलें ज्ञान विस्तरशः आपल्या सोबत्यांस सांगितलें. येणेंप्रमाणें सातव्या अध्यायांत मजकूर आला आहे. पैकीं प्रल्हादानें सांगितलेला आपल्या जन्माचा व ज्ञानप्राप्तीचा वृत्तान्त मात्र पंतांनीं १० आर्यांत सांगितला आहे. परंतु आपल्या नेहमींच्या धोरणास अनुसरून नारदकथित ब्रह्मज्ञान मात्र एकाच आर्येंत त्याचा निसटता उल्लेख करून गाळून टाकलें आहे.

२४ सर्व दैत्यपुत्र सुद्धां प्रल्हादाच्या उपदेशानें विष्णुभक्ति करूं लागलेले पाहून हिरण्यकशिपु फारच चिडला. प्रल्हादाच्या अंगावर धावून जाऊन त्याला ठार करण्याच्या बेतांत असतां त्याची व प्रल्हादाची प्रश्नोत्तरें झालीं तीं प्रसिद्धच आहेत. माझा रक्षणकर्ता परमेश्वर खांबांत देखील आहे असें शांतपणें त्या भक्तश्रेष्ठानें उत्तर दिल्यानंतर त्याच्या पित्यानें खांबास लात मारिली. खांबांतून ईश्वर नरसिंहरूपानें प्रकट होऊन त्याचें व त्या दैत्यशिरोमणीचें घनघोर युद्ध झालें. शेवटीं नखांनीं आतडीं विदारण करून परमेश्वरानें हिरण्यकशिपूला स्वस्वरूपीं मिळवून टाकलें. येथपर्यंत मुळाच्या आठव्या अध्यायांतील १ ते २६ श्लोक होतात व पंतांनीं

त्या प्रसंगाचें विस्तृत वर्णन करून त्याच्या बरोबर २६ व आर्या केल्या आहेत. मुळांतील सर्व हकीकत पंतांनीं विस्तारानें आणली आहे इतकेंच नव्हे तर प्रल्हादाच्या व त्याच्या पित्याच्या तोंडीं मुळांत नसलेलीं एकदोन प्रश्नोत्तरें पंतांनीं स्वतःचीं घातलीं आहेत. हिरण्यकशिपुवधानंतर या ( आठव्या ) अध्यायांत ब्रह्मदेवादिकांनीं केलेली ईशस्तुति आहे ( मूळ श्लोकः ३६ ते ५७ ). ती सर्व पंतांनीं गाळली आहे.

नवव्या अध्यायांत, कोपानें उग्र झालेल्या प्रभूजवळ जाण्यास ब्रह्मादिकही असमर्थ झाले असतां प्रह्लाद निर्भयपणें प्रभूजवळ जातो व त्याची स्तुति करून त्याला शांत करतो असें वर्णन आहे. त्याचें पंतकृत सुंदर शब्दचित्र—

यद्यपि भक्त, सकळ सुर भ्याले, प्रभुच्या पुढें न ये कोणी ।
श्रीदृष्टि म्हणे प्रीतिस ' बसत्यें नेत्रांचिया, सये, कोणीं ' ॥ ११२ ॥
शिव विधि सरकति मागें, करि जेव्हां प्रभु तयांकडे दृष्टी ॥ ११३ ॥
मोठा उत्सव सर्वां वाजविलीं दानवारिनें वाद्यें ।
गाती नाचति दुरुनि, कीं व्हावें सुप्रसन्न त्या आद्यें ॥ ११४ ॥
भगवंतातें स्तविती ब्रह्मादि समस्त परि तयाजवळ ।
जाया कोणी न शके वाटे प्रभु करिल आपला कवळ ॥ ११५ ॥
तेव्हां प्रह्लाद महाभागवत हळुच हरिकडे जाय ।
पाय प्रभुचे वंदी, हरिभय हरिबाळकास हो काय ॥ ११८ ॥

दुरून दुरूनच वाद्यें वाजविणें, नाचणें, गाणें वगैरे चेष्टा त्या देवांनीं चालवलेल्या होत्या. देवांच्या घाबरलेल्या स्थितीचें हें वर्णन मोठें सुंदर आहे; असें मुळांत नाहीं. या अध्यायांत मुख्य प्रह्लादकृत ईशस्तुति जरा अवघड पण अत्यंत प्रेमळ व भक्तिरसपरिपूरित आहे. तथापि तीही नेहमींच्या पद्धतीप्रमाणें पंतांनीं गाळून टाकली आहे. यानंतर दहाव्या अध्यायांत प्रल्हादास ईप्सित वर मागण्यास परमेश्वरानें सांगितलें तेव्हां,—

बाळ प्रल्हाद वदे प्रार्थूनि, करून कोमळा वाणी ।
निष्कामा कामवरें लोभवुनि करूं नको मला वाणी ॥ १४१ ॥
यज्ञेशा, कामांचा उद्भव चित्तीं नसो असा याला ।
देणें तरि वर दे, हा पोळी पादांबुजीं वहायाला ॥ १४२ ॥

अंतर्यामींचा अर्थ जितका प्रेमळ व उदात्त तितकीच आर्यांची बाह्यरचना व ठेवणही गंभीर, कोमल व सुंदर झाली येथें दिसून येते. प्रल्हादाबरोबरच पंतांनीही

आपलें हृद्गत येथें प्रकट केलें आहे कीं काय असें वाटूं लागतें. त्याशिवाय इतकी तल्लीनता दिसून यावयाची नाहीं. असो. नंतर प्रल्हादानें माझा पिता अपराधी असला तरी त्याला शुद्ध करावें अशी विनंति केली असतां त्याला आश्वासन देऊन नरहरिस्वरूप परमेश्वर अंतर्धान पावतो. नंतर तेथें जमलेले सुरादिक लोकपालही स्वस्थळीं जातात व पंतही येथें प्रल्हादकथेची समाप्ति करितात.

नरहरिभक्तांसि सकळ पुसुनि तदर्चित निजस्थळा गेले ।
त्या सुयशोमृतनिधिचे कण हे गोळा सुदुर्बळें केले ॥ १५५ ॥ :

३५. भगवत्स्तुति, विशेषतः वेदान्ततत्त्वांनीं युक्त अशी स्तुति, पंत नेहमीं गातात त्याप्रमाणें प्रल्हादाची स्तुतीही मंत्रभागवतांत माळली आहे हें आपण पाहिलेंच. परंतु या स्तुतीचें एक निराळेंच आर्याबद्ध रूपांतर पंतांनीं केलेलें आहे. हें भागवती प्रकरणांच्या मागें दिलेल्या यादींत 'प्रह्लादविरचित भगवत्स्तुति' म्हणून दाखल केलें आहे. मुळांतील प्रल्हादानें केलेली स्तुति नवव्या अध्यायांत ८ ते ५० पर्यंतच्या ४३ श्लोकांत आलेली आहे. पंतांनी प्रत्येक श्लोकाचें सरळ भाषांतर बरोबर तीन आर्यांत केलेलें आहे; अर्थात् १२९ आर्यांमध्यें ही स्तुति संपविली आहे. पुढें ५ आर्यांत प्रल्हादास परमेश्वरानें वर मागण्यास सांगितलें तो वृत्तांत असून शेवटीं उपसंहाराची एक आर्या घालून हें प्रकरण संपविलें आहे. या प्रकरणांतील आर्यांची रचनाशैली अगदीं साधी व सोपी असून त्यांत मुळाचें भाषांतर करण्याकडेच मुख्य लक्ष ठेवलें असल्यानें त्याविषयीं विशेष लिहिण्याजोगें असें कांहीं नाहीं. नमुन्यादाखल मुळांतील एक सोपा श्लोक व त्याचें पंतकृत भाषांतर येथें उतरून घेतों.

मूळ—कुत्राशिषः श्रुतिसुखा मृगतृष्णिरूपाः क्वेदं कलेवरमशेषरुजां विरोहः ।
निर्विद्यते न तु जनो यदपीति विद्वान्कामानलं मधुलवैः शमयन्दुरापैः ॥
भा. ७. ९. २५.

पंतकृति—कोठें ज्यांत श्रवणाचें सुख ऐसे दुष्ट सर्वही भोग ।
कोठें वपु ज्यामध्यें वसतात सदा समस्तही रोग ॥ ५२ ॥
जरिही ऐसें जाणे तरि जन न विरक्त होय हा कांहीं ।
नोहेचि सद्गुरुश्रीवेदांच्या सावधान हाकांहीं ॥ ५३ ॥
कामानल शमवितसे दुर्लभ मधुतुल्य विषयसुखलेशीं ।
पळही अवकाश नसे धाडाया मन विरक्तजनदेशीं ॥ ५४ ॥
प्रल्हादस्तुति.

हें भाषांतर हुकूमबरहुकूम असून ५३ व ५४ या आर्यांच्या उत्तरार्धांतला मजकूर पंतांनीं स्वतःचा घातला आहे हें सहज लक्षांत येईल. याशिवाय मूळ अर्थास पुष्टि आणणारी शोभादायक भर इतर अनेक ठिकाणींही पंतांनीं घातली आहे. प्रस्तुत काव्याचा उपसंहारही मोठा गोड व सुंदर बठला आहे. ही प्रल्हादस्तुति पंतांच्या पूर्ववयांतली, ज्या वेळीं पंत आपली लेखणी लहान लहान प्रकरणांवर चालवून पहात होते व ज्या वेळीं त्यांची कवितास्फूर्ति स्वतंत्र कल्पनेच्या भराऱ्या न मारतां हुकूमबरहुकूम रूपांतर करण्यांतच समाधान मानीत होती अशा वेळीं रचलेली, दिसते. ही आजपर्यंत अप्रसिद्धच होती, इतकेंच नव्हे तर हिच्या अस्तित्वाचाही कोणास पत्ता नव्हता. तिचा वृत्तांत या पुस्तकांत प्रथमच बाह्य जगास ज्ञात होत आहे.

३६. यानंतर प्रल्हादकथेवरील आणखी एक स्फुट प्रकरण म्हणजे 'प्रल्हाद-चरित्र' या नांवानें काव्यसंग्रहकारांनीं प्रसिद्ध केलेला 'सत्यं विधातुं' या श्लोकावरील श्रीधरस्वामींच्या टीकेचा आर्याबद्ध अनुवाद होय. यास का. सं. कारांनीं दिलेलें प्रल्हादचरित्र हें, किंवा इतरांनीं दिलेलें 'प्रल्हादप्रकरण' हें, नांव असलें अनुचित आहे. वस्तुतः परमेश्वरानें नृसिंहावतार कोणत्या हेतूनें घेतला हें प्रतिपादन करणाऱ्या एका श्लोकावरील टीकेचा हा अनुवाद आहे. दुसरें कांहीं देतां येण्यासारखें नांव न दिसल्यामुळें कांहीं तरी नांव द्यावयाचें म्हणून प्रकाशकांनीं वरील नांवें दिलेलीं दिसतात. असो.

मूळ श्लोक असा आहे—

> सत्यं विधातुं निजभृत्यभाषितं व्याप्तिं च भूतेष्वखिलेषु चात्मनः ।
> अदृश्यतात्यद्भुतरूपमुद्वहन्स्तम्भे सभायां न मृगं न मानुषम् ॥
>
> भा. ७. ८. १८.

यावरील टीकेचा विशेष येवढाच आहे कीं, निजभृत्य या शब्दानें १ प्रल्हाद, २ सनत्कुमार, ३ हिरण्यकशिपु, ४ ब्रह्मा, ५ नारद अशा निरनिराळ्या व्यक्ति घेऊन त्यांनीं निरनिराळ्या वेळीं बोललेले शब्द खरे करण्याकरितां ईश्वर 'स्तम्भे सभायां, न मृगं न मानुषम्' अशा रीतीनें प्रकट झाला असें टीकाकारांनीं दाखविलें आहे. या टीकेचा सरळ अनुवाद पंतांनीं २० आर्यांत केला आहे. यापेक्षां या प्रकरणांत विशेष कांहीं नाहीं.

३७. यापुढें मयासुरानें उत्पन्न केलेल्या मायावी त्रिपुरांपुढें श्रीशंकर हतवीर्य

झाले असतां परमात्म्या विष्णूनें त्यास शक्ति देऊन त्यांजकडून त्रिपुरांचा पराभव करविला ही दहाव्याच अध्यायांत वर्णिलेली लहानशी कथा पंतांनीं संक्षेपानें कथन केली आहे. एकंदर १० व्या अ० चे ७१ श्लोक मुळांत असून पंतांनीं तो २६ आर्यांत आणला आहे.

यापुढें पांच अध्यायांत वर्णाश्रमधर्म वगैरेंचें विवेचन आलें असून पंतांनीं तें गाळलें आहे असें वर सांगितलेंच आहे. फक्त अकराव्या अध्यायांत धर्माचीं सत्य, दया, तप इ० तीस लक्षणें सांगितलीं आहेत त्यांचें मात्र ४ आर्यांत परिगणन केलें आहे. ज्यांचा अवलंब केल्यानें समाज शुद्ध होतो असे वर्णाश्रमधर्म नारदमुनींनीं धर्मराजास निवेदन केले असें परभारेंच सांगून पंत त्या वर्णाश्रमधर्मांना दुरूनच नमस्कार करतात.

वाखाणावे किति ते म्यां विस्तरभीरुनें ? जयां न मन।
विसरे क्षणहि कवींचें, केलें साष्टांग हें तयां नमन ॥ ७, १७५.

---

## [ अष्टम स्कंध ]

१८. सातव्या स्कंधापेक्षां आठवा स्कंध मोठा असून त्यांत चार महत्त्वाचीं आख्यानें भगवंताच्या पांच अवतारांच्या वर्णनासह आलीं आहेत. अ० २,३,४ यांत गजेंद्रमोक्षाचें लहानसेंच परंतु सुंदर आख्यान आलें असून पांचव्या अध्यायापासून नवव्या अध्यायापर्यंत अमृतमंथनाची भव्य कथा कूर्मावताराचे वर्णनासह आली आहे. दहाव्या व अकराव्या अध्यायांत देवदैत्यांच्या संग्रामाचें वर्णन असून बाराव्यांत विष्णूचें मोहिनीस्वरूप पाहून शंकरांची झालेली त्रेधा वर्णन केली आहे. पुढें १५ व्या अध्यायापासून २३ व्या अध्यायापर्यंत वामनावतारासह बलिराजाचें अत्यंत रमणीय व उदात्त कथानक वर्णिलें असून २४ व्या अध्यायांत श्राद्धदेव नामक मनूचें व मत्स्यावताराचें वर्णन आलें आहे. हीं सर्व ८ व्या स्कंधांतील कथानकें मन्वंतरवर्णनाच्या सूत्रामध्यें गोवून शुकाचार्यांनीं परीक्षितीस निवेदन केलीं आहेत. मन्वंतरांचें वर्णन हें पुराणांच्या प्रसिद्ध पंचलक्षणांपैकीं आहे. तें लक्षण पूर्ण करणारा भागवताचा स्कंध हा आठवाच होय. यांत शुकाचार्यांनीं प्रस्तुतच्या कल्पामधील चौदा मन्वंतरांचें वर्णन, प्रत्येक मन्वंतरांतील मनूचें नांव त्याचे पुत्र, देव, ऋषि व ईश्वरावतार या सर्वांच्या परिगणनासह केलें आहे; व वर उल्लेखिलेल्या चार मुख्य आख्यानांच्या कथा मन्वंतरांचें परिगणन चाललें असतां मध्यें ओघास आल्या म्हणून शुकाचार्यांनीं सांगितल्या असें दाखविलें

आहे. गजेंद्रमोक्षाची कथा ही चौथ्या तामस मन्वंतरांतील असून कूर्मावताराची व अमृतमंथनाची कथा ही सहाव्या चाक्षुष मन्वंतरांतील होय. वामनावताराची कथा सातव्या, म्हणजे सध्याच्या, वैवस्वत मन्वंतरांतील होय. मत्स्यावताराची कथा मात्र चौदाही मन्वंतरांच्या आधींची, या कल्पाच्या प्रारंभींची होय.

हें सर्व कथांभोंवतीचें मन्वंतराचें वेष्टन पंतांनीं अगदींच काढून टाकलें नसलें तरी अगदीं शिरशिरीत केलें आहे. अगोदर, पहिल्या अध्यायामध्यें मुळांत पहिल्या सहा मन्वंतरांचें ऋषि, देव, अंशावतार वगैरेंच्या नामावळ्यांसह वर्णन केलें आहे तें गाळून पंतांनीं फक्त त्या मन्वंतरांचा दोन आर्यांत उल्लेख मात्र केला आहे. आणि लगेच तिसऱ्या आर्येंत गजेंद्रमोक्षास प्रारंभ केला आहे. ही अत्यंत प्रेमळ व मोहक कथा पंतांनीं अवघ्या २४ आर्यांत आणली आहे; ( मूळ श्लोक ९१ ). गजेंद्र ज्या पर्वतावर वनामध्यें विहार करीत असे त्या पर्वताचें व वनाचें मुळांतील काव्यमय विस्तृत वर्णन पंतांनीं गाळलें असून गजेंद्राचा पाय नक्रानें धरल्यानंतर गजेंद्रानें केलेली सुंदर ईशस्तुति ( मूळ श्लोक २९ ) देखील पंतांनीं बाजूस सारली आहे. ईशस्तुति पंत शक्य तितकी टाळतात हें आपण पाहिलेंच आहे. असो; मोठ्या कष्टानें शुंडाग्रानें कमल उचलून गजेंद्रानें ईश्वरास अर्पण केलें तेव्हाचें दोघांनीं केलेलें वर्णन —

मूळ—सोऽन्तःसरस्युरुबलेन गृहीत आर्तो दृष्ट्वा गरुत्मति हरिं ख उपात्तचक्रम् ।
उत्क्षिप्य साम्बुजकरं गिरमाह कृच्छ्रात् नारायणाखिलगुरो भगवन्नमस्ते ॥
भा. ८. ३. ३२.

पंतकृति—वारिज धरुनि करातें कष्टें उचलूनि बैसतां झोले ।
स्तवुनि विलोकुनि गरुडीं, ' नारायण, ते नमोऽस्तु' हें बोले ॥ १० ॥

मुळांतील केवळ संदर्भ मात्र घेऊन त्यास आपल्या कल्पना सौष्ठवानें खुलवून बहारीचें वर्णन करण्याची पंतांची शैली—

मूळ—एवं गजेंद्रमुपवर्णितनिर्विशेषं ब्रह्मादयो विविधलिङ्गभिदाभिमानाः ।
नैते यदोपससृपुर्निखिलात्मकत्वात्तत्राखिलामरमयो हरिराविरासीत् ॥
भा. ८. ३. ३०.

पंतकृति—मौलक्रीसे लोकप, तातचि पाहुनि मुलास कळकळतो ।
तैसा हरिच कवि म्हणाति, ' देवा, प्रेमा तुला सकळ कळतो ' ॥ १२ ॥

१९. यानंतर मुळांत ५ ते ९ अध्यायांत वर्णन केलेलें अमृतमथनाचें आख्यान पंतांनीं ४६ आर्यांत वर्णिलें आहे. मुळांत याचे २१० श्लोक असून पंतांनीं

याच कथानकावर जें 'अमृतमथन' नामक खंडकाव्य लिहिलें आहे त्याच्या आर्या १५८ आहेत. याशिवाय महाभारताच्या आदिपर्वांतील १७, १८ व १९ या अध्यायांत अमृतमथनाची कथा आली आहे व तीस अनुसरून सुमारें २७ आर्यांत पंतांनीं आपल्या महाभारतांत ही कथा आणखी एकदां वर्णिली आहे. अमृतमथनाची व कूर्मावताराची गोष्ट सुप्रसिद्धच आहे. महाभारतांतील व भागवतांतील या कथेमध्यें कांहीं विशेष फरक नाहीं. भारतापेक्षां भागवतामध्यें ही कथा सुमारें दुप्पट विस्तार करून सांगितली आहे येवढेंच. दोन्ही कथांमध्यें समुद्रमंथनानंतर निघालेल्या चवदा रत्नांचीं नांवें दिलेलीं नाहींत. फक्त नऊ रत्नांचीं नांवें सांपडतात. असो. मुळांतील समुद्रमंथनाची हकीकत अतिशय सुंदर, सरळ व प्रासादिक भाषेंत वर्णिली आहे. देवांचे व खोट्या आशेस लागलेल्या दैत्यांचे ते दीर्घ प्रयत्न, परमेश्वराचें वरून सर्वांना सारखें परंतु आंतून दैत्यांना फसवेगिरीचें असलेलें साहाय्य, वगैरे गोष्टी मूळ भागवतांत व पंतकृतींतही मोठ्या सुंदर रीतीनें वर्णिल्या आहेत. त्यांतल्या त्यांत ' अमृतमथन ' नामक स्फुट आख्यानांत पंतांना अवकाश चांगला सांपडल्याकारणानें तेथें वर्णनास जास्त रंग चढला आहे. मुळांत ब्रह्मादिक देवांनीं केलेल्या तीन ईश्वरप्रार्थना आल्या आहेत त्या अर्थातच पंतांनीं गाळल्या आहेत. या तीन्ही स्तुति बहुधा वेदान्तमय व चर्वितचर्वणात्मक असल्याचें त्या गाळल्याबद्दल कांहीं खेद वाटण्याचें कारण नाहीं. असो; ब्रह्मदेवादिकांनीं प्रार्थना केल्यानंतर ईश्वर त्यांच्या पुढें प्रगट झाला त्यावेळच्या भगवान् श्रीहरीच्या ध्यानाचें वर्णन पंतांनीं फार सुंदर केलें आहे. ( अ. म. १; ७-१७ ). इंद्रादि देव बळीकडे साम करण्याकरितां गेले तेव्हां बळीचे अनुयायी दैत्य त्यांना मारावयास धांवले. आपल्या अनुयायांची ही अनुचित प्रवृत्ति पाहून बळीस फार वाईट वाटलें.

धवला कीर्तिदुशाला टाकवुनि अकीर्तिकांबळीला जे ।
पांघुरवितें न ते बुध, त्या कर्मे तो न कां बळी लाजे ॥ अ. म. १. २९.

कूर्मरूप ईश्वरानें मंदरपर्वत पाठीवर स्थिर धरला. त्याच्यावर पंत सुंदर कल्पना करतात--( ही आर्या निदर्शनालंकाराचें सुंदर उदाहरण आहे. )—

भरमम गिरिस पृष्ठीं धरि, होय क्षीरधींत कासवसा ।
उपदेशी कीं माझी स्वस्थ सुजनहो धरूनि कास वसा ॥ अ. म. १.४०.

कालकूटापासून रक्षण करण्याबद्दल देवांनीं प्रार्थना करितांच कोमल मनाच्या भोळ्या शिवास दया आली.

तत्काळचि करुणार्णव देव भक्तांसीकृतौत्सुकळ भळला ।
तें विश्वप्राणहर व्यसन विलोकूनि फार कळवळला ॥ अ. म. १.५५.
व जन, जगदीश्वरि, यांचें स्वस्थरमसुखेंचि सेवितों विष मी । १.६२.
असें आपल्या अर्धांगीला सांगून लोककल्याणास्तव शंकरानें तें विष पिऊन टाकलें. येथपर्यंत मुळांतील ५ ते ७ अध्याय व ' अमृतमथन ' काव्याचा पहिला अध्याय होतो.

पुढें त्या क्षीरोदधींतून लक्ष्मी प्रकट झाली. तिला सर्व देवतांनीं उपायनें दिलीं व अभिषेक केला. हातांत माळा घेऊन तेथें जमलेल्या त्रैलोक्यांतील सर्व प्रसिद्ध व्यक्तींचें स्वयंवरार्थ तिनें अवलोकन केलें. सर्व देवदानवसिद्धगंधर्वमानवांमध्यें प्रत्येकीं कांहींना कांहीं तरी दोष तिला आढळलाच. फक्त पुरुषोत्तम श्रीहरि हाच काय तो एक निर्दोष व सर्वगुणसंपन्न पुरुष तिला दिसला व ती

चित्तीं म्हणे, " सुमंगळ वर हाचि न अन्य धन्य याहूनि ॥ अ.म. २.३८.
" जरि हा आत्मरत प्रभु याला माझी नसे तिळहि परवा ।
" पर वाहेन वपु पदीं, ऐसा कैसा मिळेल वर बरवा ॥ २.३९.
" जावें शरण प्रभुतें जशि गेली सुरनदी नदीनातें ।
"शोभे महत्तमातें आश्रय करितां न दीन दीनातें ॥ ४० ॥
"स्वरताहि मुकुंदातें वरत्यें कीं आधि हा सरो, वर हो ।
" स्नातातें निववी, जरि अपरापेक्षक, सुधासरोवर हो " ॥ ४१ ॥
यद्यपि आत्मरत प्रभु हरि तरि वरिला परासि न वरी हो ।
कंठीं घालुनि माळा झाली श्रीविष्णुचीच नवरी हो ॥ ४२ ॥

सुरनदीचा ( आर्या ४० ) व सुधासरोवराचा ( आ. ४१ ) हे दोन्ही दृष्टान्त किती समर्पक व मनोहर आहेत ! मुळांत लक्ष्मीची उत्पत्ति व तिचें स्वयंवर यांचें वर्णन अत्यंत मोहक आहे. पंतांचेंही उत्कृष्ट परंतु अगदीं निराळ्या तऱ्हेचें आहे. यानंतर मोहिनीस्वरूप धारण करून दैत्यांना भुरळ पाडून त्यांना फसविल्याचें वर्णन नवव्या अध्यायांत आहे तेंही मुळांतल्याप्रमाणें सुंदर वठलें आहे. दैत्यांच्या समुदायांत अमृतकलश घेऊन मोहिनी वाढावयास आली तेव्हां

मूर्तिमती ती मंजुळ गीतिच जाणों मृपव्रजीं आली । अ. म. ३.१७.

तिच्या रूपयौवनचेष्टांनीं सर्व दैत्य मोहून गेले.

लीलाविलोकनास्मितनर्मांहीं न भुलला न आढळला ।
त्यांत पदर तद्दैर्यांकरवीं म्हणवावयासि हा ! ढळला ॥ अ. म. ३.१९.

इतकें झाल्यावर मग काय ? सर्व दैत्य अगदीं पागळच बनले व हातांतलें अमृत गमावून हात चोळीत परत गेले.

'अमृतमथन' काव्य येणेंप्रमाणें फार सुंदर साधलें आहे. तथापि भाषेची व आर्यारचनेची धाटणी यांत इतकी सफाईदार व घटलेली दिसत नाहीं. व्याकरण-दृष्ट्या कांहीं दोषही यांत राहिले आहेत. यांतील पुष्कळसे दोष अशुद्ध पाठां-मुळेंच उत्पन्न झालेले असले पाहिजेत यांत शंका नाहीं. ते पराडकरांची प्रमाण आवृत्ति प्रसिद्ध होईल तेव्हांच नाहींसे होणारे आहेत.

४०. 'अमृतमथना'स सोडून आतां आपण मंत्रभागवतांतील पुढच्या कथे-कडे वळूं. १० व ११ अध्यायांत देवदैत्यांचा पुनः संग्राम झाला तो वर्णिला आहे. पंतांनीं मंत्रभागवतांत तो त्रोटकपणें आणला आहेच. नंतर १२ व्यांतली मोहिनीस्वरूप पाहून शंकरांची उडालेली गाळण पंतांनीं फार मजेदार रीतीनें परंतु मर्यादेनें वर्णिली आहे. १३ व १४ हे अध्याय पुनः मन्वंतरांच्या परिगण-नाचे असून ते पंतांनीं गाळलेच आहेत. अ० १५ पासून वामनावतारचरित्रास सुरवात झाली आहे.

४१. वामनावताराचें कथानक हें मूळ भागवतांतील अत्यंत सुंदर रीतीनें वर्णिलेल्या कथानकांपैकीं एक आहे. मूळ कथानक तर उदात्त आहेच पण भाग-वतकारांनीं तें वर्णन करण्यांत आपल्या सहृदयतेची व कौशल्याची अगदीं हद्द दाखविली आहे. सहाव्या स्कंधापासून उत्तरोत्तर त्यांच्या वाणीला अधिकाधिक रंग चढत चालला असून येथें तर त्याची परमावधि झाली कीं काय असें वाटतें. तथापि नवव्या स्कंधांतील अंबरीषाचें आख्यान, पुरूरव्याचें चरित्र इत्यादि कथा देखील अशाच सुंदर आहेत. त्या सर्व वाचून भागवतकारांच्या वाणींत अवगाहन घडल्याकारणानें मन प्रसन्न झाल्यावांचून रहात नाहीं. प्रस्तुत वामनावतारकथा ही १५ ते २३ या नऊ अध्यायांत आलेली असून या अध्यायांची एकंदर श्लोक-संख्या ३३५ आहे. या ३३५ श्लोकांच्या वामनावतारकथेचें सार मंत्रभागवतांत पंतांनीं केवळ २८ आर्यांत सांगितलें आहे. अर्थात् पंतांच्या अतिसंक्षेपकौशलाचें कौतुक करण्यापलीकडे या आर्यांचें फारसें महत्त्व नाहीं. आणि पंतांनीं तरी इतरत्र वामनचरित्र विस्तारानें वर्णिलें होतें म्हणूनच मंत्रभागवतामध्यें त्याचा असा अतिसंक्षेप केला. अर्थात् मंत्रभागवताच्या वाचकांना या अतिसंक्षेपानें दचकवून 'माझें दुसरें विस्तृत वामनचरित्र आहे तें आपण वाचा' अशी सूचना देण्याचें काम हें अतिलोटक वामनचरित्र चांगलें बजावील यांत शंका नाहीं.

तथापि त्यांतल्यांत्यांत थोडीशी गंमत केल्याशिवाय पंतांना राहवलें नाहीं. बळिराजाचे गुरु कवि ऊर्फ शुक्राचार्य यांनीं अनेक यज्ञ व तपें करून बळीचें बळ वाढविलें या गोष्टीस अनुलक्षून पंत म्हणतात—

वाढविलें बळ कविनें बळिचें, अनिळें जसें चि अनळाचें ।
कीं सुरस वाहणें तें गुरुजळदाधीन शिष्यपनळाचें ॥ १०६ ॥

मेघ जर पाऊस पाडील तर पन्हळ चांगला वाहील. येथें पंतांनीं गुरूला मेघाचा व शिष्याला पन्हळाचा दृष्टान्त दिला आहे. तो जरी समर्पक आहे तरी इतका क्षुल्लक व चमत्कारिक आहे कीं तो वाचून हसूं आल्याखेरीज रहात नाहीं.

४२. आतां आपण पंतांच्या 'वामनचरिता'कडे वळूं. सातव्या स्कंधांतील प्रल्हादकथेप्रमाणें वामनकथेचेही तीन भाग पडतात. पहिला भाग वामन-जन्मापर्यंतचा प्रास्ताविक स्वरूपाचा होय. यांत बळीचा इंद्रावर जय व त्याला इंद्रपदप्राप्ति, त्यामुळें देवमाता अदिति हिचा खेद, अदितीला पयोव्रताचा उपदेश व त्यामुळें तिला गर्भसंभव, इतकी हकीकत येते. ही १५, १६, १७ या अध्यायांत आली आहे. पुढें दुसरा भाग म्हणजे १८, १९ व २० या अध्यायांचा. यांत बटु वामनाचें बळीकडे गमन, त्रिपाद भूमीची याचना व शुक्राचार्य निषेध करीत असतांही बळीनें केलेलें त्रिपाद भूमीचें दान, इतके विषय आले आहेत. पुढें अंतिम भागांत म्हणजे २१, २२ व २३ अध्यायांत वामनाच्या दुसऱ्या पावलाचें स्वर्गलोकास व्यापून सत्यलोकीं गमन, वामनाचें हें कपट पाहून बळीच्या अनुयायी दैत्यांचा वामनावर झालेला रोष, तिसऱ्या पावलाकरितां बळीनें केलेलें स्वमस्तकदान, बळीचें इंद्रपदापासून उच्चाटन व त्याची सुतळीं स्थापना इ० वृत्तान्त आला आहे. या एकंदर आख्यानाची श्लोकसंख्या ३३५ आहे हें वर सांगितलेंच आहे. पंतांच्या 'वामनचरित्रा'ची संख्या १९९ आहे. पंत-कृतीची पद्यसंख्या जी ही इतकी कमी दिसते ती मुळांतील अनवश्यक, बिन-महत्त्वाचे व काव्यहानिकारक प्रसंग गाळून टाकल्यामुळें झालेली आहे. पंधराव्याच अध्यायांतील अमरावती नगरीचें वर्णन, १६ व्या अध्यायांतला अदि-तीला पयोव्रतोपदेश, ब्रह्मदेवकृत गर्भस्तुति इ० प्रकरणांचा पंतांनीं अतिसंक्षेप केला आहे. परंतु इतर सर्व कथानक त्यांनीं मुळाइतकेंच किंबहुना कित्येक ठिकाणीं मुळापेक्षांही जास्त विस्तारानें वर्णिलें आहे. या आख्यानांतील पुष्कळशा आर्या मुळाच्या अगदीं भाषांतररूप अशा सुद्धां उतरल्या आहेत. मुळाचें बरोबर

रूपांतर केलेलें पहावयाचें असल्यास पंतांच्या या आख्यानांतील ९८, ९९, १०४, १०५ या आर्या मुळांतील अ० २० श्लोक ८, ९, ११ यांच्याशीं ताडून पहाव्या. त्याचप्रमाणें आर्या १३४, १४०, १४१, १४२ या मूळ अ० २१ श्लोक १५, २१, २२, २३ यांच्याशीं अनुक्रमें पडताळून बघाव्या. विस्तारभयास्तव येथें उतारे देतां येत नाहींत. पुष्कळ वेळां मूळ श्लोकांच्या अर्धांतला आशय पंत आपल्या आर्येच्या पूर्वार्धांत आणतात व उत्तरार्धांत स्वतःच्या कल्पनाप्रौढ्यानें एखाद्या सहृदय व सुंदर अशा अलंकाराची योजना करतात. अशा तऱ्हेची पद्धति स्वीकारल्यानें पंतांच्या हातून पुष्कळ ठिकाणीं मुळापेक्षा विस्तारही झाला आहे. कांहीं ठिकाणीं पंतांनीं संक्षेप अतिशय मार्मिकपणानें केला आहे. मुळांतील १६ व १७ हे लांबलचक अध्याय काव्यदृष्टीनें खरोखर हानिकारक आहेत. सोळाव्यांत कश्यप व अदिति यांचीं लांबच लांब भाषणें असून अदितीला केलेला पयोव्रतोपदेश आहे. हा पयोव्रतोपदेश अलीकडल्या एखाद्या दक्षिणालोलुप उपाध्यानें आपल्या भोळ्या यजमानस्त्रीस व्रतांचा व उद्यापनांचा उपदेश करावा त्याप्रमाणें दिसतो. पुढें १७ व्या अध्यायांत भगवंतांनीं प्रकट होऊन अदितीस केलेलें वरदान आहे तें जरी सुगम व कथानकाच्या दृष्टीनें अवश्य असलें तरी काव्य या नात्यानें विशेष रमणीय नाहीं. तेव्हां ९० श्लोकांचे हे दोन अध्यायांचें भाऊ पंतांनीं संकुचित करून केवळ ९ आर्यांत आणलें आहे. ( वा. च. १६—२४ ). पुढें १८ व्या अध्यायांत मात्र वामनजन्म, वामनाचें उपनयन व त्याचें बलियज्ञाप्रत गमन वगैरे सुंदर कथाभाग असल्यानें तो पंतांनीं विस्तारानें वर्णन केला आहे. वामनजन्मप्रसंगींचें वर्णन—

मूळ—श्रोणायां श्रवणद्वादश्यां मुहूर्तेऽभिजिति प्रभुः ।
सर्वे नक्षत्रताराद्याश्चक्रुस्तज्जन्म दक्षिणम् ॥ भा. ८. १८. ५.

पंतकृति—भाद्रपद शुक्ल पक्षीं मध्याह्नीं द्वादशीदिनीं श्रवणीं ।
प्रकटे प्रभु वर्षाया अमृत जनीं स्वपदपंकजप्रवणीं ॥ वा.च.२५

त्यावेळीं, दिशः प्रसेदुःसलिलाशयास्तदा प्रजाः प्रहृष्टा ऋतवो गुणान्विताः ।
द्यौरन्तरिक्षं क्षितिरग्निजिह्वा गावो द्विजाः संजहृषुर्नगाश्च ॥
भा ८. १८. ४.

( पंतकृत रूपांतर )—प्रभुच्या प्रादुर्भावीं झाल्या विमला दिशा, प्रजा मुदिता ।
गोद्विजसुरग्रहगणीं सुखशोभा ज्ञानसंपदा उदिता ॥
वा. च. २७.

अर्थात् हें रूपांतर मुळाबरहुकूम नाहीं, बरेंचसें गाळलें आहे. अन्मतः तो वामन उपनयनयोग्य असा बटु झाला व त्याचें ऋषींनीं उपनयन केलें; तेव्हां—

सावित्री सविता दे भिक्षा जगदंबिका उमा त्याला । वा. च. ११

याप्रमाणें त्या 'मायामाणवक प्रभूला' सर्व देवांनीं ब्रह्मचाऱ्याचें साहित्य दिलें. लगेच तो बळीच्या यज्ञमंडपांत गेला. तेव्हां तेथिल सभ्यांनीं त्याच्या तेजानें धर्षित होऊन त्याला उत्थापन दिलें.

तेजें धर्षित झाले ग्रह कोण असा रवीस जो पाहे ॥ १८ ॥
भार्गव सशिष्य उठले, सभ्य जनहि, अग्निहि स्वकुंडांत ।
देहांत सर्व सात्विक भाव 'नमस्तेऽस्तु' सर्व तुंडांत ॥ वा. च. १९ ॥

या आर्येच्या दोन्ही अर्धांतील क्रियादीपक अलंकारानें बहार केली आहे तेथील शब्दचित्र इतकें उठावदार आहे कीं, तो यज्ञमंडपाचा व चमकून जाऊन एकदम धडपडून उठणाऱ्या त्या ऋत्विजांचा देखावा रेखल्यासारखा डोळ्यापुढें उभा राहातो.

याप्रमाणें पुढें हें सर्व काव्य उत्कृष्ट उतरलें आहे. एकोणिसाव्या व विसाव्या अध्यायांतील शुक्राचार्य व बलि यांचा धर्मनीतिविषयक संवाद तर फारच सुंदर बठला आहे.पंतांनीं बहुतेक मुळाचाच अनुवाद केला आहे.कोठें कोठें मात्र स्वतः-च्या कल्पना शिरकवून दिल्या आहेत. पूर्वार्धांत मुळाचें भाषांतर करून उत्तरार्धांत स्वतःची कल्पना गोवण्याच्या पंतांच्या शैलीचा मागें उल्लेख केलाच आहे. तिचें एक उदाहरण—

मूळ—यदृच्छालाभतुष्टस्य तेजो विप्रस्य वर्धते ।
तत्प्रशाम्यत्यसंतोषादम्भसेवाशुशुक्षणिः ॥ भा. ८. १९. २६.

पंतकृति—जो संतुष्ट यदृच्छालाभें ब्राह्मण सदैवही असतो ।
वाढे तत्तेज, असा बहुतेजस्कर नव्हे सुधारस तो ॥ ६७ ॥
द्विजतेज असंतोषें शमतेंचि ज्वलन जेवि तोयांत ।
हालाहलांत दुर्गुण जो जैसा काय तेंवि तो यांत ॥वा.च.६८॥

या दोन्ही आर्यांच्या पहिल्या अर्धांत मुळांतील अर्थ समाविष्ट केला असून दुसऱ्या अर्धांत स्वतःच्या कल्पनेनें अलंकार घातले आहेत. केव्हां केव्हां मुळां-तील संदर्भास अनुकूल अशी एकादी स्वतःचीच आर्या पंत रचून घालतात ती फार सुंदरही असते. उदाहरणार्थ.—

वित्त प्रयोजनाधिक जें तें संरक्षणें असुख रचितें ।
किंबहुना जो लोभी जन त्याचे सर्वथा असु खरचितें ॥ ७० ॥

या आर्येस मुळांत आधार नाहीं. एके ठिकाणीं मात्र पंतांचा थोडासा घोटाळा झाला आहे. शुक्राचार्य बळीला श्रेयस्कर नीति कोणची याचा उपदेश करीत असतांना सांगतात.—

सत्यमोमिति यत्प्रोक्तं यन्नेत्याहानृतं हि तत् ॥ भा. ८. १९. ३८.

' ओम् ' (' ठीक आहे ' ' देतों ' ) असें म्हणणें म्हणजे सत्य होय व ' न ' ( ' नाहीं, ' ' देत नाहीं ' ) असें सांगणें म्हणजे अनृत होय. अशा तऱ्हेचा ' सत्य व ' अनृत ' यांचा या प्रकरणापुरता पारिभाषिक अर्थ करून मग शुक्राचार्य पुष्कळ ठिकाणीं ' अनृता ' नें वर्तन करणें ( म्हणजे मागितलें असतां दान देत नाहीं असें म्हणणें, खोटें बोलणें नव्हे ) श्रेयस्करच असतें असें प्रतिपादन करतात. पण सत्य व अनृत यांच्या येथें मुद्दाम ठरवलेल्या अर्थाकडे पंतांचें दुर्लक्ष झालें आहे. त्यांनीं खरें बोलणें व खोटें बोलणें असे नेहमींचे अर्थ घेऊन विवेचन केलें आहे तें मुळास अनभिप्रेत आहे. खरें किंवा खोटें बोलण्याचा येथें प्रश्नच निघत नव्हता; दान द्यायचें की नाकारायचें हा मूळ प्रश्न होता. (पहा वा. च. ८४ ते ८७ ).

तिसरें पाऊल बळीच्या मस्तकीं दिल्यानंतर वामनस्वरूपी भगवंतांनीं बळीस सुतळीं जावयास सांगितलें त्यावेळचें वर्णन पंतांनीं फार सुंदर केलें आहे.

प्रभुवर बळिस स्वमुखें प्रथम 'महाराज इंद्रसेन' असें ।
संबोधन करुनि वदे करुणेच्या प्रीतिच्या द्रवोनि रसें ॥ १५४ ॥

प्रल्हादज्ञातींसह तूं सुतळा वसिव जा सुरमणीया ।
रमविल तुज वसति जशी म्हणणारी कामुका सुरमणी ' या ' ॥ १५६ ॥
निश्चिंत रहा सुतळीं रक्षीन सदा तुला सपरिवारा ।
माता आपण मागे लागोंचि न दे मुलास परि वारा ॥ वा. च. १५९ ॥

शेवटीं शेवटीं या काव्याला जास्त रंग चढत गेला आहे व पंतांची लेखणीही पुढच्या भागातच जास्त विस्तार पावली आहे. तेविसाव्या अध्यायांतील शेवटची बळीची एका श्लोकाची प्रार्थना पंतांनीं सहा आर्यांइतकी विस्तृत केली आहे.

४३. ' अमृतमथन ' व ' वामनचरित ' हीं खंडकाव्यें दोन कुळीं भावंडें असल्याप्रमाणें भासतात. आर्येची सुबक व प्रौढ परंतु जराशी कृत्रिम धाटणी,

कल्पनांचा विकास, उपमादि अर्थालंकारांचें व यमकादि शब्दालंकारांचें प्राचुर्य, इत्यादि अनेक लक्षांत भरण्याजोगे गुण दोन्ही काव्यांत ठळकपणें दिसून येतात. यावरून हीं दोन्हीं काव्यें एकाच वेळीं, बहुधा काव्यरचनेच्या पूर्वकालांत, अलंकारांची हौस कायम असतांना लिहिलेलीं असावींत असें वाटतें. अर्थालंकारांचें प्राचुर्य तर पदोपदीं दिसून येतें; सहृदयहृदयाह्लादक अलंकारांनीं दोन्हीं काव्यें खचून भरलीं आहेत. दीर्घ यमकाचा मासलाही पंतांनीं अनेकवार दाखविला आहे. एक उदाहरण--

दे प्रभुवि, कर्णाच्या सुख न्हाया बहु मानसा, बळी काय। (काय-शरीर)
मांगा देवावांचुनि पावे बहुमान सांवळी काय ॥ वा. च. १९१ ॥.

येथें नऊ अक्षरांचें यमक साधलें असून द्वितीयार्धातील दृष्टान्ताची योजनाही फार समर्पक झाली आहे.

वामनचरित काव्याचें निरीक्षण संपलें. आतां यापुढें आपल्याला पुनः मंत्रभागवताकडे वळलें पाहिजे. पण तेथेंही यानंतर अष्टमस्कंधांत विशेष प्रेक्षणीय असा भाग राहिलेला नाहीं. चोविसाव्या अध्यायांत, प्रलयकालीं परमेश्वरानें मत्स्यरूप घेऊन, श्राद्धदेव नांवाचा वैवस्वत मनु, सप्तर्षि, औषधी, व बीजें यांचें रक्षण केलें ती कथा आली आहे व पंतांनीं ती नेहमींप्रमाणें सुंदर रीतीनें वर्णिली आहे.

---

## [ नवम स्कंध ]

४४. श्रीमद्भागवताचा नवमस्कंध हा सूर्यवंशी व चंद्रवंशी राजांच्या वंशावळींनीं व चरित्रांनीं भरलेला आहे. ' वंश ' आणि 'वंशानुचरित' हीं पुराणाच्या लक्षणांतील दोन महत्त्वाचीं अंगें पूर्ण करणारा हाच स्कंध असें म्हणण्यास हरकत नाहीं. चवथ्या व पांचव्या स्कंधांतही स्वायंभुव मनूच्या वंशांतील राजांचीं चरित्रें सांगितलीं आहेत. पण ते राजे सर्व प्राचीन व स्वायंभुव मन्वंतरांतील होत. नवव्या स्कंधांत सध्यां चालू असलेल्या म्हणजे वैवस्वत मनूंतील राजवंशांचें वर्णन आहे. अगदीं वैवस्वत मनूपासून आरंभ करून श्रीकृष्णाच्या कालापर्यंत व श्रीकृष्णानंतरच्या कांहीं पिढ्यांपर्यंत देखील सर्व राजवंशांच्या विस्तृत वंशावळी सांगितल्या असून त्यांतील महत्त्वाच्या व्यक्तींनीं काय काय कृत्यें केलीं तींहि मधून मधून नमूद केलीं आहेत. नवव्या स्कंधांत भारतवर्षांतील राजवंशांचें अनेक

श्रीकृष्णाच्या कालापर्यंत आणून सोडल्यानंतर दहाव्या स्कंधांत भागवतकारांनीं ओघास आलेलें श्रीकृष्णाचें चरित्र कथन केलें आहे व अकराव्या स्कंधांत श्रीकृष्णाचें निर्याण व यादवकुलांचा नाश वर्णन केला आहे. श्रीकृष्णचरित्राचें कथन करण्याकरितां नवमस्कंधाच्या शेवटीं अपुऱ्या सोडलेल्या वंशावळींचे धागेदोरे बाराव्या स्कंधांत भागवतकारांनीं पुनः हातीं घेतले असून राजांच्या वंशावळी अगदीं आधुनिक कालापर्यंत कथन केल्या आहेत. भागवत हें श्रीशुकांनीं परीक्षित् राजाला सांगितलें तेव्हां बाराव्या स्कंधांत सांगितलेल्या परिक्षित् राजाच्या कालानंतरच्या वंशावळी भविष्यद्रूपानें कथन केल्या आहेत.

४५. वंश आणि वंशानुचरित हें पुराणाचें सर्वसामान्य लक्षण असल्यामुळें राजांच्या वंशावळी सर्व पुराणांत आल्या आहेतच. त्यांत भारतीयुद्धकालानंतरच्या राजांचे वंश भविष्यकाळाचा उपयोग करून 'पुढें होतील' अशा स्वरूपानें सांगण्याचा प्रघात हाही सर्व पुराणांस सामान्यच आहे. या भविष्यरूपानें सांगितलेल्या वंशावळी बहुतेक पुराणांत ख्रिस्ती शकाच्या पांचव्या, सहाव्या शतकापर्यंत आणून पोंचविलेल्या आढळतात. भागवतामध्यें कांहीं राजांच्या वंशावळी नवव्या शतकापर्यंत आणलेल्या आहेत असेंही कांहीं संशोधकांचें* म्हणणें आहे. या सर्व पुराणांत सांपडणाऱ्या वंशावळी इतिहासाच्या दृष्टीनें अगदीं व्यर्थ व कुचकामाच्या आहेत असें एक मत पाश्चात्य संशोधकांमध्यें जारीनें प्रचलित होतें व अजूनही आहे. पुराणें म्हणजे मतलबी ब्राह्मणांनीं स्वतःचें स्तोम माजविण्याकरितां लिहिलेलीं बाडें असा जो एक समज पाश्चात्य संशोधकांमध्यें व संस्कृतज्ञांमध्यें दृढमूल झालेला असतो त्याचेंच वरील मत हें एक पिल्लूं होतें असें समजण्यास प्रत्यवाय नाहीं. सर्व पुराणांविषयींची ही तुच्छता व वंशावळींसंबंधाचा हा अविश्वास अजूनही नाहींसा झाला आहे असें नाहीं; परंतु समग्र पुराणांचा नसला तरी निदान त्यांतील वंशावळींचा केवार घेण्याची बुद्धि पाश्चात्यांपैकीं कांहीं चिकित्सकांना होऊं लागली आहे ही अश्रुतपूर्वच गोष्ट समजली

* नवव्या दहाव्या शतकांतील कैलकिल यवनांचा वंश भागवतांत विस्तारानें वर्णन केला आहे असें दाखवून त्यावरून भागवताचा काल ठरविण्याचाही यत्न श्री. रा. चिंतामणराव वैद्य यांनीं केला आहे. भागवताच्या कालाची चर्चा करतांना वैद्यांच्या या मताचा उल्लेख व त्याची माहिती दिली आहेच. (पहा, मागें पृ. ८, ९.).

पाहिजे. एफ्. ई. पार्जिटर नांवाचे एक विद्वान् साहेब हिंदुस्थानच्या सनदी नोकरांच्या मालिकेंतले एक मणि होते. त्यांनीं पुराणांतील वंशावळींचा अभ्यास करून कांहीं पुस्तकें व लेख लिहिले आहेत.* हे साहेबही, 'ब्राह्मण लबाड, ब्राह्मण आपमतलबी, ब्राह्मणांनीं धर्माच्या नांवानें देश अज्ञानांत व दास्यांत ठेवला' वगैरे महातत्वांशीं बेइमान झालेले नाहींतच; उलट, 'ब्राह्मण हे मूळचे अनार्य होते, त्यांचा धर्म रानटी, जादूटोण्याचा होता; व वैदिक धर्म हा मूळचा क्षत्रिय आर्यांचा होता;' या स्वतः शोधून काढलेल्या नव्या सिद्धांतांची पुस्ती त्यांनीं जुन्या तत्वांना जोडली आहे! तथापि पुराणांतील वंशावळींवर त्यांचा विश्वास असून त्यांमध्यें खरा इतिहास ग्रथित झालेला आहे असें त्यांचें म्हणणें आहे. मूळ क्षत्रिय राजांनीं व त्यांच्या भाटांनीं रक्षण केलेल्या वंशावळी ब्राह्मणांनीं पुराणांत घेतांना विकृत केल्या आहेत असा त्यांचा ब्राह्मणांवर टपका आहेच! परंतु निदान क्षत्रियांस तरी ते विश्वसनीय मानतात व त्यांनीं स्वतःच्या केलेल्या वंशावळी खऱ्या आहेत असें त्यांना वाटलें ही तरी समाधानाचीच गोष्ट आहे! असो. वंशावळी खऱ्या आहेत कीं नाहींत हा आपल्यापुढें प्रश्न नाहीं. जशा आहेत तशा त्या सुंदर रीतीनें, स्पष्टपणें व निःसंदेहतेनें सांगितल्या आहेत ही

---

* या साहेबांचीं 'The Purana text of the dynasties of the Kali Age', व 'Ancient Indian Historical Tradition' अशीं दोन पुस्तकें प्रस्तुत लेखकाच्या अवलोकनांत आलीं आहेत. याखेरीज यांनीं पुराणांच्या वंशावळींवर Journal of the Royal Asiatic Society नामक विलायती त्रैमासिकांत बरेच फुटकळ लेख लिहिलेले आहेत. पण ते सर्व वरील दोन पुस्तकांमध्यें गतार्थ झाले आहेत. शिवाय साहेबमजकुरांनीं 'Ancient Indian genealogies—are they trustworthy?' या नांवाचा एक लेख भांडारकरांच्या ८० व्या जन्म दिनीं त्यांच्या स्मरणार्थ जो ग्रंथ प्रसिद्ध करण्यांत आला त्यांत लिहिला आहे. या लेखांत पार्जिटर साहेबांनीं आपले कांहीं महत्वाचे सिद्धान्त साररूपानें सांगितले आहेत. हा 'भांडारकर स्मारक-ग्रंथ' इकडे कोठेंही सुलभतेनें मिळण्याजोगा आहे. तथापि साहेबबहादुरांचीं विशेष मूल्यवान् मुक्ताफळें पहावयाचीं असल्यास त्यांनीं लिहिलेल्या उपरिनिर्दिष्ट दोन ग्रंथांकडेच वळलें पाहिजे.

बोध त्या सहज वाचून पहाणाराजही दिसून येईल. आपल्याला या वंशावळींच्या आयांपेक्षां निरनिराळ्या राजांच्या चरित्रांत ज्या मनोरम कथा सांगितल्या आहेत त्यांजकडेच विशेष लक्ष पुरवावयाचें आहे.

४६. पंतांनीं वंशावळींचा अर्थात् मुळाइतका विस्तार केला नाहीं. तथापि १ ते ८ स्कंधांतील पंतांच्या घाईचा व संक्षेपाच्या प्रमाणाचा विचार करतां पंतांनीं या स्कंधांत लेखणीला बरीच सैल सोडून तिला वावरण्याला बरीच मुभा दिली आहे असें दिसून येतें. स्कंध १ ते ८ पर्यंतची मूळ भागवताची श्लोकसंख्या ७३५४ आहे व पंतांच्या मंत्रभागवताची ११४४ आहे. अर्थात् पंतांनीं मुळाचा ६॥ पटींनीं संकोच केला आहे असें दिसून येतें. नवमस्कंधाचे हेच आंकडे घेतल्यास मूळ ९५४ व पंत ३७४ याप्रमाणें आहेत. म्हणजे येथे पंतांनीं मुळाचा फक्त २॥ पट संक्षेप केला आहे. यापुढील स्कंधांतही पंतांची विस्ताराची प्रवृत्ति अशीच दिसून येते. दशमस्कंधांतील संक्षेप ३॥ : १ याप्रमाणें आहे. एकादशांत तर २ : १ व द्वादशांत २॥ : १ याप्रमाणें पंतांच्या रचनेचें मूळ भागवताशीं प्रमाण पडतें. एकंदर ९ ते १२ स्कंधांची पद्यसंख्या पाहिल्यास मूळ ६८३२ व पंतकृति २४३१ अशी आहे. अर्थात् मुळाशीं पंतकृतीचें प्रमाण २।॥ : १ असें पडतें. हेंच प्रमाण पहिल्या आठ स्कंधांत ६॥ : १ आहे या तुलनेवरून नवव्या स्कंधापासून पंतांची विस्ताराची प्रवृत्ति कशी एकदम वाढली हें दिसून येतें. विस्ताराकडे प्रवृत्ति होण्यास भागवतांतील कथांची उत्तरोत्तर वाढत चाललेली मनोरमता हें कांहीं अंशीं कारण असावेंसें वाटतें.

४७. आणि कवीला विस्तार करावासा वाटेल अशा रमणीय कथा नवमे स्कंधांत पुष्कळच आल्या आहेत. आतां कांहीं ठिकाणचीं कथानकें व वर्णनें अलीकडच्या वाचकांना कदाचित् मर्यादेबाहेर गेलेलीं अशीं वाटतील; पण त्याला कांहीं इलाज नाहीं. सुद्युम्न किंवा इला, सोम व तारका, पुरूरवा व उर्वशी, ययाति व देवयानी, बृहस्पति व ममता, इत्यादि कामुक युगलांचे वृत्तान्त सध्यांच्या वाचकांना अश्लीलच वाटतील यांत संशय नाहीं. पण पुराणें वाचावयाचीं असतील तर पूर्वीच्या लोकांसारखें खंबीर व शुद्ध मनानें आपण वाचलें पाहिजे. शिवाय ज्या ग्रंथांत सोम व तारका यांचा वृत्तान्त सांगितला आहे त्यांतच सुकन्या, पृषध्र, नाभाग, अंबरीष, रंतिदेव, भगीरथ, रामचंद्र इत्यादि अनेक अलौकिक धीरोदात्त व पवित्र व्यक्तींचेंही गुणानुवर्णन केलें आहे हेंही

ध्यानांत ठेवलें पाहिजे. पंतांचीं वर्णनें वाचतांना तर मुळांतील अमर्याद वर्णनांचा पुसटसाहि अनुभव येणार नाहीं; कारण अशा ठिकाणीं मुळांतील स्पष्टोक्ति टाळून पंतांनीं अगदीं मर्यादित वर्णन केलेलें आढळतें.

४८. वंशावळींच्या भागांमध्यें पंतांनीं पुष्कळच गाळागाळ केली असून मुळांतील कथात्मक भागच बऱ्या विस्तारानें वर्णन केला आहे. कांहीं थोड्या ठिकाणीं मात्र त्यांनीं कथा सांगतांनाही हेतुपुरःसर अतिसंक्षेप केला आहे. अंबरीषकथेचा ती इतरत्र दोनदां वर्णिली असल्यानें व रामचरित्राचा ती इतरत्र अनेकदां वर्णिली असल्यानें पंतांनीं फार संक्षेप केला आहे. एकोणिसाव्या अध्यायांतील ययातीनें सांगितलेलें बोकडाचें रूपक व ययातीचा पश्चात्ताप जरा घृणा उत्पन्न करणारा अश्लीलशब्दयुक्त असल्यामुळें त्याचाही पंतांनीं अतिसंक्षेप केला आहे. असो; नवव्या स्कंधांतील कथांपैकीं रमणीय कथा पुढील होत.— १ इला-सुद्युम्न कथा; २ सुकन्या–च्यवन कथा; ३ नाभागाची लहानशी कथा; ४ अंबरीषाख्यान; ५ युवनाश्व, मांधाता व सौभरि यांची कथा; ६ हरिश्चंद्राख्यान ७ सगराचा अश्वमेध व गंगावतरण; ८ कल्माषपादाचें कथानक; ९ श्रीरामचरित्र १० निमि व विदेह यांचा वृत्तांत; ११ सोमतारका कथानक; १२ पुरूरवाउर्वशी कथानक; १३ सत्यवती व ऋचीक यांची कथा; १४ परशुरामचरित; १५ ययाति आख्यान; १६ दुष्यन्तशकुंतला आख्यान; व १७ रंतिदेवाची कथा.

४९. यांपैकीं ज्या ज्या कथांना पंतांनीं महत्त्व देऊन त्यांचें थोडें फार विस्तारानें वर्णन केलें आहे अशांचें थोडेसें निरीक्षण करूं. [ १ ] मनूची मुलगी इला, जी वसिष्ठकृपेनें मुलगा म्हणजे सुद्युम्न झाली व शिकारीच्या निमित्तानें शंकराच्या उपवनांत गेल्यावर जिला पुन्हां महिनाभर पुरुषत्व व महिनाभर स्त्रीत्व असें दुहेरी जीवन स्वीकारावें लागलें, तिची ही पहिलीच कथा पंतांनीं सुरेख रीतीनें सांगितली आहे. मुळापेक्षां बराच संक्षेप केला आहे. [ २ ] शर्याति राजाच्या स्वामिनिष्ठता सुकन्या नामक कन्येची दुसरी कथा होय. ही पंतांनीं १६ आर्यांत मुळापेक्षा थोड्या संक्षेपानें कथन केली आहे. लहान बालिका असतांना सुकन्येनें अज्ञानानें वारुळांत तपाचरण करणाऱ्या च्यवन ऋषींच्या डोळ्यांना कांटे टोंचले होते. तेव्हां—

देखे नृप, ती केला स्वसुतेनें च्यवन आंधळा कष्टी ।
तत्कुपित संतपे, न्यर्पी त्याच्या करीं सुताय ष्टी ॥ २१ ॥

९

याचा अर्थाधि तशी त्यांसि मुकल्या कदापि बोलीना।
करुनि प्रसन्न घे ती पतिची आज्ञा कदापि मोडीना ॥ १२ ॥

येथें ' वागर्थाविव सम्पृक्तौ ' या कालिदासाच्या अत्युत्कृष्ट श्लोकाची आठवण पंत करून देतात. [ ३ ] स्वतःच्या भावांनीं दायभाग न देऊन फसविलें असतां बापाच्या आज्ञेवरून अंगिरसऋषींच्या यज्ञांतल्या उरलेल्या वस्तु घेण्यास जाणारा व रुद्रानें त्यांतही अटकाव केला असतां प्रामाणिकपणें रुद्राचा हक्क कबूल करणारा सत्यवक्त्यांचा शिरोमणि नाभाग याची कथा तिसरी होय. ही पंतांनीं मुळाहूनच विस्तारानें सांगितली आहे. येथें पंतांनीं

यज्ञवास्तुगतं सर्वमुच्छिष्टमृषयः क्वचित्।
चक्रुर्हि भागं रुद्राय स देवः सर्वमर्हति ॥ भा. ९.४.८.

या मूळ श्लोकाचें भाषांतर

नभग पित्यासि पुसे, तो सांगे, ' यज्ञावशिष्ट हा भाग।
कोठें रुद्रासि असे, सर्वांही पात्र तो महाभाग ' ॥ ५६

असें केलें आहे. या ठिकाणीं मुळांतलि 'क्वचित्' याचा अर्थ केव्हां तरी, एके समयीं असा कालवाचक असून ' कोठें ' असें त्याचें केलेलें स्थलवाचक भाषांतर बरोबर झालेलें नाहीं. ' यज्ञशाळेंतल्या उरलेल्या वस्तु ऋषींनीं एके प्रसंगीं ( दक्षयज्ञांत ) रुद्राला ठरवून दिल्या होत्या तेव्हांपासून रुद्रच त्यांचा अधिकारी झाला आहे,' असा या श्लोकाचा आशय आहे तो पंतांच्या आर्येंत नीट आलेला नाहीं. मुळाचा अनुवाद करतांना अर्थाचा अंश असा चुकल्याचें पंतकृतींत कोठें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं. येथेंच हें लहानसें स्खलन कसें झालें कोण जाणे !

५०. [ ४ ] अंबरीषाख्यान भागवतामध्ये पंतांनीं १० च आर्यांत आटपलें आहे. कारण याच कथानकावर ' अंबरीषाख्यान ' नामक साकीबद्ध व ' भक्तभूषण ' नामक विविधश्लोकबद्ध अशीं दोन [illegible] पंतांनीं रचलीं आहेत. मूळ भागवतांतलि अंबरीषाचें कथानक अतिशय सुंदर आहे यांबद्दल वाद नाहीं. पण या दोन्ही पंतकृतींची खुमारी अशी कांहीं उतरली आहे कीं [illegible]-कारांनाही त्याबद्दल मान डोलवावी असेंच वाटलें असतें. पैकीं साकीबद्ध [illegible]-नाच्या अवघ्या ४० साक्या असून तें फारच कोमल, प्रेमळ व सरस झालें आहे. विशेषतः शेवटीं शेवटीं तर त्यांत करुणेचा रस उतरला आहे. ' भक्तभूषण ' काव्याचे मोठमोठ्या वृत्तांतले ११० श्लोक आहेत. हीं दोन्हीं काव्यें [illegible] [illegible]

डोळकाठिण्याच आश्रयासाठीं येणाऱ्या पक्ष्याची दुर्वासाला दिलेली अत्यंत समर्पक उपमा बरोबर रसिकाला डोलायला लावणारीच आहे यांत शंका नाहीं. पुढे दुर्वास अंबरीषाला शरण आल्यावर त्याला वांचविण्यासाठीं अंबरीष सुदर्शनचक्राची प्रार्थना करतो.—

' श्रुतिसाधूदित शक्य विहित म्यां केलें असेल कार्य ।
तरि त्या पुण्यें सुदर्शना त्वां रक्षावा हा आर्य ॥ १४ ॥
प्रणताभयदमुकुंदबहुमता, चक्रा ! द्विज रक्षावा ।
हे जरि करणें नसेल, आधीं अंबरीष भक्षावा ' ॥ १५ ॥

यानंतर 'भक्तभूषण' काव्य. या काव्याचें निरीक्षण जरा दुरूनच करणें जरूर आहे. कारण मधून मधून उतारे देतां येण्याजोगें याचें सौंदर्य नाहीं. तें सर्व काव्यभर जवळ जवळ सारखें भरलेलें आढळून येतें. शिवाय लांब लांब अशीं पुष्कळ भाषणें यांत आहेत तीं सबंध उतरणें तर अशक्यच. बरें मधलाच एकादा उतारा देऊं म्हटल्यास मागील पुढील संदर्भ नष्ट होऊन त्याचें स्वारस्य नाहींसें होतें. असो. मुळामधील ८४ श्लोकांचें आख्यान पंतांनीं ११० श्लोकांपर्यंत वाढविलें आहे. पण पंतांचीं वृत्तें बहुधा स्रग्धरा, शार्दूलविक्रीडित, शिखरिणी अशीं मोठीं असतात. तेव्हां विस्ताराच्या दृष्टीनें मुळाच्या निदान दुप्पट तरी हें आख्यान झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. मुळाबरहुकूम रूपांतर केलेलीं वर्णनें यांत नाहींत हें वर सांगितलेंच आहे. उदाहरणार्थ प्रारंभींचेंच, श्लोक ४–७ यांत आलेलें अंबरीषराजाचें वर्णन पहावें. हें अत्यंत सुंदर व या काव्यांतील उत्तमांपैकीं एक आहे. परंतु त्याला मुळाचा आधार कांहीं नाहीं. मुळांत अंबरीषाचें वर्णन आहे पण तें सर्व त्याच्या विष्णुभक्तीस अनुलक्षून आहे. पंतांचें वर्णन अवांतर शौर्यसंबंधानें व विशेषतः दानशूरत्वासंबंधानें आहे. दुसरी या काव्यासंबंधानें लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट म्हणजे अलंकारवैपुल्य ही होय. शब्दालंकारांनीं व अर्थालंकारांनीं हें काव्य अक्षरशः खचलेलें आहे. अर्थालंकार तर बहुतेक प्रत्येक श्लोकांत योजिले आहेत एक उदाहरण—

प्रथम अमूर्तीं कालिंदीच्या करी मातिमज्जन—
स्तुतपद मग ब्रह्मध्यानामृतीं अतिमज्जन ।
उठविल कसा शुभ स्वांकीं महा अहि, साधुनीं
शुचिपण दिले तीर्थां गंगादिकांसहि साधुनीं ॥ १५ ॥

पूर्वार्धामध्यें यमुनेंत स्नान करणें व महाध्यान करणें अशा दोन्ही प्रस्तुत क्रियांचा 'अतिमज्जन करी' या एकाच क्रियापदानें उल्लेख केला असल्यामुळें तुल्ययोगिता अलंकार झाला आहे. उत्तरार्धांत अप्रस्तुतप्रशंसा आहे. या श्लोकांत यमकांची देखील कौशल्यपूर्ण घडण केली आहेच. तरी शेवटीच शाब्दिक कसरतीचें आणखी एक लहानसें उदाहरण—

अमळा कमळाकेलिभवना भवनाशना ।

पावना, पाव, नाशीं या व्यसनास सनातना ॥ ५१ ॥

येथें यमक व अनुप्रास या दोन्ही शब्दालंकारांचा सुंदर विलास दृष्टीस पडत असूनही अर्थास काठिन्य आलेलें नाहीं हें लक्षांत ठेवण्याजोगें आहे. मूळांतील लहानशा कथेच्या मानानें हें आख्यान बरेंच विस्तारलेलें असल्या कारणानें थोडी-बहुत पुनरुक्ति, तीच ती कल्पना घोळून घोळून वर्णन करण्याची प्रवृत्ति, येथें बरीच दृष्टीस पडते. उ० साधूंचें सामर्थ्य व विरोधी दुष्टांचा नाश करण्याची त्यांची शक्ति एकसारखी ७२ ते ७५ या श्लोकांत पुनः पुनः निरनिराळ्या दृष्टान्तांनीं वर्णिली आहे. अशीं जरी कांहीं क्षुल्लक न्यूनें असलीं तरी एकंदरीनें हें आख्यान अत्यंत सुंदर झालें आहे यांत शंका नाहीं. आणि पंतांनीं आपल्या प्रतिभेला मुळांतील मजकुरानें जखडून न टाकतां स्वच्छंदपणें वावरूं दिल्यामुळेंच हा असा तऱ्हेचा उत्कृष्ट परिपाक त्यांना घडवितां आला आहे. प्रारंभींचें अंबरीष राजाचें वर्णन ( श्लोक ४–७ ), दुर्वासःक्रोधाचें वर्णन ( श्लो० १९–२५ ), श्रीविष्णूचें भाषण ( श्लो० ६०–७७ ) व शेवटची अंबरीषाची दुर्वासाचें रक्षण करविण्याविषयीं चक्रास प्रार्थना ( श्लो० ८३–९० ) हे भाग त्यांतल्या त्यांत विशेष सुंदर वठले आहेत.

५१. अंबरीषाच्या आख्यानास सोडून आतां आपण मंत्रभागवतांतील पुढच्या कथांकडे वळूं. [ ५ ] इक्ष्वाकुवंशांतील महापराक्रमी ककुत्स्थ राजाचा पुत्र युवनाश्व याला मांधाता नामक पुत्र झाला. पत्नीसाठीं मंतरलेलें पाणी स्वतःच प्याल्या-कारणानें युवनाश्वाला पत्नीपासून मुलगा न होतां बिचाऱ्याला स्वतःच गर्भधारणा करावी लागली व पुत्रजन्माचे वेळेस कुक्षिभेद करून घेऊन हाल सोसावे लागले! पंत या प्रसंगाचें विनोदानें वर्णन करतात.——

मोठें पोट नृपाचें जों जों तों तों प्रजेस भय मोटें ।

दक्षिण कुक्षि विदारुनि जन्मे शिशु सार्वभौम कन्हे थोटें ॥ ७९ ॥

पुढें इंद्रानें आपली अमृतस्राविणी अंगुलि चोखावयास देऊन वाढविलेला तो युवनाश्वसुत मांधाता व त्याच्या पन्नास कन्यांना वरणारा त्याचा एकच जांवई सौभरि ऋषि यांच्या मजेदार हकीकती पंतांनीं संक्षेपानेंच वर्णन केल्या आहेत. [ ६ ] मांधात्याच्या वंशांतील त्रिशंकूचा पुत्र हरिश्चंद्र याचें कथानक मात्र पंतांनीं मुळापेक्षांहि विस्तारानें वर्णिलें आहे. भागवतांतील ही हरिश्चंद्राची कथा, आपल्याला नेहमीं पुराणांत आढळते त्या करुणरसमय सत्वपरीक्षेच्या कथेहून अगदीं भिन्न आहे. आपल्याला मुलगा झालेला वरुणास अर्पण करण्याचें प्रथम कबूल करून पुत्र झाल्यानंतर हरिश्चंद्र टाळाटाळ करूं लागतो. तेव्हां वरुणाच्या अवकृपेनें त्याला उदररोग होतो. हें पाहून त्याचा मुलगा रोहित शुनःशेप नांवाच्या मुलाला आणून त्याचा वरुणप्रीत्यर्थ मेध (यज्ञ) करण्याचा विचार करतो. त्या शुनःशेपास विश्वामित्र व वरुणदेव हे पाशांतून सोडवितात. अशा स्वरूपाची ही कथा आहे. ही शुनःशेपाची कारुण्यपूर्ण कथा ऐतरेय ब्राह्मणांत आलेली आहे. वेदांमध्यें शुनःशेपाच्या वरुणप्रार्थनेचें एक सूक्त आहे व उदररोगापासून मुक्त करण्याबद्दलच्या प्रार्थनेचीं कांहीं सूक्तें आहेत. तीं याच संबंधाचीं असावीं असें म्हणतात. स्वप्नांत दिलेल्या वचनाच्या पूर्ततेबद्दल विश्वामित्रानें केलेल्या हरिश्चंद्राच्या छळाची कथा जरी भागवतांत नाहीं तरी तिचा निर्देश मात्र त्यांत केला आहे. ( भा. ९-७. २४. ) [ ७ ] सगराचा अश्वमेध, कपिलाच्या नेत्राग्नीनें सगरपुत्रांचें दहन, भगीरथाचे गंगेला आणण्याविषयींचे प्रयत्न व गंगेचें भूलोकीं अवतरण वगैरे सर्व कथाभाग मुळांत यापुढें ८ व ९ अध्यायांत आला असून पंतांनीं तो ३० आर्यांत सुंदर रीतीनें वर्णिला आहे. मूर्ख सगरपुत्र कपिलाचा अवमान करतात तें वानराची व पिंपळाच्या झाडाची उपमा देऊन पंत वर्णितात.—

> कळमत सगरसुत ते लंघिति मानूनि चोर कपिलातें ।
> न गमे अलंघ्य चळदळनग, दैवत जरिहि, कपिला तें ॥ १५ ॥

वानराचें उपमान घेऊन साधलेला प्रतिवस्तूपमालंकार येथें फार शोभादायक व समर्पक झाला आहे. [ ८ ] त्यानंतर वसिष्ठानें शापलेल्या कल्माषपादाचें लहानसें कथानक पंतांनीं ९ आर्यांत वर्णिलें आहे. [ ९ ] यापुढें सूर्यवंशांतील मधल्या पुष्कळ पिढ्या टाकल्यानंतर श्रीरामचरित्रापर्यंत आपण येऊन ठेपतों. रामचरित्र १० व ११ अध्यायांत फार प्रेमळ व हृदयंगम रीतीनें भागवतकारांनीं वर्णिलें असून पंतांनींहि आपल्या वर्णनांत बराच रस ओतला आहे. मात्र संक्षेप

पंतांनीं फारच म्हणजे १० श्लोकांच्या २४ आर्या इतका केला आहे. भागवत-कारांनीं एकंदर रामचरित्र संक्षेपानेंच सांगितलें आहे. तरी त्यांतल्या त्यांत रावण-वधापर्यंतचें पूर्वचरित्र त्यांनीं फारच संकुचित करून केवळ पहिल्या २१ श्लोकांत आटपून टाकलें आहे; व रावणवधानंतरच्या उत्तरचरिताचा, विशेषत: भरतभेट, राज्यारोहणोत्साह यांसारख्या प्रेमळ प्रसंगांचा जास्त विस्तार केला आहे ( श्लोक ९० ). पंतांनीं याच्या अगदीं उलट क्रम स्वीकारून पूर्वचरित्र विस्तारानें १७ आर्यांत वर्णिलें आहे व उत्तरचरित्रास ६ च आर्या दिल्या आहेत. असें करण्यांत पंतांनीं विशेष रसिकपणा दाखवला आहे असें म्हणतां येत नाहीं. मूळ भागवतांत सीतेच्या अग्निदिव्याचा उल्लेख नाहीं ही लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट आहे. पण पंतांनीं त्या अग्निदिव्याचा उल्लेख केला आहे (आर्या १५९). शिवाय वाल्मीकीचाही उल्लेख मुळांत नसतांना पंतांनीं उगीच केला आहे ( आ. १६४ ). सूक्ष्मपणें पाहिल्यास आणखी एक अवश्य ध्यानांत धरण्याजोगी गोष्ट दिसून येते. रामाच्या चरित्रांतील सीतात्यागाचा जो हृदयद्रावक व ज्याची युक्तायुक्तता अत्यंत संशयित आहे असा प्रसंग, त्याचें भागवतकारांनीं केलेलें वर्णन पहा.—

इति लोकाद्बहुमुखाद् दुराराध्यादसंविद: ।

पत्या भीतेन सा त्यक्ता प्राप्ता प्राचेतसाश्रमम् ॥ भा. ९. ११. १०.

" हजार तोंडें असलेल्या, दुराराध्य, यथार्थ ज्ञान करून न घेतां आरोप करणाऱ्या अशा लोकांना भ्यालेल्या पतीनें टाकलेली ' असा स्पष्ट अभिप्राय व्यक्त करून भागवतकारांनीं रामाच्या कृत्याविषयीं नापसंती दर्शविली आहे. पण पंतांनीं येथेही मुळास सोडलें असून सीतात्यागाबद्दल त्यांनीं रामाची तितक्याच स्पष्टतेनें पाठ थोपटली आहे.

सुज्ञांची मर्यादा किती सांगों ! भीं जनांहि परिटा कीं ।

धच लावी, राम म्हणे ' सौमित्रे, हे सतीच परि टाकीं ' ॥ १६२ ॥

रामचंद्राविषयीं लवमात्र अनादर दाखवावयाचा नाहीं म्हणून असो किंवा कोणत्याही कारणामुळें असो पंतांनीं येथे मुळांतील अभिप्रायाचा विपर्यास केला आहे असें म्हणणें भाग पडतें.

एकंदरींत सहृदयतेच्या दृष्टीनें, प्रेमळपणाच्या दृष्टीनें व काव्याच्या दृष्टीनेंही येथें मूळ भागवत पंतकृतीपेक्षां फार सरस ठरलें आहे.

[ १० ] पुढें गुरुशापानें मेलेल्या निमीची लोकांच्या नेत्रांमध्यें स्थापना व

त्यामुळें सर्वांच्या पापण्यांची उघडझांक; निमीच्या शरीराचें मंथन करून त्यांतून विदेह नामक पुत्राचें उत्पादन; वगैरे कथा पंतांनीं १० आर्यांत सांगितली आहे. [ ११ ] येथें सूर्यवंशाचा वृत्तान्त संपून सोमवंशास प्रारंभ होतो. सूर्यवंशाचे जे राजे वर सांगितले ते सर्व पराक्रमी, शुद्धाचरणी, अनेक धीरोदात्त सद्गुणांनीं युक्त असे वर्णिले आहेत. पण सोमवंशास सुरवात होतांच व्यभिचार, परदारहरण, कपट वगैरे दुर्गुणांनीं भरलेल्या राजांच्या चरित्रास प्रारंभ होतो. पहिलें सोमाचेंच कथानक नीतिदृष्ट्या किती गर्ह्य गोष्टींनीं भरलेलें आहे ! चंद्रवंशाचा मूळ पुरुष जो बुध तोच सोम व बृहस्पतीची बायको तारा यांपासून व्यभिचारानें जन्मला ! असो. या हकीकतींच्या जास्त अंतरंगांत शिरून कोमल प्रकृतीच्या वाचकांस न दुखविणेंच बरें. [ १२ ] यापुढील पुरूरवा-उर्वशीची कथा तरी याच मासल्याची आहे. पुरूरवा हा, बुध व मनूची कन्या इला यांचा पुत्र. त्याची हकीकतही पंतांनीं मुळापेक्षा संक्षेपानें पण एकंदरींत चांगल्या रीतीनें सांगितली आहे. कालिदासाच्या विक्रमोर्वशीय नाटकावरून याची कथा सर्वांच्या परिचयाची असतेच. ही कथा अत्यंत प्राचीनांपैकीं असून ऋग्वेदांतही तिचा उल्लेख आहे. [ १३ ] पुरूरव्याचा ज्येष्ठ पुत्र आयु. त्या आयूच्या वंशांतील कन्या सत्यवती ही ऋचीक नामक ऋषीस दिलेली असून तिच्यापासून जमदग्नि उत्पन्न झाले. सत्यवतीची आई म्हणजे क्षत्रिय स्त्री; तिच्याकरितां मंत्रांनीं सिद्ध केलेला चरु सत्यवतीनें खाल्ला त्याचा परिणाम, तिचा साक्षात् पुत्र नव्हे, पण नातू (परशुराम) अत्यंत उग्र, क्षत्रियांपेक्षांही जबरदस्त योद्धा होण्यांत झाला [ १४ ] यानंतर परशुरामचरितच गायिलें आहे. पंतांनीं तें बरेंच विस्तारानें म्हणजे ३४ आर्यांत वर्णिलें असून तें फार सुंदर साधलें आहे. पित्याच्या वधानें क्रुद्ध झालेल्या सहस्रार्जुनाच्या मुलांनीं जमदग्नीचा वध केला तेव्हां जमदग्नीचा वित्तनिष्ठ सुत परशुराम,

यमसा खवळे, शत्रुसह बंधूंच्या कहानियां अधीन रडीं ।
उखळे म्हणे ' अरींचीं कापीन अशींच मीं कधीं नरडीं ' ॥ १४२ ॥

पूर्वार्धांतील रसोत्कर्षकारक सहोक्ति अलंकार, भाषेचा आवेश व वीररसानुकूल शब्दयोजना यांच्या योगानें ही आर्या चित्तवेधक झाली आहे. नंतर तो खवळलेला जामदग्न्य

मोटा प्रळयाचि करि धरिमूर्धीच्या अंतिरांवळ ठीका ।

अघुतहि माळनि परिभवपंकांतुनि कीर्ति मात काढी ज ! ॥ २५४ ॥

येथेंही कीर्तीवर माईचें रूपक पंतांनीं फार सहृदयतेनें योजलें आहे.

[ १५ ] यापुढील ययातीचें आख्यानही पंतांनीं फार सुंदर रीतीनें मराठींत उतरलें आहे. भारतांतील ययाति आख्यानापेक्षां हें कांहीं बाबतींत निराळें आहे. स्त्रियांच्या व मुलींच्या स्वभावरेखनाच्या बाबतींत पंत फार कुशलता दाखवितात. देवयानी व शर्मिष्ठा या दोघी जलक्रीडार्थ गेल्या होत्या. महादेवास समोरून येतांना पाहून त्या लाजल्या व ' वस्त्र गुरुसुतेचें तें राजसुता नेसली गडबडून. ' तेव्हां बायकांच्या स्वभावास अनुसरून त्या ' दोघी पितृभाग्यमदें स्नेह बुडविती वृथा बडबडून २५८. ' नवऱ्याच्या किंवा बापाच्या भाग्यामुळें ताठून जाऊन स्त्रिया असें करतात हें कोणास माहीत नाहीं ? या दोघींचें हें भांडण पंतांनीं एकाच आर्येंत मार्मिकपणें आणलें आहे.

ते कविजा तीस म्हणे, ' सिंहीतें कांपिती शिवा दासी ' ।

राजसुताहि म्हणे, ' कां करिसी तूं भिक्षुकी विवादासी ' ॥ २५९ ॥

या दोघींच्या भांडणाच्या मुळांतील लांबलचक वर्णनाच्या मानानें पंतांनीं दोनच आर्यांत रेखाटलेलें हें शब्दचित्र कितीतरी सुंदर आहे ! [ १६ ] दुष्यंत-शकुंतलाख्यानही पंतांनीं रेखीवपणें १० आर्यांत आणलें आहे. त्यांचा पुत्र भरत याची हकीगत मात्र मुळांत जरा विस्तृत आहे तो पंतांनीं अगदीं संकुचित केली आहे [ १७ ] रंतिदेवाची गोष्ट अति करुण व सुंदर असून पंतांनीं ती फक्त पांचच आर्यांत आटपून टाकली आहे तेव्हां आपणासही तिचा येथें उगीच विस्तार करण्याचें कारण नाहीं.

५२. रंतिदेवाच्या हकीकतीनंतर मुळांत व पंतकृतींतही निरनिराळ्या राज-वंशांच्या लांबलचक वंशावळ्या असून त्यांत ऋष्यशृंग, ज्यामघ वगैरे कांहीं राजांच्या तोटक कथा आहेत. शेवटीं कौरववंशांतील शंतनु आदिकरून अलीकडच्या राजांपर्यंत वर्णन येऊन ठेपलें असून अखेरीस कौरव, पांडव, यादव यांच्यांतील दुर्योधन धर्म, भीम, अर्जुन. वसुदेव, उग्रसेन, व सरतेशेवटीं श्रीकृष्ण येथपर्यंत नामावळी येऊन पोंचली आहे. मुळांत कित्येक पुढच्या पिढ्यांचेंही आर्ष भविष्यरूपानें कथन करण्यात आलें आहे. शेवटीं श्रीकृष्णाच्या मंगल चरित्राचा

कर्माण्यपरिमेयाणि मनसापि सुरेश्वरैः । सहसंकर्षणश्चक्रे भगवान्मधुसूदनः ॥

[illegible] भणिष्यमाणानां दुःखशोकतमोनुदम् । अनुग्रहाय लोकानां सुपुण्यं व्यतनोद्यशः ॥
स्निग्धस्मितेक्षितोदारैर्वाक्यैर्विक्रमलीलया । नृलोकं रमयामास मूर्त्या सर्वाङ्गरम्यया ॥

भा.९.२४.६०, ६१, ६४.

असा पुढील स्कंधांतील विषयाची सूचना देणारा त्रोटक उल्लेख करून शुकाचार्यांची वाणी विराम पावली आहे. पंतांच्या लेखणीनेंही

वाराया भूमीचा भर, शरणागत अशेष ताराया ।
माराया दैत्यांतें, अवतरला श्रीनिवास या राया ॥ ३७४ ॥

अशा रीतीनें श्रीकृष्णचरित्राचा उच्चार करून या स्कंधापुरता विसावा घेतला आहे.

---

## [ दशमस्कंध पूर्वार्ध ]

५३. दशमस्कंध म्हणजे श्रीमद्भागवताचा गाभाच होय. जसा मूळ भागवताचा त्याचप्रमाणें मंत्रभागवताचाही तो गाभाच झाला आहे. कृष्णविजय हा तर दशमावरचा पंतांचा स्वतंत्रच ग्रंथ आहे. कृष्णविजयाच्या रचनेकडे लक्ष दिलें असतां एकमेकांशीं विसदृश असे रचनेचे अनेक विभाग त्यांत आपल्याला दिसून येतात, हें आपण मागें पाहिलेंच आहे. या निरनिराळ्या विभागांची काव्यविषयक योग्यताही सारखी नाहीं हें अल्प अवलोकनानें सहज दिसून येणारें आहे. स्थूल-मानानें पाहिलें तर या ग्रंथाचा पूर्वार्ध बोजड, क्लिष्ट व नीरस असा झाला आहे; व उत्तरार्ध अतिशय सुंदर, सोपा व रसाळ असा उतरला आहे. कृष्णविजयाचा पूर्वार्ध अशा रीतीनें रसिक वाचकांच्या दृष्टींत तात्काळ न भरण्यासारखा झाला आहे ही गोष्ट मंत्रभागवताच्या रचनेच्या वेळीं पंतांच्या चांगली लक्षांत असली पाहिजे. कारण मंत्रभागवताचा दशमस्कंध हा कृष्णविजयांतील न्यूनतेचा उत्कृष्ट रीतीनें पूरक होईल अशाच तऱ्हेनें लिहिलेला दिसतो. कृष्णविजयाचा उत्तरार्ध, तर मंत्रभागवत दशमाचा पूर्वार्ध अतिशय सुंदर व रसाळ उतरला आहे पंतांनीं बुध्द्याहोऊन असें केलें असो वा नसो, कृष्णविजयपूर्वार्धाच्या नीरसतेमुळें व क्लिष्टते-मुळें झालेलें व्यंग सव्याज भरून निघावें अशीच मंत्रभागवतांतील दशमपूर्वा-र्धाची रचना झालेली आहे यांत संशय नाहीं. समग्र दशमाची उत्कृष्ट गोडी घ्याव-याची असेल तर मंत्रभागवतांतील पूर्वार्ध व कृष्णविजयाचा उत्तरार्ध असा जोड-ग्रंथ कोणी वाचावा म्हणजे पंतांच्या काव्यकौशल्याची पूर्ण प्रतीति देईल. कृष्ण-

विजयाच्या पूर्वार्धांत पंतांनीं कोठेंबहुतं संक्षेपाचेंच धोरण ठेवलें आहे तर उत्तरा-र्धांत त्यांनीं अगदीं मनसोक्त विस्तार केला आहे. याच्या उलट मंत्रभागवतामध्यें पूर्वार्ध जास्त विस्तारानें वर्णिलेला असून उत्तरार्ध त्या मानानें बरा जास्त संक्षिप्त केला आहे.

४७. पंतांनीं मूळ कथानकाचा केलेला संक्षेप किंवा विस्तार हा केवळ मनास आलेल तसा केलेला नसून स्वतःच्या भूमिकेस व विशिष्ट धोरणास अनुसरून केला आहे हें आपण मागील विभागांत पाहिलेंच आहे. आतां दशमस्कंधापुरतेच संक्षेप-विस्तार करण्याचे त्यांचे विशिष्ट नियम काय दिसून येतात हें पाहूं. हे विशिष्ट नियम अर्थात् मागील सामान्य नियमांवरूनच निघालेले, किंबहुना त्यांचींच निराळीं स्वरूपें आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं.

(१) मंत्रभागवतांत, व कृष्णविजयांतही, खुद्द बलरामकृष्णांशीं संबंध असलेल्या मुख्य कथेचा तेवढा पंतांनीं आदर केला आहे. कृष्णचरित्राशीं तादृश संबंध नस-लेल्या ज्या लहान लहान कथा मधूनमधून कारणेंत येतात त्यांचा बहुधा अतिसंक्षेप केला आहे. उ०, कृष्णानें उलथून पाडलेल्या यमलार्जुनांची पूर्वजन्मींची कथा मुळांत विस्तृत असून पंतांनीं अतिसंक्षिप्त केली आहे ( अ० १० ); त्याचप्रमाणें द्रोण व धरा या वसूंची ( पूर्वजन्मींचे वसुदेवदेवकी ) कथा ( अ० ८ ).

( २ ) कृष्णचरित्राच्या कथेमध्यें सुद्धां जेथें जेथें अध्यात्माचा किंवा वेदा-न्ताचा संबंध आला आहे तेथें पंतांनीं बहुधा आटपतें घेतलें आहे उ०, ब्रह्मस्तुति ( अ० १४ ); अ० ६० मधील रुक्मिणीच्या भाषणांतलि वेदान्तमय भाग; वेदस्तुति ( अ० ८७ ); वगैरे. हीं सर्व अध्यात्मपर प्रकरणें पंतांनीं गाळलीं आहेत किंवा त्यांचा अगदीं संकोच केला आहे. केव्हां केव्हां अध्यात्मपर ईशवर्णनामधील अध्यात्मविषयक भाग काढून टाकून त्याच्या जागीं साध्या, भाविकांस प्रिय अशा भगवद्यशोवर्णनाची योजना केली आहे; उ०, अ० ८६ मधील वसुदेवकृत कृष्णस्तुति, इ०. एकंदरीनें दशमामध्यें वेदान्तप्रचुर असा भाग फार नाहीं त्यामुळें अशा तऱ्हेच्या गाळागाळीचा प्रकार पंतांस फार करावा लागलेला नाहीं.

( ३ ) भागवतामध्यें निरनिराळ्या देवांनीं, भक्तांनीं अथवा साधकांनीं केलेलीं ईश्वराचीं स्तोत्रें फार येतात. हीं स्तोत्रें बहुधा गाळण्याची पंतांची प्रवृत्ति असते असें आपण पूर्वी अनेकदां पाहिलेंच आहे. ब्रह्मस्तुति (अ० १४), कालियसर्पकृत व कालियस्त्रीकृत कृष्णस्तुति ( अ० १६ ), अक्रूरस्तुति ( अ० ४० ); हीं

अतिशय संक्षेप केलेल्या किंवा गाळलेल्या स्तुतींची दंडकांतली उदाहरणे होत.

( ४ ) नानातऱ्हेची सुंदर सृष्टिशोभेची वर्णने, स्वात्मप्रभावाने नगरें, अंतःपुरें, राजसभा वगैरेंची वर्णनें भागवतांत कोठें कोठें येतात. हींही बहुधा पंतांनीं गाळलीं आहेत किंवा अतिसंक्षिप्त केलीं आहेत. अशा तऱ्हेचीं वर्णनें काव्यास बरोबर अनुकूल होत व तीं पंतांनीं टाकलीं नसतीं तर बरें झालें असतें असेंही वाटतें. तथापि भगवद्यशोगानाचा प्रमुख हेतु त्यांत साधत नाहीं यामुळें पंतांनीं त्यांकडे दुर्लक्ष केलें असावें. द०, अ० २० व २१ मधील अत्यंत सुंदर शरद्वर्णन व कृष्णक्रीडांनीं पुनीत झालेल्या स्थलांचें वर्णन पंतांनीं कृष्णविजयांत व मंत्रभागवतांत जवळ जवळ गाळलेंच आहे. हे २० व २१ अध्याय मुळांत इतके सुंदर आहेत कीं, काव्यस्फूर्तीचा लवलेशही नसलेल्या माणसाला ते लोभवून टाकतील व आपण स्वतः त्याचा आशय कांहीं तरी स्वभाषेंत उतरावा अशी प्रेरणा उत्पन्न करतील. परंतु पंतांचें तिकडे विशेष लक्ष गेलेलें दिसत नाहीं. त्यांच्या एकंदर काव्यसमूहाचें अवलोकन करून पाहिलें असतां नैसर्गिक सृष्टिशोभेनें किंवा मानवनिर्मित नगरादि स्थलांच्या शोभेनें त्यांचें चित्त आकृष्ट करून घेतलें होतें असें दिसत नाहीं. सृष्टिवर्णनाची बहार करून सोडणारा आपल्यांतील मुक्तेश्वर हाच कवि होय.

५९ या चार बाबी पंतांच्या संक्षेपाच्या धोरणासंबंधीं झाल्या. पण पंतांनीं सर्वत्र एकजात संक्षेपच केला आहे असें दिसून येत नाहीं. विशेषतः कृष्णविजयांत त्यांनीं पुष्कळ ठिकाणीं विस्तारही केला आहे. मंत्रभागवतांत व कृष्णविजयांत, मुळांत नसलेल्या कांहीं गोष्टी त्यांनीं ठिकठिकाणीं आपल्या काव्यांत समाविष्ट करून देण्यास मागें पुढें पाहिलेलें नाहीं.

( १ ) अशांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे पंतांनीं आपल्या काव्यास लेवविलेली स्वतःची वाग्भूषा होय. ही वाग्भूषा बहुधा अलंकारात्मक आहे. मूळ भागवतकाराचें काव्य बहुधा अगदीं साधें, क्वचित् एखाद्या सुंदर दृष्टान्तानें युक्त असें असतें. नानातऱ्हेच्या कल्पनांची गर्दी व अलंकारांचें वैपुल्य ज्यांत आहे असे भागवताचे अध्याय फारच थोडे सांपडतील. पण पंतरचनेची स्थिति याच्याहून अगदीं उलट आहे. मुळांमधील कल्पना, मधून मधून कोठेंतरी दृष्टीस पडणारा उपमादृष्टान्तादि अलंकार तर पंतांनीं आपल्या काव्यांत उतरून घेतला आहेच पण त्याशिवाय स्वतः निर्माण केलेल्या अशा शेंकडों सुंदर अलंकारांची पूजा त्यांनीं आपल्या

अधीत पद्धतीशीच बांधली आहे. अर्थात् मुळांत नसलेल्या अशा कित्येक सुंदर कल्पना, उपमादि अलंकार पंतांच्या काव्यांत दिसून येतात यांत नवल नाहीं. पुष्कळ वेळां पंतांच्या आर्यांचे प्रथमार्ध कथेतील असून दुसऱ्या अर्धांत पंतांनीं कांहीं तरी सुंदर कल्पना, एखादा बहारदार दृष्टान्त अगर आणखी एखादा अलंकार यांची योजना केलेली असते. रसिकवर्य हंस यांच्या ही गोष्ट लक्षांत आलेली असून ती त्यांनीं नमूद केलेली आहे.

(२) मुळांत वाढावा करण्याचा दुसरा प्रकार म्हणजे टीकेस अनुसरून मुळांतील विषयास पुष्टिकारक असा मजकूर नवीन घालणें हा होय. पंतांनीं भागवत लिहितांना श्रीधरी टीका स्वतःपुढें ठेविली होती. टीकेंतील मजकूर आपल्या काव्यांत आणलेला आहे अशीं ठिकाणें दशमापेक्षां एकादश स्कंधांतच आपल्यास विशेष आढळून येतील. अशा तऱ्हेचें एक उदाहरण सहाव्या स्कंधांत आपण पाहिलेंच आहे.

(३) याशिवाय फक्त कृष्णविजयापुरतेंच पाहिल्यास मुळांतील धोरण न बदलतां कथानकाचा देखील त्यांनीं काव्यसौंदर्यास अनुकूल अशा अनेक ठिकाणीं विस्तार केलेला आढळतो. बहुधा सर्व उत्तरार्ध व पूर्वार्धांतील उद्धवगोपींच्या भेटीचा प्रसंग ( अ० ४६, ४७, ४८, ) पाहिल्यास मुळांतीलच कथानक त्यांनीं एकसारखें वाढवून कसें लिहिलें आहे तें लक्षांत येईल व संक्षेपाप्रमाणेंच विस्तारही पंतांस सुंदररीतीनें कसा करितां येतो याची खात्री पटेल. सुपारीयेवढ्या कापसाच्या बोंडाचा पिंजून पेरूयेवढाही विस्तार करतां येतो; तशाच तऱ्हेची कृति पंतांनीं केली आहे. किंवा अधिक समर्पक दृष्टांत द्यावयाचा म्हटला तर अगदीं लहानशा रव्याच्या चकतीचा विस्तार करून त्यांत काव्य कल्पनांचें गोड सारण घालून त्याची चांगली फुगीर करंजी पंतांनीं पुष्कळ वेळां बनविली आहे असेंही म्हणतां येईल. असो. या विस्ताराचें विशेष विवेचन पुढें आम्हीं केलें आहे. ( पहा.-परिच्छेद ६९, ७०, ७१. )

५६. पंतांच्या संक्षेपविस्ताराबद्दलच्या धोरणाचा इतका विस्तार केला तरी सरतेशेवटीं ' निरंकुशाः कवयः ' या महासूत्राचा उच्चार करून न्यूनसंपूर्णता करावी लागतेच. कांहीं ठिकाणीं त्यांनीं विस्तार कां केला व तशाच तऱ्हेच्या दुसऱ्या कित्येक ठिकाणीं त्यांनीं संक्षेप कां केला यांचीं कारणें पुष्कळ वेळां समर्पक रीतीनें देतां येत नाहींत. मूळभागवतांत पूतनावध, कालियदमन किंवा गोवर्धनोद्धार हें

प्रसंग विस्तारानें वर्णिले असून यमलार्जुनोद्धार, अग्निप्राशन, किंवा नंदाची वरुण-पाशापासून मुक्तता हे प्रसंग अगदीं संक्षेपानें वर्णिले आहेत. याला कारण बहुधा कवीची लहरच होय. कदाचित् पूतनावधाचे वगैरे प्रसंग यमलार्जुनोद्धार इत्यादि प्रसंगापेक्षां जास्त महत्त्वाचे व काव्यसौंदर्यास जास्त अनुकूल आहेत असें म्हणून समाधान करून घेतां येईल. परंतु कृष्णविजयांत रासक्रीडेसारख्या रमणीय प्रसंगाचें वर्णन तितकें विस्तारानें न करितां उद्धवगोपींच्या भेटीचा त्या मानानें कमी महत्त्वाचा प्रसंग ( अ. ४७ ) कंटाळवाणा होईल इतका लांबविण्यांत पंतांचा काय हेतु होता हें सामान्य तर्कानें मुळींच कळण्यासारखें नाहीं. केवळ कवीची लहर असें म्हणून अशा ठिकाणीं स्वस्थ बसणें भाग येतें. दुसरी उपपत्ति तेथें काय बसवणार ?

संक्षेपविस्ताराच्या बाबतींत पंतांच्या धोरणाचा सामग्र्यानें विचार केला. आतां त्यांच्या दशमपूर्वार्धावरील काव्यांचें एकैकशः निरीक्षण करूं.

५७. प्रथम कृष्णविजयाकडे वळूं. कृष्णविजयाच्या पूर्वार्धाकडे पाहिलें म्हणजे त्यांतील प्रथमच लक्षांत येणारी गोष्ट त्यांत योजलेलें अपूर्व वृत्त ही होय. हें वृत्त ‘ आर्यागीति ’ नामक असून पंतांच्या कृष्णविजय, प्रल्हादविजय व आर्यागीतिमुक्तामाला या काव्यांशिवाय मराठींत दुसरीकडे कोठेंही आढळून येत नाहीं. पंतांनीं आपल्या काव्यांत सर्वत्र वापरून मराठी वाचकांना अगदीं परिचित करून सोडलेल्या गीतिवृत्ताचीही गोष्ट जवळ जवळ अशीच आहे. पंतांनीं गीतिवृत्ताची योजना करून तिला मराठींत रूढ करून टाकीपर्यंत गीतिवृत्तांत बहुधा कोणीही काव्यरचना करीत नसत. फार काय पण खुद्द संस्कृतांतही गीति व आर्यागीति या वृत्तांचा प्रचार असल्याचें दिसून येत नाहीं. संस्कृतामध्यें चिरूढ असलेलें मात्रागणवृत्त म्हणजे छन्दःशास्त्रांत ‘ आर्या ’ हें नांव खरोखर ज्याला दिलेलें आहे तें वृत्त होय. या वृत्ताच्या चवथ्या चरणांत १८ मात्रांच्या ऐवजीं १५ मात्रा असतात; म्हणजे चौथा चरण सामान्य मोरोपंती आर्येपेक्षां ( म्हणजे छन्दःशास्त्रोक्त गीतिपेक्षां ) तीन मात्रांनीं आखूड असतो. हीच छन्दःशास्त्रोक्त आर्या संस्कृतांतील सर्व कवींनीं उपयोगांत आणली आहे. कालिदासाच्या शाकुन्तल व विक्रमोर्वशीय या नाटकांत वारंवार येणारी आर्या ती हीच व गोवर्धनानें आपली ‘आर्यासप्तशती’ ज्या वृत्तांत रचली आहे तें आर्यावृत्तही हेंच होय. शंकराचार्यांनीं आपलें सुप्रसिद्ध षट्पदीस्तोत्रही याच वृत्तांत रचलेलें आहे. पिंगलमुनिप्रणित

छंदःशास्त्रांत मात्रावृत्तें पांच प्रकारचीं सांगितलीं आहेत. त्यांचीं नांवें व अंतर्गत रचना खालीं लिहिलीं आहेत त्यावरून त्यांच्या स्वरूपाचा नीट बोध होईल.

१. आर्या—प्रथमार्ध, मात्रा ३० (१२,१८); द्वितीयार्ध मात्रा २७ (१२,१५).

उदाहरण--(१) आर्येच्या प्रथमपदीं । द्वादशमात्रा, तशाच तिसऱ्याही ॥
अष्टादश दुसऱ्याला । आणिक चवथ्यास पंचदश ॥

परशुरामपंत गोडबोले.

(२) ऐसें वदोन वंदिति । ते सारे रामपादपद्मातें ।
भक्तमयूरेश्वरकांति- । चित्ताच्या केलिसद्मातें ॥

मोरोपंत, कुशलवाख्यान २,५०.

२. गीति—प्रथमार्ध, मात्रा ३० (१२,१८); द्वितीयार्ध, मात्रा ३० (१२,१८).

उदाहरण—आर्यकथाछंदानें । आर्याछंदेंचि जन्मलीं सरलें ।
यांहीं माझें तनुवाक्- । कर्ममनःपाप सर्वथा सरलें ॥

मोरोपंत; मंत्ररामायण उपोद्घात १६

३. उपगीति—प्रथमार्ध, मात्रा २७ (१२.२५); उत्तरार्ध, मात्रा २७ (१२,१५).

उदा०—पृथ्वीवरि चापातें । स्वभिरातें वा तऱ्ही क्षमा ।
तुम्ही द्रुत सोडावा । निजजीवितकाम तो लव वा ॥

मोरोपंत; कुशलवाख्यान ८, २८.

४. उद्गीति—प्रथमार्ध, मात्रा २७ (१२,१५); द्वितीयार्ध, मात्रा ३० (१२,१८).

उदा०— जैमिनिकृतभारतगत । हयमेधीं कुशलवाख्यानीं ।
हा पहिला अध्याय । श्रवण करावा रसज्ञमुख्यांनीं ॥

मोरोपंत; कुशलवाख्यान १, १०.

५. आर्यागीति—प्रथमार्ध, मात्रा ३२ (१२,२०); द्वितीयार्ध, मात्रा ३२ (१२,२०).

उदा०—तत्सेनाला भरतें । आणखिकें पांच दूत तेव्हां भरतें ।
बोले हतभू नर तें । ऐसें येतें कृपांबुनिधिला भरतें ।

मोरोपंत; कुशलवाख्यान १२, ६.

या पांच वृत्तांपैकीं गीर्वाण साहित्यांत विशेष प्रचारांत असलेलें वृत्त, पहिलें आर्या हें होय हें वर सांगितलेंच आहे. पण पंतांना हें खरेंखुरें आर्यावृत्त कांहीं नव्हतें असें दिसतें. त्यांनीं वर निर्दिष्ट केलेल्या पांचही मात्रावृत्तांत पद्यें रचलीं आहेत हें वर उदाहरणादाखल दिलेल्या कवितांवरूनच स्पष्ट होत आहे; व त्यावरून त्यांचें

छंदःशास्त्राचें अध्ययन किती सूक्ष्म होतें हेंही दिसून येत आहे. तथापि त्यांनीं विस्तृत रचना करण्याकरितां या पांचांपैकीं गीति व आर्यागीति हीं दोन वृत्तें प्रारंभीं पसंत केलीं व त्यांतूनही पुढें आर्यागीतीचा त्याग करून गीति हेंच वृत्त शेवटपर्यंत कायम ठेवलें यांत लक्षांत ठेवण्याजोगी गोष्ट येवढीच कीं पंतांनीं जणूं काय गीति व आर्यागीति या नांवांची आपल्याला ओळखच नाहीं अशा रीतीनें या दोन्ही वृत्तांना 'आर्या' या एकाच नांवानें संबोधण्याचा सर्वत्र क्रम ठेवला आहे. छंदःशास्त्रोक्त 'गीती'ला ते सर्वत्र आर्या म्हणतात हें सुप्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें 'आर्यागीती'चाही त्यांनीं आर्या याच नांवानें कृष्णविजयात उल्लेख केला आहे.

वृत्तीं आर्धी आर्या । आव्या सेव्याचे फार आधी आर्या ।
युक्ता यमकार्नीं । प्यावी रसिकीं करूनी उद्यम कार्नीं ॥ कृ. वि. १,५.

तथापि पंतांनीं या दोन्ही मात्रावृत्तांचा 'आर्या' या सामान्य संज्ञेनें जो निर्देश केला आहे त्याला कांहींच आधार नाहीं असें मात्र नाहीं. मात्रावृत्तांमध्यें आर्या (३० व २७ मात्रांची) हीच मुख्य असल्यामुळें 'प्राधान्येन व्यपदेशा भवन्ति' या न्यायानें सर्व मात्रावृत्तांनाच केव्हां केव्हां संस्कृतांतही 'आर्या' या सामान्य नांवानें संबोधण्यांत येतें. आर्या ही जाति व गीत्यादिक तिचे प्रकार असेंच मानण्याचा छंदःशास्त्राचा सर्वत्र प्रघात आहे. छंदोमंजरीकारानें आर्या हीच मुख्य धरून बाकीचे गीत्युपगीत्यादि तिचेच प्रकार आहेत असें स्पष्टच सांगितलें आहे. तेव्हां संस्कृतांतही सर्व मात्राछंदांना आर्या असें म्हणण्याचा प्रघात असल्यामुळें पंतांनींही तेंच सुंदर नांव आपलेंसें करून घेऊन आपण उपयोगांत आणलेल्या मात्राछंदांना लावून दिलें असें दिसतें.

आर्येकथाछंदानें आर्याछंदोचि जन्मलीं सरलें ।

या कवितेंत आर्याछंदाचा अनेकवचनीं प्रयोग केला आहे यावरूनही आर्या हें नांव त्यांनीं कोणत्याही एकाच पोटभेदास उद्देशून वापरलें नसून सर्व मात्रावृत्तांस उद्देशूनच वापरलें आहे असें स्पष्ट दिसतें. मात्र संस्कृतामध्यें खरोखरीची छंदःशास्त्रोक्त आर्या हीच सर्वत्र प्रचलित असल्यामुळें 'आर्या' या सामान्य संज्ञेनें चूकभूल होण्याचा संभव रहात नाहीं. मराठींत पंतांनीं सर्वसामान्य संज्ञा म्हणून 'आर्या' हें नांव प्रचारांत आणलें, परंतु छंद मात्र 'गीति' हा प्रचारांत आणून तो सर्वत्र रूढ केला. त्यामुळें गीतीचेंच खरोखरें नाव आर्या असी मराठी

वाचकांची समजूत झाली व 'गीति' हें मूळ नांव सामान्य मराठी वाचकांस कधीं माहीतच झालें नाहीं. अशा रीतीनें संस्कृतांत जी गीति तीच पंतांच्या कृपावंतीनें मराठींत 'आर्या' होऊन बसली.

७८. पंतांच्या पूर्वी अक्षरगणवृत्तें म्हणजे विविध श्लोक हे फार प्रचारांत होते. त्यांचा त्यांनीं अव्हेर केला नाहींच. पण आपल्या स्वतःचें विशिष्ट असें एकादें मात्रागणवृत्त आपल्या काव्यरचनेसाठीं उपयोगांत आणावें असा त्यांचा प्रथमपासूनचा हेतु दिसतो. त्यांनीं ब्रह्मोत्तरखंड, मदालसाचरित्र वगैरे काव्यांत गीतिवृत्त वापरून पाहिलें व कृष्णविजय, प्रल्हादविजय इत्यादि काव्यांत आर्यागीतिवृत्त मळताळून पाहिलें. यांपैकीं अर्थात् गीतिवृत्तच पंतांना अखेरीस पसंत पडलें आणि असें होणें केवळ साहजिकच होतें. तथापि आर्यागीतीबद्दलही पंतांना कमी अभिमान वाटत होता असें नाहीं. तिलाही 'आर्या' याच नावानें संबोधून ते कृष्णविजयाच्या प्रारंभीं "वृत्तीं आर्धी आर्या श्राव्या सेव्याचि फार साधी आर्या" असें म्हणून तिचा गौरव करितात. यावरून कांहीं दिवस तरी आर्यागीतीनें पंतांच्या मनाला वश करून घेतलें होतें असें उघड दिसतें.

यावरून असें दिसून येतें कीं कृष्णविजय पूर्वार्धांत जी इतकी क्लिष्टता दिसून येते तिला आर्यागीतीसारख्या अवघड वृत्ताची योजना फारशी, किंबहुना मुळींच कारणीभूत झालेली नाहीं. सकृद्दर्शनीं आपल्यास असें वाटतें कीं आर्यागीतीसारख्या नीरस व अवघड वृत्तांत रचना करणें पतांस फार कठीण गेलें असेल. परंतु आपल्यासारख्यांच्या अनुभवाचें प्रमाण पंतांस लावून उपयोगी नाहीं. भाषेला हवी तशी खेळविण्याचें त्यांचें सामर्थ्य खरोखरीच अचाट होतें आर्यागीति हें मोठें श्राव्य (ऐकण्यास गोड) व साधें वृत्त आहे असा त्यांनीं स्वदस्तूरचाच शेरा मारून ठेवला आहे. शिवाय हा शेरा अगदीं अक्षरशः खरा आहे हें सिद्ध करणारे कृष्णविजयाचे उत्तरार्धांतील ५०–५४ अध्याय आहेतच. त्यांच्यामधली द्राक्षापाकसम रचनाच आर्यागीतिवृत्तामध्यें पंतांना किती सोज्वळ व सोपें काव्य करतां येत होतें हें सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

७९. मग कृ. वि. पूर्वार्धास इतका कठीणपणा आला कशानें? मला वाटतें यमकरचनेच्या अतिरिक्त बंधनामुळें, अलंकारादिकांची खचून भरती करण्याच्या उद्देशामुळें व कदाचित् ओजोगुणपूर्ण रचना करण्याचा कवीनें स्वतःच बेत ठरविल्यामुळें. यांपैकीं यमकाचा हव्यास हें काव्यास काठिन्य येण्याचें कारण, कृष्णविजय काव्य

जो वर वर पाहील त्याला देखील पटेल. मनाला वाटेल तशी वक्रविम्याचे कितीही जरी सामर्थ्य असलें तरी अमुक ठिकाणीं अमुकच अक्षर आलें पाहिजे अशा सन्हेचा सात सात आठ आठ अक्षरांपर्यंत निर्बंध पडूं लागला तर त्या रचनेस काठिन्य आल्याखेरीज राहणार नाहीं. शिवाय आर्यागीति रचतांना प्रत्येक चरणाच्या अंतीं यमक साधण्याची पंतांनीं रीत ठेवली आहे. पंतांच्या नेहमींच्या गीतीमध्यें दुसऱ्या व चवथ्या चरणाच्या अंतींच यमक असतें, तें येथें प्रत्येक चरणांत साधण्याचा कटाक्ष ठेवल्यामुळें अगोदर यमकाचें बंधन दुपटीनें जास्त झालें त्यांत आणखी दीर्घ यमकांचा सोस धरल्यामुळें 'गंडस्योपरि पिटकाः संवृत्ताः' अशी स्थिति झाली असल्यास नवल नाहीं. कृ. वि. पूर्वार्धांत, पांच, सहा अक्षरांचें तर सर्वत्रच, पण क्वचित् सात आठ अक्षरांचेंही यमक साधलेलें आढळतें.-

वरितिल वर मानव, स–। प्रेम भजुनि तुज; तूंहि परमा नवस ।

सद्भाव पुरविशील, । स्वजनाघतमीं धरूनि वपु रविशील ॥ कृ. वि.२.१६.

ही कृ. वि. पूर्वार्धांतील अगदीं सोपी आर्यागीति. हिच्यांत पहिल्या अर्धांत पांच अक्षरांचें व दुसऱ्या अर्धांत सहा अक्षरांचें यमक साधलें आहे. आर्यागीतीचा पहिला चरण अगदीं लहान, फार तर ८, ९, अक्षरांचा असतो; त्याच्यांत प्रबंधविशेषीं सात आठ अक्षरांचें यमक गुंफणें किती अवघड जात असेल याची कल्पना करावी. कृष्णविजयांत बहुतेक ठिकाणीं जे अवघड शब्द किंवा क्लिष्ट रचना आली आहे ती बहुतेक यमकांकरितां आली आहे हें उदाहरणें घेऊन दाखवितां येईल. धृतवारिदडर्यकीं (३९ ८), हृदयोकामधुनीं (१६. ५२), घोटकरीन (१८. १३), वगैरे सारखे क्लिष्ट व कर्णकटु प्रयोग; शिवाय कशा (३७. २), अहार्य (२४. ७), असवाय (२३. १२), पाटीर (४८. १), क्षणर्नी (१. ३९), वाळीं (१. ३२), अलिक, (२९. २), अवकेशी (३६, २१), अकुच (४८. १), सिकय (२२ ५), शर (पाणी या अर्थी) (२९. १), सराह (४४. १६), कंज (४७. ५९), यांसारखे सामान्य मराठी वाचकांस अवघड वाटणारे शब्द केवळ यमकाकरितां सर्वत्र आणलेले असून त्यामुळें काव्याच्या क्लिष्टतेंत बरीच भर पडली आहे. शिवाय यमकरचनेकरितां सरळ वाक्यरचनेची उलटापालट करावी लागते, दूरान्वयाचा दोष पत्करावा लागतो, सर्वनामांचा, क्रियापदांचा वगैरे ठिकठिकाणीं अध्याहार करावा लागतो. असा अनेक खटपटी करून पदरचना

कधीं तरी जमवावी लागे. यमकाच्या पाठीमागें लागल्यामुळें येणारे हे सर्व दोष कृ. वि. पूर्वार्धामध्यें आलेले आहेत. उत्तरार्धामध्ये ५० ते ५४ अध्यायांत आर्या-गीति वृत्त कायम असून देखील दीर्घ यमकांचा आग्रह सोडल्यामुळें पंतांच्या रचनेस अतिशय सुगमता आली आहे. यां अध्यायांत एकदोन अक्षरांपलीकडे जास्त मोठीं यमकें साधण्याचा अट्टहास पंतांनीं मुळींच केलेला नाहीं. एखादे वेळेस सहजगत्या साधलेंच तर तीन चार अक्षरांपर्यंत यमक साधलें आहे. पण यापेक्षां जास्त फार करून नाहीं. आणि असें सहज, अर्थास क्लिष्टता न आणतां साधलेलें यमकच गोड लागतें. मुद्दाम खटपट करून साधलेल्यांत तितकी शोभा येत नाहीं. यमकाचा लचडा नाहींसा झाल्यामुळें ५०-५४ अध्यायांतील आर्या-गीति कशा सोप्या झाल्या आहेत याचें एक उदाहरण.

तों यवनांचा भूप । प्रभुचें पाहे जगन्मनोहर रूप ।

नारद कथितें सारीं । ओळखिलीं लक्षणें भगवदाकारीं ॥ कृ.वि.५१.१.

अलंकार साधण्याच्या खटपटीमुळें देखील कृष्णविजय पूर्वार्धाच्या क्लिष्टतेंत बरीच भर पडली आहे असें म्हणावें लागतें. एकादें सर्वांगीण रूपक किंवा सर्व अंगांनीं पूर्ण अशी उपमा साधण्याच्या खटाटोपांत पंत पडले म्हणजे वाक्यरचना बोजड व अवघड होऊन प्रसादाची हानि व्हावयाची हें बहुधा कृष्णविजयामध्यें ठरलेलें असतें. हीं रूपकेंही पुष्कळ वेळां मोठीं अलौकिक किंवा बहारीचीं असतात असें नाहीं. चांदण्या रात्रींचीं, सूर्यप्रकाशविकसित कमळांचीं किंवा अशींच सामान्य कल्पनांनीं युक्त असलेलीं रूपकें कृष्णविजयांत पुष्कळदां येतात व तीं काव्याच्या क्लिष्टतेस कारण होतात.

लेशहि शरदमळ न, भा । धवळी अमृतांशुचीहि शरदमलनभा ।

अंबर सितरुचि रजनी । विलासिनी धरि अमौक्तिकें रुचिर, जनीं ॥

( शर ( पाणी )+द=जलद, मेघ; शरदमळ=मेघांचा मळ ) कृ. वि. २९.१.

यांतील रूपक साधारणपणें परिचित असेंच पण सुंदर आहे. अर्थाकरितां नाना काव्यसंग्रहकारांनीं या एका पद्यावर दहा टीपा दिल्या आहेत. पराडकरी आवृत्तींत टीपा अगदीं कमी असतात तरी इच्यावर सात टीपा तेथेंही दिल्या आहेत. यावरून या आर्येच्या कठीणपणाची कांहीं कल्पना येईल.

---

* येथपासून पुढें आर्यागीति या वैशिष्ट्यदर्शक नांवाचें कांहीं प्रयोजन नसल्यामुळें पंतांनीं प्रचलित केलेल्या ' आर्या ' याच सुटसुटीत नांवानें आर्यागीतीला संबोधण्याचा या पुस्तकांत क्रम ठेवला आहे.

१०. अशा तऱ्हेच्या क्लिष्टपणामुळें कृष्णविजयपूर्वार्ध जरा अप्रीतिकारक झाला आहे. ' उत्कट प्रीतीमुळे सदर ग्रंथाला ( कृष्णविजयाला ) एक प्रकारचा विलक्षण साधेपणा आला आहे व वाचकांच्या दृष्टीनें पूर्वार्ध कठीण झाला असला तरी त्यांत सुद्धां प्रसाद आहे ' असे उद्गार पांगारकरांनीं काढले आहेत. ( मो. च. पृ. २५७). हे पांगारकरांचे उद्गार अर्थवादात्मक आहेत असेंच मानलें पाहिजे. येथे पांगारकरांना प्रसाद म्हणजे केवळ काव्यसौंदर्य असा अर्थ अभिप्रेत असावा असें वाटतें. ' स्वच्छजलवत् सहसैव यो व्याप्नोति ' अशा तऱ्हेचा, वाचल्या-बरोबर सर्व चित्ताला व्यापून टाकून तात्काळ रसाविर्भाव उत्पन्न करणारा गुण पूर्वार्धात दिसून येत नाहीं. त्याचप्रमाणें पंतांच्या अंगीं जन्मतःच असलेली निर्मळ चित्तवृत्ति व भक्तिरसार्द्रता याही काव्यांत दृष्टोत्पत्तीस येत असली, तरी त्यामुळें काव्यास विलक्षण साधेपणा आलेला आहे हें पांगारकरांचें म्हणणें फारच थोड्यांस पसंत पडेल. यमकांमुळें, क्लिष्ट कल्पनांमुळे व अलंकारांच्या अवडंबरामुळें कृ. वि. पूर्वार्धाचा साधेपणा नष्ट झालेला असून त्यास बोजडपणा आलेला आहे, असाच कोणीहि रसिक वाचक अभिप्राय देईल यांत संशय नाहीं. असें आहे तरी काव्य-सौंदर्य, प्रेमळपणा, भक्तीचा ओलावा हे गुण त्यांत नाहींत असें नाहीं. अनेक ठिकाणीं मुळांत नसलेला असा सुंदर कल्पनांचा विस्तारही दिसून येतो. बहुधा पंतांनीं मुळाला अनुसरलें आहे. तथापि मुळांतील अर्थाला थोडेंबहुत वळण देऊन स्वतःच्या दृष्टांतांच्या योगानें त्याला जास्त शोभा आणण्याची पंतांची खुबीही पुष्कळ ठिकाणी प्रकट झाली आहे. असो. या काव्यांतील पंतांची धाटणी कशी काय आहे हें पाहण्याकरितां त्याची थोडीशी शलाकापरीक्षा करून पाहूं. कृष्णा-कडून निरोप घेऊन गोपींचें सांत्वन करण्याकरितां उद्धव गोकुळांत आला त्या वेळच्या उद्धवाच्या व गोपींच्या भेटीचें वर्णन—

मूळ —तं वीक्ष्य कृष्णानुचरं व्रजस्त्रियः प्रलंबबाहुं नवकंजलोचनम् ।

पीताम्बरं पुष्करमालिनं लसन्मुखारविंदं मणिमृष्टकुण्डलम् ॥

भा. १०. ४७. १.

प्राकृत—वदति असें, तो सुरसा-। पुष्करमालाधर स्मितानन सुरसा ।

पाहे भगवदनुग या । अंतर्धृतविष्णुचरण युवतितनु गया ॥

कृ. वि. ४६.४६.

म्हणतिवि उद्धव बांही । केला कृष्णोपभुक्तशुद्धवयांहीं ।
जेवि विशदयज्ञानीं । निर्मळ मोक्षेच्छुनींच सदय ज्ञानी ॥ कृ.वि.४७.१.

मुळांत फक्त उद्धवाला गोपींनीं पाहिलें असें वर्णन आहे. पंतांनीं पहिल्या आर्येंत उद्धवानें गोपींना पाहिलें असें म्हणून दुसरीमध्यें गोपींनीं उद्धवास पाहिल्याचा उल्लेख केला आहे. पहिल्या आर्येंत गोपींना 'अंतर्धृतविष्णुचरण' असें यथार्थ विशेषण देऊन त्यांचें गयेशीं साम्य दाखविलें आहे. त्याचप्रमाणें दुसऱ्या आर्येंत गोपींना यज्ञादिक कर्मकांड आचरून भागलेल्या मोक्षेच्छु साधकांची उपमा दिली आहे. या दोन्ही कल्पना मोठ्या मार्मिक व सुंदर असून समर्पक आहेत. मुळांतील उद्धवाचें कृष्णासारखें केलेलें स्वरूपवेषवर्णन पंतांनीं बरेंचसें गाळलें आहे. पण 'कृष्णोपभुक्तशुद्धवयांहीं' हें विशेषण मात्र अर्थपोषक नसून उलट वाईट अर्थ सुचविणारें, केवळ यमकाकरितां आणलेलें आहे. पुढें —

मूळ-शुचिस्मिताः कोऽयमपीच्यदर्शनः कुतश्च कस्याच्युतवेषभूषणः ।
इति स्म सर्वाः परिवव्रुरुत्सुकास्तमुत्तमश्लोकपदांबुजाश्रयम् ॥
भा. १०.४७.२.

पंतकृति—म्हणति हरिनयन रमणी, । 'हा अच्युतवेषभूर कोण नरमणी ?'।
देववधूपतिमाशा । वेष्टिति त्याला, जशा मधूप्रति माशा ॥
कृ. वि. ४७—२.

हें अर्थात् मुळाबरहुकूम नाहींच; तथापि पंतांनीं स्वतःच्या कल्पनेनेंच सुंदर साधलें आहे. गोपींना दिलेला माशांचा दृष्टांत मात्र चांगला नाहीं. याच्यापुढचाच तिसरा श्लोक—

मूळ—तं प्रश्रयेणावनताः सुसत्कृतं सव्रीडहासेक्षणसूनृतादिभिः ।
रहस्यपृच्छन्नुपविष्टमासने विज्ञाय संदेशहरं रमापतेः ॥ भा. १०.४७.३.

पंतकृति—ते गोपस्त्रीजनता । आल्या हरिदासचरणसरसीजनता ।
मग एकांतीं बसला । केली, प्रकटावया निजाशय असला ॥
कृ. वि. ४७.३.

हें रूपांतर मात्र गचाळ झालें आहे. यांत मुळांतील अनेक महत्त्वाच्या पदांचा

अर्थ सुटला असून ' सरसीज ' ( कमळ ) असला अश्रुत प्रयोग, असका व कसका या कटु व रसहानिकारक शब्दांची योजना यांच्या योगानें हें पद्य अगदींच वैरस्यावह झालें आहे. यापेक्षां मूळ श्लोक किती तरी सुंदर अर्थानें भरगच्च भरलेला असा आहे !

असा रीतीनें नमुन्यादाखल पंतांच्या रूपांतरांतील तीन आर्या ओळीनें दिल्या आहेत. त्यावरून पंतांचें एकंदर रूपांतर कसें झालें आहे हें लक्षांत येईल. अगदीं मुळाबरहुकूम रूपांतर करण्याच्या भानगडींत पंत येथें फार वहून पडत नाहींत. आर्यागीति वृत्तांत, त्यांतून यमकाच्या कैचीमध्यें सर्वत्र मुळाबरहुकूम भाषांतर होणें शक्य झालें नसतें. अध्याय ३१ मधील गोपीगीत मात्र पंतांनीं अगदीं मुळास धरून पद्यास पद्य याप्रमाणें मराठींत आणलें आहे. पण तें मुळा-पेक्षांही जास्त क्लिष्ट झालें आहे. अध्याय ३२ मध्यें देखील मुळाबरहुकूम रूपांतर करण्याचा क्रम पुढें चालविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे, पण तो फक्त १० आर्यापर्यंतच टिकला आहे. पुढें पंतांनीं मनास येईल तसा विस्तार करण्यास प्रारंभ केला आहे.

६१. आतां समग्र पूर्वार्धामध्यें विस्तारसंक्षेपाच्या बाबतींत पंतांनीं कसकसें धोरण ठेवलें आहे तें अध्यायांच्या क्रमानें थोडेसें पाहूं व नंतर मंत्रभागवताकडे वळूं. प्रारंभापासून कृष्णविजयामध्यें पंतांनीं थोडेंबहुत संक्षेपाचेंच धोरण ठेवलें आहे. आणि रासक्रीडेच्या अध्यायापर्यंत बहुधा तें त्यांनीं कायम राखलें आहे. मधले कांहीं अध्याय तर त्यांनीं अजीबात गाळले किंवा अतिसंक्षिप्त केले आहेत. दहावा ब्रह्मस्तुतीचा अध्याय गाळल्यासारखाच केला आहे. विसावा वर्षाऋतुवर्णनाचा अत्यंत सुंदर अध्यायही गाळला असून केवळ नांवाला तीन आर्या त्याच्या वाट्यास दिल्या आहेत; व यापुढील माधववेणुवादनाच्या मोहक अध्यायाचाही अप्रशस्त संक्षेप केला आहे. सव्विसाव्या अध्यायांत गोपांना श्रीकृष्णाचें ईश्वरत्व गर्गमुनींनीं सांगितल्याप्रमाणें कळून येतें असें वर्णन आहे; तोही अध्याय पंतांनीं गाळलाच आहे. याप्रमाणें कांहीं अध्याय जरी सोडून दिले असले तरी एकंदर वर्णन साग्र परंतु थोडयाशा संक्षेपानें करण्याची पद्धति ठेवली आहे. रासक्रीडेच्या २९ ते ३३ अध्यायांत मात्र पंतांनीं मुळापेक्षां बराच अधिक विस्तार केला आहे; आणि तेथें त्यांच्या काव्याला रंगही जरा जास्त चढला आहे. परंतु रासपंचाध्यायी

झाल्यानंतर पंतांनीं पुनः आपल्या संक्षेपाच्याच धोरणाला चिकटून वर्णन चालू ठेवलें आहे. पसतिसाव्या अध्यायांतील अत्यंत प्रेमळ व भक्तिरसाई गोपिकायुगल-गीताचा मात्र पंतांनीं अप्रशस्त असा अतिसंक्षेप केला आहे; त्याचप्रमाणें चाळि-साव्या अध्यायांतील अक्रूरकृत सुंदर स्तुतीचाही. या गोपिकागीतावर व ईश्वर-स्तोत्रांवर पंतांची मर्जी अगदीं नाराज दिसते. कां कोण जाणे ! असो. चवेचाळि-साव्या अध्यायापर्यंत असें संक्षेपाचेंच धोरण चालू ठेवल्यानंतर त्या अध्यायापासून पंतांनीं एकदम विस्तार करण्यास सुरवात केली आहे. कंसवधाचा अध्याय (४४) गुरुपुत्रानयनाचा अध्याय ( ४५ ) हे दोन्ही अध्याय विस्तारानें वर्णिले आहेत. पुढील ४६ व ४७ या अध्यायांत तर पंतांनीं विस्ताराची कमाल केली आहे. या दोन अध्यायांत उद्धवानें गोकुळाला भेट दिली व नंदयशोदा यांचा आणि गोपींचा शोक नाहींसा केला वगैरे वर्णन आहे. मुळांतील ११८ श्लोकांच्या पंतांनीं १८२ आर्या केल्या आहेत. पुढें अक्रूराला कृष्णानें हस्तिनापुरीं पांडवांचा समाचार घेण्याकरितां पाठविलें ती कथा ४८,४९ अध्यायांत आहे, तीही पंतांनीं मुळापेक्षां विस्तारानें वर्णिली आहे.

६२. आतां मंत्रभागवताच्या दशमपूर्वार्धाविषयीं लिहावयाचें. पण त्याच्या-विषयीं कसें व काय लिहावयाचें याचीच मोठी पंचाईत पडणार आहे. खरोखर येथील पंतांची संक्षेपविस्ताराची चातुरी इतकी अप्रतिम आहे, काव्यसौंदर्याची येथें इतकी बहार झालेली आहे व प्रेमळ भक्तिभावाचा व वात्सल्याचा येवढा ओघ वहात चालला आहे कीं त्याची इत्थंभूत कल्पना सर्व काव्य मुळांत वाचल्या-नेंच येईल. थोडक्याशा विवरणानें कधींही येणें शक्य नाहीं. मंत्रभागवताच्या पूर्वार्धांत वात्सल्याचा व सात्विक प्रेम्याचा अपार सांठा पंतांनीं लुटविला आहे. मंत्रभागवत हें पंतांनीं अजमासें आपल्या वयाच्या ५४-५५ या वर्षांत लिहिलें. अर्थात् या परिणत वयामध्यें त्यांच्या हातून इतकें वात्सल्यपूर्ण काव्य निर्माण झालें हें योग्यच झालें. उत्कृष्ट कवि हा खरोखर वयाच्या किंवा संसारांतील स्थितीच्या मर्यादेनें बांधलेला असतो असें नाहीं. त्याचें चित्त तन्मय झालें, प्रतिभा उद्दीपित होऊन रचनेचें स्फुरण होऊं लागलें म्हणजे कोणत्याही रसाचें, कसल्याही प्रसंगाचें वर्णन त्याच्या हातून उत्कृष्ट वठतें. मग त्यास स्वतःच्या वयोवस्थेचा कसलीही अट बांधूं शकत नाहीं. तथापि त्यांतल्यात्यांत वात्सल्यपूर्ण प्रेमाचें वर्णन मंत्रभागवतांत इतकें बहारीचें झालेलें आहे व कृष्णविजयांत तें तितकें

झालेलें नाहीं या गोष्टीच्या खुलाशाकरितां किंचित्सें पंतांच्या वयो-वस्थेकडे लक्ष पुरविल्यास तेथें त्याचें कांहींच स्पष्टीकरण सांपडणार नाहीं असें नाहीं. कृष्णविजय साधारणपणें प्रौढावस्थेत, पूर्ववयांतच पंतांनीं रचला. तेव्हां मित्रप्रेम, दंपतीप्रेम, गृहपतीचें एकंदर आपल्या संसारावर असलेलें सात्विक प्रेम या प्रेमाच्या प्रकारांचा सांठा असलेला कृष्णचरित्राचा उत्तरार्ध पंतांच्या मनास त्यावेळीं आकर्षण करून घेता झाला व तो त्यांनीं कृष्ण-विजयांत अत्यंत बहारीनें वर्णून दाखविला. कृष्णविजयाचा उत्तरार्ध रचला त्यावेळीं पंतांचें वय पसतिशीच्या आंतबाहेर असावें असें पुढें कृष्णविजयाच्या रचनाकालाविषयीं विवेचन केलें आहे त्यावरून दिसून येईल. हें वय म्हणजे गार्हस्थ्यसुखाचा व तदंगभूत सात्त्विक प्रेमाच्या अनुभवाचा परमावधीचा काल होय. कृष्णविजयाचा उत्तरार्ध फार मनोहर झाला आहे व त्यांतल्या त्यांत विशे-षतः कृष्णाचें संसारचित्र, रुक्मिण्यादींच्या विवाहकथा, सुभद्राहरणासारखे सांसारिक प्रसंग, सुदामदर्शनासारखे बाळमित्रांच्या भेटीचे प्रेमळ प्रसंग हे पंतांच्या लेखणींतून अत्यंत मनोहर रीतीनें बाहेर पडले आहेत, हें तें काव्य पहा-तांच कोणाच्याही ध्यानांत येईल. आणि याचा उलगडा थोडासा तरी त्यांच्या वयःप्रवृत्तीवरून व्हावा असें वाटतें. याच्या उलट, प्रौढपणीं योग्य तऱ्हेनें संसार केलेल्या गृहस्थास परिणत वयामध्यें पुत्रप्रेम, वात्सल्य, सात्विक व निरिच्छ भक्तिभाव यांचा उत्कृष्ट अनुभव घडतो व त्यांच्यामध्येंच त्याचें मन विशेष रंगतें; तेव्हां वात्सल्यानें ओथंबलेल्या पूर्वार्धाचा पंतांच्या हातून उत्तर वयामध्येंच उत्कृष्ट परिपाक उतरावा हीही त्यांच्या वयःस्थितीला अनुसरून योग्यच गोष्ट झाली असें मानण्यास हरकत नाहीं.

६३. मंत्रभागवताच्या दशमपूर्वार्धाची आर्यासंख्या ६६० आहे. म्हणजे मूळ भागवत पूर्वार्धाच्या ( श्लोक २०१२ ) बरोबर एकतृतीयांशाइतका संक्षेप पंतांनीं येथें केला आहे असें दिसून येतें. कृष्णविजयामध्यें जे जे अध्याय पंतांनीं गाळले आहेत किंवा अतिसंक्षिप्त केले आहेत ते ते पंतांनीं येथेंही गाळले आहेतच. शिवाय यमलार्जुनवृक्षांना उखळीनें उलथून पाडल्याचा १० वा अध्यायही पंतांनीं एका आर्येंत उल्लेख करून संपविला आहे. ब्रह्मस्तुतीचा १४ वा अध्याय,-प्रावृट्शोभेचा २० वा, माधववेणुनादाचा २१वा, या अध्यायांवरून कृष्ण-विजयाप्रमाणें पंतांनीं कातरी फिरवली आहेच. पण धेनुकासुराचा वध, कंसवधा-

तील वनशोभा इत्यादि ( अ. १५ ); कालियमर्दनाबद्दल कृष्णाचें अभिनंदन ( अ. १७ ); नंदाची वरुणशापबंधनापासून मुक्तता ( अ. २८ ) वगैरे भागहि देखील पंतांनीं अगदीं संपुटांत आणले आहेत. रासक्रीडेचें वर्णनही पंतांनीं अतिशय संक्षेपानें पण तितक्याच बहारीनें केलें आहे. मुळांतील रासपंचाध्यायीचे श्लोक १७४ असून त्यांतील सर्व रस पंतांनीं केवळ ३२ आर्यांत ( ३७५-४०७ ) उतरला आहे. येथें पंतांच्या संक्षेपकौशलाची खरोखर धन्य म्हणावीशी वाटते. रासपंचाध्यायीपैकीं तिसऱ्या, म्हणजे पहिल्यापासून ३१ व्या अध्यायांत गोपींनीं गायिलेलें प्रेमळ गीत आहे. पंतांनीं तें गीत गाळलेलें आहे पण त्या गाळलेल्या भागाची पुरेपूर भरती करून देणारी एकच मनोरम आर्या त्यांनीं घातली आहे.

भक्तीनें आळवितां गातां गुण चिंतुनी मनीं मूर्ती ।
प्रकटे गोपींत प्रभु होतां तद्बुद्धि निर्मळा पूर्ती ॥ ३९९ ॥

याच्यापुढें ३२ व्या अध्यायांत कृष्णानें प्रकट होऊन गोपींचें समाधान केलें त्याचें सुंदर वर्णन आहे, तेंही पंतांनीं एकाच आर्येंत खुबीदार रीतीनें आणलें आहे.

गलदंजनाश्रुमलिनें नयनें त्यांचीं पुसी स्वपाणीनें ।
सांत्वन करी प्रियांचें परमेश्वर अमृतमधुर वाणीनें ॥ ४०० ॥

रासक्रीडेनंतरही पंतांच्या वाणीची मनोहरता कांहीं कमी झालेली नाहीं. पस्तिसाव्या अध्यायांतील अतिशय सुंदर गोपिकायुगलगीत पंतांनीं मंत्रभागवतांत उतरलें नाहीं. पण त्या मधुर प्रेमोद्गारांचें पंतांनीं तिन्हाईतपणेंच इतकें मनोहर वर्णन केलें आहे कीं तेथें पंतांना स्वतःलाच आपली धन्य झाली असें वाटलें

ते प्रेमोद्गार मधुर मधुरतर मुकुंदयशहि आर्या तें ।
गात्यांच्या, श्रोत्यांच्या दूर करिति तत्क्षणींच आर्यांतें ॥ ४२४ ॥
वाहों नये जळांनीं, डोलावें फण करुनि उरगांनीं ।
अश्रूंनीं देवींचें नित्य भिजावें सवस्त्र उर गानीं ॥ ४२५ ॥
सुर अनिमेष तसे खग मृगाहि. बसती अहि मयूरहीं जवळ ।
प्रभुवेणुरवश्रवणीं गायी वत्साहि न भक्षिती कवळ ॥ ४२६ ॥

या अत्यंत कोमल व प्रेमरसानें ओथंबलेल्या आर्यांपैकीं पहिलींत पंतांनीं गोपिकांच्या युगुलगीताच्या मधुरतेचें वर्णन केलें आहे, तें पंतांचें स्वतःचेंच आहे—

दुसऱ्या आर्येत देखील कृष्णलीलागानानें गोपींची व त्यांच्या भोंवतालच्या चेतन अचेतन सृष्टीची कशी बेभान स्थिति होत असे याचें वर्णन आहे व तें पंतांचें स्वतंत्रच आहे. त्यास मुळांत आधार विशेष नाहीं. तिसरींत कृष्णाच्या वेणुगानानें सर्व सृष्टि नादावून जाऊन कशी स्तब्ध होते याचें वर्णन आहे व तें मात्र कांहींसें गोपींच्या गीतांतून पंतांनीं घेतलें आहे. सर्व सृष्टि नादानें मोहून गेल्याचें गोपींच्या गीतांत पुढीलप्रमाणें वर्णन आहे.—

वृंदशो व्रजवृषा मृगगावो वेणुवाद्यहृतचेतस आरात् ।

दन्तदष्टकवला धृतकर्णा निद्रिता लिखितचित्रमिवासन् ॥ भा. १०.३५.५.

यांतीलही सर्व वर्णन जसेंचें तसें पंतांनीं उतरलेलें नाहीं हें मार्मिकांच्या लक्षांत येईलच या ठिकाणीं पंतांना खरोखरच आपण भागवतांतील रस लुटून नेत असून त्याच्यांत आपली स्वतःची उत्कृष्ट भर घालीत आहोंत असें वाटलें. कारण येथेंच ते म्हणतात—

वाढेल ग्रंथ म्हणुनि आवरितों मी बळेंचि रसनेला ।

परि म्यां भागवतवरें भागवतांतील फार रस नेला ॥ ४२८ ॥

सदतिसाव्या अध्यायांत केशिदैत्याच्या वधाची हकीकत विस्तारानें वर्णन करण्याची पंतांना लहर आली आहे. मुळांत या प्रसंगाचें वर्णन विशेष सरस नसतां पंतांनीं त्याचें वर्णन अत्यंत बहारीचें केलें आहे; ( आर्या ४५५–४६४ ). पुढें त्याच अध्यायांतील व्योमासुराचें वर्णन सुद्धा पंतांनीं सुंदर केलें आहे; ( ४७०–७७ ). व्योमासुरास मारून कृष्ण गोकुळीं परत येतो त्यावेळेस गोपींनीं त्याचें स्वागत कसें केलें तें पंत वर्णन करतात.

बर्हप्रसूनपल्लवगुंजास्रग्धातुभूषणा विभुला ।

भुलति तरुलता गोपी किति ज्यां मुरली म्हणे प्रियासि ' भुला ' ॥४७८॥

तेजःपुंज श्रीमत्कुंजविहारी व्रजासि ये सांजे ।

तें गोपी ओवाळुनि सांडिति तनु तदनु हार्तिचे सांजे ॥ ४७९ ॥

वाटेंत उभी गोपी जी जी घेउनि करांत आरतिला ।

नयनोंचि पी अनंता, ' सद्गुरु ' न म्हणेल कोण आर तिला ॥४८०॥

दुसऱ्या आर्येतील उत्तरार्धांत गोपींची श्रीकृष्णावरील परमावधीची भक्ति किती वेचक शब्दांनीं वर्णन केली आहे ! दैत्यांना मारून विजयी होऊन आलेल्या कुमार कृष्णाच्या स्वागतविधीच्या या वर्णनांत गोपींची उत्कंठा, उत्सुकता,

धन्यता व कृष्णाबद्दलची काळजी दूर झाल्यामुळें झालेला संतोष हे सर्व भाव अस्फुटरमणीय रीतीनें प्रतिबिंबित झाले आहेत. गोपींनी केलेल्या स्वागतोचित क्रियांचें वर्णनही सहजसुंदर, समर्पक व मार्मिक आहे. मुळाला अनुसरून जरी अशा तऱ्हेचें सुंदर वर्णन कोणी केलें असतें तरी त्याची कोणीही प्रशंसाच केली असती. पण पंतांच्या या वर्णनाला मुळांत एका अक्षराचाही आधार नाहीं! मुळांत फक्त 'स्तूयमानः सुरैर्गोपैः प्रविवेश स्वगोकुलम्' या शब्दांवलीकडे कृष्णाच्या स्वागताविषयीं अवाक्षर देखील नाहीं. याउपर पंतांस भाषांतरे म्हणूनच जे म्हणणार असतील त्यांच्या पुढें डोकें फोडून घेतलें तरी त्यांचें समाधान होईल असें वाटत नाहीं.

मथुरेंत गेल्यावर कृष्णानें रस्त्यांत भेटलेल्या रजकाकडून वस्त्रें हिसकावून घेतलीं व आपल्याला पाहिजे होतीं तितकीं परिधान करून उरलेलीं तशींच रस्त्यावर टाकून दिलीं. मुळांत या गोष्टीचें केवळ साधें वर्णन आहे.

मूळ—वसित्वात्मप्रिये वस्त्रे कृष्णः संकर्षणस्तथा
शेषाण्यादत्त गोपेभ्यो विसृज्य भुवि कानिचित् ॥भा.१०.४१.३९.

पण पंत येथें एक चातुर्याची कोटि करून म्हणतात.–

पंतकृति—सुहृदां गोपांसह विभु वस्त्रें घेती यथेष्ट, तीं पुरलीं ।
लोळति धूळींत पथीं जाणों शोकेंचि अंबरें उरलीं ॥ ५१४ ॥

ही उत्प्रेक्षा पंतांच्या सहृदयतेची व चातुर्याची उत्कृष्ट निदर्शक आहे. मुळांतील कथेचें वर्णन आर्याच्या पूर्वार्धांत करून उत्तरार्धांत पंत कशा स्वतःच्या उत्कृष्ट कल्पना गोवीत असतात याचेंही हें नमुनेदार उदाहरण आहे.

६४. पंतांच्या सद्भावाचें व प्रेमळ वर्णनशैलीचें आणखी एकच उदाहरण पाहून आपण पूर्वार्धाची रजा घेऊं. कृष्ण तान्हा असतांना एक दिवस यशोदा स्वतः ताक घुसळीत बसली होती; इतक्यांत स्तनपानाकरितां कृष्ण आला व त्यानें आईची रवी धरली. त्या प्रसंगाचें वर्णन भागवतकार करतात.––

क्षौमं वासः पृथुकटितटे बिभ्रती सूत्रनद्धं
पुत्रस्नेहस्नुतकुचयुगं जातकंपं च सुभ्रूः ।
रज्ज्वाकर्षश्रमभुजचलत्कंकणौ कुंडले च
स्विन्नं वक्त्रं कबरविगलन्मालती निर्ममन्थ ॥

तां स्तन्यकाम आसाद्य मथ्नंतीं जननीं हरिः
गृहीत्वा दधिमंथानं न्यषेधत्प्रीतिमावहन् ॥ भा. १०.९.३,४.

हें वर्णन सुंदर आहे यांत शंका नाहीं. पण पंतांचें अत्यंत शुद्ध व प्रेमळ वर्णन पहा:—

मोत्यें मोर्टी मोर्टी पाच हिरे नीळ माणिकें यांहीं ।
खचित नग सकळ देहीं, गेहीं तद्दीप्ति मायिना कांहीं ॥ १६७ ॥
भरली वरि आनखशिख नंदवधू शुद्धमणिगणें हेमें ।
आंतहि पुत्रीभूतब्रह्माच्या दिव्यगुणगणप्रेमें ॥ १६८ ॥
गळती नेत्रांतुनि प्रेमाश्रुजळें फुलें शिराहूनि ।
ऐसें मथन करी तों श्रीकृष्ण धरी रवीस बाहूनीं ॥ १६९ ॥
बसवी बळेंचि तीस स्तन्यार्थी देव तो धरूनि रवी ।
शिशुपण तिच्या न केवळ उद्धारा आमुच्याहि तें मिरवी ॥ १७० ॥

यांतील दुसऱ्या व तिसऱ्या आर्येतील यशोदेचें वर्णन किती उत्कृष्ट साधलें आहे याची रसिक वाचक तेव्हांच साक्ष देतील. मुळामध्यें यशोदेचें वर्णन एक सुंदर व रमणीय कामिनी या दृष्टीनें विशेष केलें आहे, तर पंतांनीं श्रीकृष्णाची वात्सल्यपूर्ण माता या दृष्टीलाच आपल्या वर्णनांत प्राधान्य दिलें आहे. अर्थात् विशेष अंगांचा व अवयवांचा उल्लेख न करितां सामान्य आभरणांचें वर्णन करून पंतांनीं यशोदेच्या श्रीकृष्णप्रेमावर जो जास्त भर दिला आहे त्यांत त्यांचा अप्रतिम शुद्ध भाव प्रकट होत आहे असें कोण म्हणणार नाहीं ?

६५. येथेंच पंतांच्या गोपीगोडवा, नवदानकेलि, गोपीप्रेमोद्गार वगैरे गोपीजनविषयक स्फुट आख्यानांचा थोडासा उल्लेख करून पुढें जाणें रास्त होईल. यांपैकीं 'नवदानकेलि' हा श्रीकृष्ण व राधा यांचा संवाद असून त्यांत श्रीकृष्ण राधेला आत्मदान मागत आहे व राधा तें नाकारीत आहे असें वर्णन आहे. अशा तऱ्हेचें हें काव्य असल्यामुळें तें अर्थात्च पंतांच्या भागवती काव्यांमध्यें समाविष्ट करतां येत नाहीं. अगोदर राधा हें नांव किंवा या नांवाची व्यक्ति भागवतांत मुळींच आलेली नाहीं व त्यांतून कृष्णानें तिची विनवणी करणें हें तर भागवतांतील वर्णनाच्या धोरणास अगदीं विरुद्ध आहे. शिवाय प्रस्तुत काव्यही साधारणांतलें असून त्याच्यांत विशेष रस प्रकट झालेला नाहीं. 'गोपीप्रेमोद्गार' हें अगदीं किरकोळ प्रकरण असून त्यांत गोपींचे कृष्णाबद्दलचे रागाचे उद्गार

आहेत. 'गोपीगोष्ठवा' हें ६९ आर्यांचें प्रकरण मात्र अत्यंत सुंदर झालें आहे. श्रीकृष्णप्रेमानें अगदीं वेडावून गेलेल्या गोपींचे कुब्जेला श्रीकृष्णानें अंगसंग दिल्याची बातमी ऐकून निघालेले प्रणयकोपाचे उद्गार यांत आहेत. अर्थात् हे मुक्तांतीळ ४७ व्या अध्यायास कांहींसे धरून आहेत. वर्णन सर्व पंतांचें स्वतः-चेंच आहे. शेवटीं श्रीकृष्णावरील सर्व राग शांत होऊन गोपी म्हणतात,—

सर्प जसा सदनांतुनि, चित्तांतुनि वैरभाव, सखि, जावा ।
तेव्हां माने तैसा आताहि सखा मुकुंद न खिजावा ॥ ६५ ॥
श्रीकुब्जे, श्रीकृष्णा, हा जन चुकला तुम्हांसि निंदून ।
वामितों क्षमा करा हो, क्षमित्याचें यश नसेचि निंदून ॥ ६६ ॥

---

## [ दशमस्कंध उत्तरार्ध ]

६६. 'अभय दिधलें आहे, वाहे शुचिप्रतिभा झरा' असा पूर्वार्धाच्या अंतीं रसिक वाचकास निर्वाळा देऊन ठेवून बऱ्याच काळानंतर पंत श्रीकृष्णविजयाच्या उत्तरार्धाला आरंभ करतात; व शुचिप्रतिभेचा झरा अस्खलित वहात आहे असा प्रत्यक्ष अनुभव वाचकांना लगेच आणून देतात. आर्यागीति वृत्त अजून कायम आहे. पण दीर्घ यमकांचें स्वतःच्या मागें लावून घेतलेलें झेंगट त्यांनीं आतां टाकून दिलें असून ओजोगुणसिद्धीचीही त्यांची आवड नाहींशी झाल्यासारखी दिसते. कृष्णविजयाच्या उत्तरार्धाची गोष्ट तर राहोच; त्यामध्यें क्लिष्टतेचें नांव देखील नाहीं. पण यापुढें बहुधा केव्हांही त्यांनीं ओजोगुणविशिष्ट असें क्लिष्ट काव्य फारसें रचल्याचें दिसून येत नाहीं. कृष्णविजयपूर्वार्धाची पद्धत त्यांनीं एकदां टाकून दिली ती कायमची दिली. आर्यागीतिवृत्त मात्र त्यांनीं अजून पांच अध्याय कायम ठेवलें आहे. परंतु यमकांचा सोस नाहींसा झाल्यामुळें या पांच अध्यायांतील आर्यागीति अत्यंत सुगम व प्रसादपूर्ण झाल्या आहेत. पूर्वींच्या ४९ अध्यायांतील आर्यागीतींशीं या साध्या आर्यागीतींचा विरोध किती ठळकपणें नजरेस येतो हें मागें ५९ व्या परिच्छेदांत दाखविलेंच आहे. असो. या पांच ( ५०–५४ ) अध्यायांनंतर आर्यागीतींलाही रजा दिली असून अक्षरगणवृत्तांची योजना केली आहे.

६७. पंतांची वर्णनाची तऱ्हाही ५० व्या अध्यायापासून निवळली असून अलंकार साधण्याचा खटाटोप यापुढें ते फारसा करीत असलेले दिसत नाहींत. काव्यरचनेंत

तन्मय होऊन सहजासहजीं आलंकारिक उद्गार तोंडांतून बाहेर आले असतां ते अतिशय शोभादायक होतात. मंत्रभागवतांतले बहुतेक अलंकार असेच स्वाभाविकपणानें आलेले आहेत. ते साधण्याकरितां खटाटोप करावा लागलेला नाहीं; आणि म्हणूनच मंत्रभागवतामध्यें प्रेमळपणाचे व काव्याच्या उत्कर्षाचे जे सहजस्फूर्तीनें रचलेले भाग आहेत त्यांमध्येंच अत्यंत हृद्य अशा अलंकारांचीं उदाहरणें पुष्कळ सांपडतात. पण कृष्णविजयपूर्वार्धामध्यें तशी स्थिति नव्हती. अलंकार साधण्याकरितां ते खटपट करीत असत. ' लेशहि शरश्मळ नसा ' हें मागें दिलेलें कृ. वि. पूर्वार्धांतील उदाहरण अशांपैकींच होय. पण ही अशा प्रकारची मारून मुटकून अलंकार लादण्याची प्रवृत्ति कृष्णविजयउत्तरार्धांत कमी झालेली आहे. आतां येथें देखील आलंकारिक कविता म्हणजे पंतांच्या तोंडांतून आपोआप बाहेर पडते असें नाहीं, तथापि अलंकार साधण्याकरितां जो विशेष अट्टहास पूर्वार्धांत केव्हां केव्हां केलेला दिसून येत असे तो आतां नाहींसा झाला आहे. शिवाय ५० ते ५४ अध्यायांत बहुतेक मुळास धरून कथाभाग वर्णन करण्याची पंतांनीं शिस्त ठेवली आहे. या पांच अध्यायांत जरासंधाच्या व कृष्णाच्या झटापटी, मुचुकुंदाची भेट व रुक्मिणीस्वयंवर इतक्या गोष्टी आल्या आहेत. त्या सर्व पंतांनीं सुंदर रीतीनें वर्णिल्या आहेत. मुचुकुंदाच्या हकीकतीपैकीं मुचुकुंदकृत ईशस्तुति पंतांनीं गाळली आहे. रुक्मिणीविवाहकथा मात्र पंतांनीं मुळापेक्षां विस्तारानें वर्णिली आहे, तथापि ५४ व्या अध्यायांत, बलरामानें, रुक्मिणीचें तिच्या भावाच्या झालेल्या दुर्दशेबद्दल सांत्वन करतांना, जो १४ श्लोकांचा वेदान्त सांगितला आहे तो पंतांनीं गाळला आहे. बावन्नाव्या अध्यायांतील रुक्मिणीनें कृष्णाला पाठविलेल्या सप्तश्लोकात्मक पत्रिकेचें पंतांनींही सात आर्यागीतींत सुंदर भाषांतर केलें आहे. पंत कांहीं नेहमीं असें बरोबर भाषांतर करीत नाहींत. तथापि ते जेव्हां भाषांतर करतात तेव्हां त्यांची सरणी कशी असते तें कळावें व अवघड वृत्तांतही भाषांतर करण्याचें पंतांचें कौशल्य कसें अप्रतिम आहे हें दिसून यावें, यास्तव मूळ रुक्मिणीपत्रिकेंतील पहिलाच श्लोक व त्याचें भाषांतर देतों.

मूळ—श्रुत्वा गुणान्भुवनसुंदर शृण्वतां ते निर्विश्य कर्णविवरैर्हरतोऽङ्गतापम् ।
रूपं दृशां दृशिमतामखिलार्थलाभं त्वय्यच्युताविशति चित्तमपत्रपं मे ॥
भा. १०. ५२. ३७.

पंतकृति-श्रोतृमनस्तापहर। स्वद्रुम ऐकोनि, रूप हृष्टकविकर।
रुचिरवरा मन शिरते। तुजमाजि मळज जें सुखेच्छु सुचिर तें॥
कृ. वि. ५२. १४.

हें भाषांतर मुळाबरहुकूम असून फार गोड झालें आहे. असेंच सातही श्लोकांचें भाषांतर सुंदर आहे.

६८. येथें एक मोठी चमत्काराची व मौजेची गोष्ट निवेदन करण्याजोगी आहे. पंतांच्या हस्तलिखित पोथ्यांचा जो संग्रह आहे त्यांत पूर्वार्धाची व उत्तरार्धाची अशा दोन पक्क्या पोथ्या पंतांच्या सुंदर घोटीव हस्ताक्षरांत लिहिलेल्या आहेतच. परंतु जमाखर्चाच्या वह्यांसारखे उभे धरून लिहिलेले कच्चे खर्डेही कृष्णविजयाच्या कांहीं भागापुरते उपलब्ध आहेत. या खर्ड्यांवर कृष्णविजयाच्या ५० व्या अध्यायापासून म्हणजे उत्तरार्धाच्या प्रारंभापासून ७३ व्या अध्यायापर्यंतच मजकूर लिहिलेला आढळतो. ही कच्ची प्रत म्हणजे पक्क्या प्रतीसारखीच खाडाखोड न करतां सुवाच्य व्यवस्थित लिहिलेली आहे. तरी केव्हां केव्हां पक्क्या प्रतींतील पाठांपेक्षां निराळे व अगोदरचे असे पाठ हिच्यांत सांपडतात. अशा पाठभेदांच्या दृष्टीनें ही प्रत बारकाईनें पहात असतां एक मौजेचा प्रकार आढळून आला. ५४ वा अध्याय सर्व आर्यागीति वृत्तांत लिहून काढल्यानंतर त्याच्या पुढें ५५ व्या अध्यायांतला मजकूरही पंत तसाच आर्यागीतींत लिहीत गेले आहेत! सहा आर्यागीति अशा लिहिल्यानंतर ओळ अपुरीच सोडून लिहिणें बंद केलें आहे. त्याच्या खालीं थोडीशी जागा सोडून मग 'पूर्वी रुद्रललाटलोचनशिखिज्वालामुखीं जो जळे' अशा श्लोकबद्ध रचनेस सुरवात करून ५५ व्या अध्यायास पुनः प्रारंभ केला आहे. पंतांच्या पक्क्या पोथींत व छापील प्रतींतही 'पूर्वी रुद्रललाट'या श्लोकानेच ५५ व्या अध्यायास प्रारंभ होत आहे व हीच श्लोकरचना पुढें एकसारखी चालू राहिली आहे हें प्रसिद्धच आहे. परंतु पंतांच्या कच्च्या प्रतीची जी स्थिति वर वर्णन केली आहे तिजवरून असें दिसून येतें कीं पंतांनीं पहिल्या प्रथम पूर्वीच्या चोपन्न अध्यायांप्रमाणें ५५ वा अध्याय आर्यागीतींतच लिहिण्यास सुरवात केली होती; परंतु एकदम बेत बदलून त्यांनीं आधीं लिहिलेल्या ६ आर्यागीति मोडून टाकून श्लोकवृत्तांत रचना करण्यास सुरवात केली. त्याचें कच्च्या प्रतींतील जें आर्यागीतींचें लेखन आहे त्याच्याच पुढें, त्याच टाकांत, त्याच शाईनें व त्याच अक्षरांत श्लोकात्मक मजकूरही लिहिण्यास सुरवात झालेली आहे. यावरून एकदम बेत बदलून त्यांनीं आर्यागीति

सोडून विविध श्लोकांत रचना करण्यास लगेच सुरवात केली असें दिसतें. आर्यागीतिवृत्तात्मक ५०-५४हे अध्याय व श्लोकांत रचलेले पुढील ५५ पासूनचे अध्याय यांच्या रचनाकालांत कांहीं अंतर नसून ते लागोपाठ लिहिले गेले आहेत असें यावरून दिसून येईल. वर सांगितल्याप्रमाणें कच्च्या प्रतींत असलेल्या पंतांच्या ६ आर्यागीति व कच्च्या प्रतींत आढळलेले इतर पाठभेद परिशिष्ट १ यांत समाविष्ट केले आहेत. पंतांनीं लिहिलेल्या कच्च्या तावांमध्यें असा कांहीं विशेष प्रकार आहे अशी कल्पना आजपर्यंत कोणासही आली नव्हती असें दिसतें. कारण या कच्च्या प्रतींतील पाठभेदांचा व सहा आर्यागीतींचा आजपर्यंत कोणीही पंतकाव्यसंशोधकानें उल्लेख केलेला दिसत नाहीं.

६९. असो. तेव्हां याप्रमाणें ५५ व्या अध्यायापासून पंतांचा बेत एकदम बदलून त्यांच्या वाणीनें सर्वस्वीं निराळें स्वरूप धारण केलें आहे. ५५ ते ७९ या अध्यायांत पंतांनीं विविधश्लोकात्मक रचना केली आहे. त्यांतील मुख्य वृत्तें शार्दूलविक्रीडित व स्रग्धरा हीं होत. तथापि आठ अक्षरी अनुष्टुभापासून तों एकवीस अक्षरी स्रग्धरेपर्यंत बहुतेक प्रसिद्ध लहान मोठ्या वृत्तांचा पंतांनीं यथारुचि उपयोग केला आहे. या पचवीस अध्यायांतील कथाभाग ग्रथित करतांना पंतांच्या स्फूर्तीला बरेंच चालन मिळालें असून बहुतेक ठिकाणीं त्यांनीं मुळापेक्षां विस्तार केला आहे. मुळापेक्षां पंतांच्या अध्यायांची श्लोकसंख्या जरी थोडीबहुत कमी असली तरी पंतांनीं वृत्तें फारच मोठीं धरलीं असल्याकारणानें मुळांतील कथाभागांत पुष्कळच विस्तार करण्यास पंतांना वाव मिळाला आहे. मुळांत बहुतेक ठिकाणीं अनुष्टुभ वृत्त असतें तर पंतांचें अतिशय बाहुल्यानें योजिलेलें वृत्त शार्दूलविक्रीडित होय. अनुष्टुभाचीं चारी चरणांचीं अक्षरें ३२ व शार्दूलविक्रीडिताचीं ७६ असतात. म्हणजे या गणिती हिशोबानें श्लोकसंख्या दोन्हीकडे सारखी असल्यास पंतांना मुळापेक्षां सुमारें अडीचपट विस्तार करण्यास वाव मिळतो असें सिद्ध होतें. पण पंत आपल्या श्लोकांची संख्या मुळांतील श्लोकांच्या पेक्षां नेहमीं कमी ठेवून सरसकट दिडपटीपासून दुपटीपर्यंत मुळाचा विस्तार करतात. मुळांतील शुकाचार्य व परिक्षिति यांचीं प्रश्नोत्तरें, वेदान्तविषयक मजकूर वगैरे पंतांनीं आपल्या नेहमींच्या धोरणास अनुसरून गाळलाच आहे. त्यामुळें इतर कथानकांत फाफटा करण्यास पंतांना तितका जास्त अवकाश मिळाला आहे.

मुळाचा संक्षेप करण्याची पंतांची पद्धत आपणास पुष्कळ ठिकाणीं पहावयास

मिळाली आहे व तिची थोडीबहुत छाननीही आपण केली आहे. परंतु मुळापेक्षां कथानकाचा विस्तार करून लिहिण्याची पद्धत कृष्णविजय उत्तरार्धाखेरीज इतरत्र विस्तृत प्रमाणांत कोठेंही दिसून येत नाहीं. मुळांतलें कथासूत्र तेवढें वर्णून पंतांना सर्व ग्रंथ थोडक्यांत आणावयाचे असल्यानें प्रत्येक ठिकाणीं त्यांना संक्षेपच करावा लागला आहे. महाभारत, रामायण, भागवत, हरिवंश हे सर्व ग्रंथ मुळांत बरेच मोठे असल्यामुळें व त्या सर्वांत लांबलचक, पाल्हाळिक वर्णनें, वेदान्तप्रतिपादक भाग वगैरे बराच असल्यानें पंतांनीं त्या ग्रंथांचा सर्वत्र संक्षेपच केला आहे. पण केवळ दशमस्कंधाची स्वतंत्र ग्रंथ या नात्यानें भारतभागवतादि ग्रंथांपेक्षां अगदीं निराळी स्थिति आहे. अगोदर दशमस्कंधाची ग्रंथसंख्या केवळ चार हजार आहे. शिवाय तो ग्रंथ म्हणजे मुळांतच एक अत्युत्तम काव्य आहे. आणखी तिसरी गोष्ट म्हणजे त्या ग्रंथांत लांबलचक, पाल्हाळिक व मुख्य कथेस सोडून असलेला असा पौराणिक भाग फारसा नाहीं. सर्वत्र केवळ श्रीकृष्णाच्या चरित्रकथा गोड वाणीनें सांगितलेल्या भरल्या आहेत.असा सुश्लिष्ट व आटोपशीर ग्रंथ आधारास घेऊन पंतांना स्वतंत्र, विस्तृत काव्य रचावयाचें होतें. तेव्हां या सर्व गोष्टी लक्षांत घेतां पंतांना त्यांच्या इतर काव्यग्रंथांत संक्षेप करण्यास जितकीं कारणें होतीं तितकीं, किंबहुना त्यांपैकीं एकही, कृष्णविजय रचतांना नव्हतें. वेदान्ताचा भाग पंत गाळून टाकतात; पौराणिक वर्णनें त्यांस नकोशीं असतात; धर्माधर्माचें विवेचन त्यांस मराठींत उतरावेंसें वाटत नाहीं; पाल्हाळिक वर्णनाचा त्यांस संक्षेप करावासा वाटतो; या सर्व गोष्टी खऱ्या आहेत; पण या सर्व पंतांना त्याज्य असणाऱ्या गोष्टी अगोदरच दशमस्कंधांत नसल्यामुळें त्याचें रूपांतर करतांना संक्षेप करण्याकडे कटाक्ष ठेवण्याची त्यांस फारशी जरूरी भासली नाहीं. तथापि मूलतःच पंतांची प्रवृत्ति गौरवाकडे नसून लाघवाकडे व आटपशीरपणाकडे आहे. तेव्हां कृष्णविजयामध्यें जरी विस्तार करण्यास त्यांस कशाचीही हरकत आलेली नसली तथापि त्यांच्या स्वाभाविक लाघवप्रवण वृत्तीनें त्यांना कृष्णविजयामध्यें इतर कवींसारखा अफाट विस्तार करूं दिलेला नाहीं अगोदर पूर्वार्धामध्यें आर्यागीतीसारखें वृत्त स्वीकारून व यमकाचा अतिशय काचणारा असा पायबंद बांधून घेऊन काव्यविस्ताराकरितां विशेष हातपाय करणें त्यांनीं आपण होऊनच अशक्य करून घेतलें होतें. उत्तरार्धामध्यें त्यांनीं अगोदर यमकाचा जाचक पायबंद तोडून टाकला, नंतर चार पांच अध्यायांत

आर्यागीतीचा किंचितसा अटकाव करणारा लगामही निरकावून दिला आणि मग आपल्या काव्यवाहास त्यांनीं स्वैरपणें संचार करण्यास मुभा दिली.

७०. अशा तऱ्हेचा एकंदर पंतांच्या प्रवृत्तीचा इतिहास असल्यामुळें इतरत्र त्यांना जी विस्ताराची सवड सांपडलेली नाहीं ती कृष्णविजयाच्या उत्तरार्धा-मध्यें जरा मोठ्या प्रमाणावर मिळालेली असतांना* त्यांनीं विस्तार कोणत्या दृष्टीनें कसकसा केला आहे हें पहाणें मनोरंजक होईल. मागें या विस्ताराच्या बाबतीचा थोडासा उल्लेख केलाच आहे. पण एथें एक दोन उदाहरणें देऊन विवेचन केल्यास अस्थानीं होणार नाहीं. पंत मुळाचा विस्तार करतात म्हणजे कोठेंही कथासूत्रामध्यें स्वतःच्या अधिक गोष्टी घुसडून देतात असें नाहीं. कालि-दासाच्या शाकुंतलांत किंवा भवभूतिच्या उत्तररामचरितामध्यें मुळांत नसलेल्या अनेक गोष्टींची भरती करून कवीनें नवेंच कथानक निर्माण केलें आहे; तशा तऱ्हेचा प्रकार पंत कधीं करीत नाहींत. नाटककारांची गोष्ट एक असो. त्यांना दृश्यकाव्याच्या सोयीकरितां वाटेल तो बदल करण्याची जवळजवळ (कांहीं मर्यादा राखून) मुभाच असते. पण भारवीसारख्या महाकवींनींही मुळांत नस-लेले प्रसंग कथानकांत घालण्याचा प्रघात अवलंबिलेला आहे. किरातार्जुनीयाच्या प्रथम सर्गांत धर्मानें दुर्योधनाचें राज्य कसें चाललें आहे याची बातमी काढण्या-करितां पाठविलेला हेर आपलें काम करून परत येऊन धर्मराजास दुर्योधनाची सर्व हकीकत सांगतो आहे असें वर्णिलें आहे. परंतु हा, हेर पाठविण्याचा व त्यानें आणलेला निरोप ऐकण्याचा प्रसंग महाभारतांत मुळींच नाहीं. तर अशा तऱ्हेचा मुळांत नसलेला प्रसंग नवीन घालून मुळाचा विस्तार पंत कधींही कर-णार नाहींत. केवळ पंतच नव्हे तर आपल्या महाराष्ट्र कवींपैकीं बहुधा कोणताही कवि अशा तऱ्हेनें विस्तार करण्यास धजणार नाहीं. बहुतेक महाराष्ट्रकवि भारत-भागवतादि ग्रंथांतील कथा पवित्र व पावन मानून भक्तिप्रवण चित्तानें त्यांचा मराठींत अनुवाद करण्यास सिद्ध झालेले; त्यांस मूळ कथेंत नसलेले प्रसंग नवीन घालणें व असलेल्या प्रसंगांत वाटेल तो बदल करणें हें कधींच पसंत पडण्याजोगें नव्हतें.

७१. अशा तऱ्हेनें नाहीं तर मग पंत विस्तार करतात तरी कसा? तर मुळांत

* लहान प्रमाणावर त्यांना विस्ताराची सवड भक्तभूषण, सुदामचरित्र, वामन-चरित्र, भीष्मभक्तिभाग्य वगैरे स्फुट प्रकरणांत मिळालेली आहेच.

थोडक्यात सांगितलेल्या गोष्टीच आपल्या काव्यमय वर्णनानें वाढवून, आपल्या कल्पनांनीं खुलवून पंत त्यांना विस्तृत स्वरूप देतात. अशा तऱ्हेच्या विस्ताराचा अनुभव आपणास भीष्मभक्तिभाग्य, भक्तभूषण, वामनचरित इत्यादि प्रकरणांमध्यें आलाच आहे. आतां येथेंही त्याचीं एकदोन उदाहरणें देऊं. कृष्णविजयाच्या ५५व्या अध्यायांतच, शंबरासुराशीं युद्ध करून रुक्मिणीचा पुत्र प्रद्युम्न आकाशमार्गानें द्वारावतींत श्रीकृष्णाच्या अंतःपुरीं येऊन उतरतो, असें वर्णन आहे. तेथें आल्यानंतर 'हा कोण ?' असें म्हणून श्रीकृष्णस्त्रिया, विशेषतः रुक्मिणी, आश्चर्य करतात. इतक्यांत तेथें कृष्ण येतो पण गंमत पहाण्याकरितां तो स्तब्ध राहतो. त्यानंतर नारदमुनि तेथें प्राप्त होतात व हा 'यदुपतिसम नरमणि' खरोखर यदुपतीचाच पुत्र होय असें सांगून सर्वांचा संशय दूर करतात. या वृत्तान्ताचे मूळांत फक्त दोन श्लोक आहेत.—

> एवं मीमांसमानायां वैदर्भ्यां देवकीसुतः ।
> देवक्यानकदुंदुभ्यामुत्तमश्लोक आगमत् ॥
> विज्ञातार्थोऽपि भगवांस्तूष्णीमास जनार्दनः ।
> नारदोऽकथयत्सर्वं शंबराहरणादिकम् ॥ भा. १०.५५.३५,३६.

यापैकीं पहिल्या दीड श्लोकाचा अर्थ पंत खालीलप्रमाणें आणतात.—

> प्रभुप्रियतमा असा मनिं विचार जों ते करी
> स्वतातजननीसह त्वरित तेथ आला हरी।
> कळे परि न तो वदे किमपि विश्वसाक्षी, धरी
> अविज्ञजनरीतिला, तरि चरित्र तें उद्धरी ॥ कृ. वि. ५५.३७.

येथपर्यंत विशेष विस्तार झाला आहे असें म्हणतां येत नाहीं. पण पुढें 'नारद येऊन शंबराहरणादिक सर्व वृत्तान्त सांगतात,' येवढ्या मजकुराचा मोठमोठे आठ श्लोकपर्यंत पंतांनीं विस्तार केला आहे त्यापैकीं नारदांचें सुंदर वर्णन—

> जो लोकत्रितयीं फिरे, स्थिर नसे तटीं, जसा पारद
> स्वातें ध्येयपदींच निश्चळ, भवांभोधींत जो पारद ।
> जो वर्णे गगनोदरीं क्षम दिसे पूर्णेंदु कीं शारद
> श्रीअंतःपुरचत्वरींच उतरे तो सन्मुनी नारद ॥ ३८ ॥

नारदमुनींच्या चरित्रविशेषांचें इतकें थोडक्यांत परंतु मोहक वर्णन मराठींत तर काय पण संस्कृतांतही क्वचितूच आढळेल. असो. येथपर्यंत 'नारदः' या

शब्दावरचें पंतांचें काव्यमय भाष्य झालें. यापुढें ७ श्लोक 'अकथयत्सर्वं शंबराहरणादिकम्' या शब्दांवर भाष्यरूप आहेत. येथें प्रद्युम्नाचा शंबराहरणादिक सर्व वृत्तान्त पुनः नारदाच्या मुखें पंतांनीं बोलविला आहे. त्यांतील दोन तीन श्लोक उदाहरणादाखल येथें घेतों.—

नाभिस्थानासि नेणे मृग हुडकि जसा घेत रानांत वास
तैसें दोघेहि नेणा जवळिहि, हृदयीं या घरा नातवास ।
शौरे, हा वासुदेवात्मज, सुतसुत हा, देवकी, बोळखावा
तो हा, वैदर्भि, जेथें प्रथमचि तुजला लागला बोळ खावा ॥ ३९ ॥
वर्णाकारनिरीक्षणस्मितगतिव्याहार हे सांगती
कीं कृष्णप्रतिबिंब हा, न वळखा, सर्व भ्रमा मागती । (भ्रमा- भ्रमत आहां)
जो निःशंक गृहांत ये इतर तो कैसा ? तुम्ही धीरधी
नेणा हो बळकृष्ण ? कौतुक करा लोकांत चिरंरिधी ! ॥ ४० ॥
म्यां सारें कथिलें रहस्य; न म्हणे निद्रा शरीर क्षण;
जेहें माय तशी रति स्वपतिचें तेथें करी रक्षण ।
झाली आपुलि आपण प्रियपरित्राणार्थ सासू, न ती
स्तुत्यर्हा, परि गौरवा समुचितें, सासू असा, सून ती ॥ ४१ ॥

याप्रमाणेंच आणखी एक लहानसें उदाहरण पारिजातहरण वृत्तान्ताचें आहे. भौमासुराला मारल्यानंतर कृष्ण स्वर्गांत गेला व इंद्राशीं युद्ध करून त्यानें पारिजातवृक्ष हरण करून आणला. मुळांत ही हकीकत याप्रमाणें वर्णिली आहे.

गत्वा सुरेंद्रभवनं दत्वादित्यै च कुण्डले ।
पूजितस्त्रिदशेंद्रेण सहेन्द्राण्या च सप्रियः ॥ भा. १०.५९. ३८ ॥
चोदितो भार्ययोत्पाट्य पारिजातं गरुत्मति ।
आरोप्य, सेन्द्रान्विबुधान्निर्जित्योपानयत्पुरम् ॥ ३९ ॥
स्थापितः सत्यभामाया गृहोद्यानोपशोभनः ।
अन्वगुर्भ्रमराः स्वर्गात्तद्गंधासवलम्पटाः ॥ ४० ॥

ययाच आनम्य किरीटकोटिभिः पादौ स्पृशन्नच्युतमर्थसाधनम् ।
सिद्धार्थ एतेन विगृह्यते महानहो सुराणां च तमो ! धिगाढ्यताम् ! ॥४१॥

ही त्रोटक हकीकत पंतांनीं नऊ मोठमोठ्या श्लोकांत वर्णिली आहे. मुळांतील शेवटच्या श्लोकांत केलेल्या इंद्राच्या अधिक्षेपाचा तर पंतांनीं खूपच विस्तार केला आहे व त्याच्या द्रव्यमदांधतेवर सपाटून तडाखे लगावले आहेत.—

पायींही लोळतांही सतत सुरतरू लेश चिंता न वारी
ती सर्वेष्टप्रदाता हरि हरि सहज प्रार्थितां दानवारी ।
वृक्षा शिक्षा कराया निजगुरुवर ने, भद्र तें हें न मानी
कार्यासाठींच भक्ति स्वरधिप खळ हा दूर पाहे न मानी ॥ १४ ॥
हो सच्छिष्य कुलीन मानव सुर ज्ञानी तऱ्ही लोभला
प्रायः प्राज्ञ म्हणोनि मद्य म्हणति द्रव्य, त्यजी तो भला ।
स्वर्गी इंद्रपदीं यदीयचरणांभोजाश्रयें शोभला
तो हा शक्र पहा, अहा ! शिव शिव ! स्वामींवरि क्षोभला ॥१५॥
सर्वेष्टप्रद आपण प्रभु असे चित्तांत चिंतामणी
हा काय द्रुम मूढमान्य कळवि स्पष्ट प्रतापें धणी ।
स्त्रीचा आग्रह यास्तव प्रिय तिचें व्हाया तिच्या आंगणीं
लावावा इतुकेंचि इंद्र न मनीं, ये प्राण घ्याया रणीं ॥ १६ ॥

याप्रमाणें मुळांतील एका लहान श्लोकाचे तीन मोठे श्लोक पंतांनीं केले आहेत. आणि त्यांत कांहीं विशेष बाहेरचा अर्थ आणला आहे असेंही नाहीं. मुळांतील अर्थ वक्तृत्वपूर्ण व जोरदार वाणीनें खुलवून सांगितला आहे तर पंतांची विस्ताराची प्रवृत्ति अशाच तऱ्हेची सर्वत्र आढळते.

७२. येणेंप्रमाणें विस्ताराविषयीं विचार झाला. असा विस्तारच उत्तरार्धामध्यें बहुतेक ठिकाणीं केला असल्यामुळें मुळाबरहुकूम रूपांतर असें फार करून कोठेंही आलेलें नाहीं हें सांगावयास नकोच. काव्यदृष्ट्या जर पाहिलें तर हा विविध श्लोकात्मक भाग ( अ० ५५ ते ७९ ) पंतांच्या अत्युत्तमांपैकीं जरी नसला तरी उत्तमांपैकीं गणण्याजोगा खास उतरला आहे. सर्वच अध्याय सरस आहेत तथापि प्रद्युम्नचरित ( अ० ५५ ), रुक्मिणीप्रेमकलह ( अ. ६० ), उषा अनिरुद्ध यांचा गांधर्वविवाह ( अ० ६२ ), कृष्णाचा गार्हस्थ्यधर्म व नारदानें केलेलें कृष्णलीलाविलोकन ( अ० ६९ ), हे अध्याय सांसारिक सुखामध्यें जे विशेष रसज्ञ आहेत त्यांना पसंत पडतील. वीररसाची गोडी बाळगणारे जे असतील त्यांना बाणासुरयुद्ध ( अ० ६३ ), बलदेवविजय ( अ० ६८ ), साल्वाचा वध व त्याच्या विमानाचा नाश ( अ० ७७ ), हे विशेष प्रिय होतील. स्यमंतकोपाख्यान व कृष्णजांबवानांचें युद्ध ( अ० ५६ ), बलरामाच्या तीर्थयात्रा ( अ० ७९ ) हेही भाविकांस व अद्भुतरसप्रियांस पसंत होण्याजोगे अध्याय आहेत.

७३. कृष्णविजयाच्या ७९ व्या अध्यायापर्यंत विविधश्लोकात्मक रचना आहे-त्याच्यापुढील ८०-९० या अकरा अध्यायांत पंतांनीं श्लोकांचाही त्याग करून आपल्या आवडत्या आर्यावृत्ताचा अवलंब केला आहे. येथें पंतांच्या श्लोकरचने-विषयीं थोडा विचार करून मग कृष्णविजयाच्या शेवटच्या आर्याबद्ध विभागा-कडे आपण वळूं. श्लोकरचनेचें नांव काढलें कीं वामनपंडितांची आठवण झाल्या-खेरीज राहत नाहीं. इतकें श्लोकरचनेशीं त्यांनीं आपलें नांव अजरामरपणें बद्ध करून ठेवलें आहे. आणि हें खरोखर योग्य असेंच झालें आहे. आर्यारचनेचे मोरोपंत जसे अगदीं सार्वभौम सम्राट् होत तसे जरी पंडित श्लोकरचनेचे 'एक-मेवाद्वितीय' अधिपति नसले तरी आपल्या गुणसमुच्चयानें सर्व मराठी कवींत श्लोकरचना अशी त्यांचीच चमकते यांत शंका नाहीं. आजपर्यंत हंस, ओक, पांगारकर इत्यादि रसिकांनीं पंडितांच्या श्लोकरचनेशीं पंतांच्या श्लोकरचनेची तुलना करून सोज्वळ व सलगीचा भक्तिभाव, वर्ण्यविषयाशीं तादात्म्य, वर्णनाचा मधुर विस्तार करण्याची हातोटी वगैरे पंडितांच्या कवितेंत दिसून येण्याऱ्या गुणांची तारीफच केली आहे. याच्या उलट पंतांच्या श्लोकरचनेंतही प्रौढपणा, भारदस्तपणा, अलंकारसौष्ठव, मोहक कल्पनाविलास, भाषाशुद्धि इत्यादि गुण असून त्यांची श्लोकरचनाही कांहीं कमी दर्जाची नाहीं असें पांगारकरादि रसिक-श्रेष्ठांनीं दाखवून दिलेंच आहे. पंडितांची कविता वाचूं लागलें कीं त्यांचाच 'सुश्लोक' सर्वोत्तम वाटावयास लागतो; त्याला बाजूस ठेवून पंतांच्या श्लोक-रचनेचें आलोचन करूं लागावें तों त्यांचाच श्लोक अगदीं अप्रतिम असा भासूं लागतो! असें कांहीं भूल पाडणारें माधुर्य दोघांच्या श्लोकांत आहे. असो. पण येथे अशा सामान्य विषयावर फारसें लिहिण्याचा उद्देश नाहीं. इतरांनीं उल्लेख केलेला नाहीं अशी एक लहानशी गोष्ट विशेष रीतीनें सर्वांच्या नजरेस आणाव-याची आहे. पंतांची श्लोकरचनेमधील सर्वांत आवडतीं वृत्तें म्हणजे शार्दूलविक्री-डित व स्रग्धरा हीं होत. श्लोकरचनेकडे पंत वळले म्हणजे त्यांना लांबलचक वृत्तेंच फार योजावींशीं वाटत. शार्दूलविक्रीडित व स्रग्धरा हीं अतिशय मोठीं वृत्तें आहेत. पहिलें ७६ अक्षरांचें असून दुसरें तर ८४ अक्षरांचें आहे. केव्हां केव्हां येवढीं मोठीं वृत्तेंही त्यांना पुरेशीं न वाटून दंडकासारख्या १२० किंवा जास्त अक्षरांच्या वृत्तांचीही त्यांना योजना करावीशी वाटते. (पहा; सुदाम. ५३ व ७३). अगदीं कमी म्हणजे ६८ अक्षरांच्या शिखरिणी पृथ्वी वगैरे

वृत्तापर्यंत ते क्वचित् उतरतात. त्याच्या खालीं बहुतकरून नाहींच. मोठ्या वृत्तामध्यें वर्णनाला मोकळेपणा सांपडतो, जोरदार भाषणें त्यात उत्कृष्ट रीतीनें वठवितां येतात, पुष्कळ कथाभागाचें एकदम वर्णन करतां येतें, अशा तऱ्हेच्या कांहीं सोयी असल्यामुळें बहुधा पंतांनीं मोठीं वृत्तेंच आपल्या काव्यासाठीं पसंत केलीं असावीं. परंतु इतर कोणच्याही कवींची अशी गोष्ट नाहीं. संस्कृतांत अनेकसर्गात्मक जीं महाकाव्यें आहेत त्यांत सर्वत्र लहान वृत्तेंच योजिलेलीं आढळतात. फार झालें तर वसंततिलका या ५६ अक्षरी वृत्ताची योजना क्वचित् करण्यांत येते; पण यापलीकडे कोणी जात नाहीं. प्रत्येक सर्गाच्या शेवटीं मात्र शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, यांसारख्या लांब वृत्तांतले एक दोन श्लोक घालण्यांत येतात. मराठींतही पाहिलें तरी वामनपंडित किंवा त्यांच्यासारखे श्लोकरचना करणारे इतर कवि हे बहुधा इंद्रवज्रा, उपजाति, वंशस्थ, द्रुतविलंबित वगैरे (११, १२ अक्षरी चरणांचीं) हलकीं व लहान वृत्तेंच फार करून काव्यासाठीं योजतात, असें आढळून येतें. फार झालें तर वसंततिलका व मालिनी यांची योजना होते व क्वचित् केव्हांतरी शिखरिणी इत्यादि लांब वृत्तांची. संस्कृतामध्यें मेघदूत, गंगालहरी वगैरे सारखीं खंडकाव्यें तरी मंदाक्रान्ता, शिखरिणीसारख्या वृत्तांत सरसास येतात. पण मराठींत तसें सुद्धां होत असल्याचें दिसत नाहीं. तेव्हां सर्वत्र लांब लांब वृत्तांत रचना करण्याची पंतांची ही केवळ अगदीं चमत्कारिक व अनन्यसामान्य प्रवृत्ति म्हणावी लागते. साधारणपणें तोच विषय असलेल्या व कांहींशी समान श्लोकसंख्या असलेल्या काव्यांचीं उदाहरणें घेऊन पाहू. कृष्णविजयांतील जरासंधवधाचे ७१, ७२ व ७३ हे अध्याय एकत्र केले तर त्यांची श्लोकसंख्या ८४ होते. या ८४ श्लोकांपैकीं फक्त ६ श्लोक लहान वृत्तांतील असून बाकीचे ७८ मोठ्या वृत्तांतील (बहुतेक शार्दूलविक्रीडित व स्रग्धरा) आहेत. आतां याच कथानकावर वामनपंडितांचें ६७ श्लोकांचें 'मुकुंदविलास' नामक प्रकरण आहे. त्यांत फक्त ७ श्लोक मोठ्या म्हणजे शिखरिणी वृत्तांतील असून शार्दूलविक्रीडितांतील तर मुळींच नाहींत. 'द्वारकाविजय' नामक वामनपंडितांचें नारदगार्हस्थ्यदर्शनाच्या अध्यायावर खंडकाव्य आहे. त्याचे एकंदर २५० श्लोक असून मोठ्या वृत्तांतले (शिख० व शार्दूल०) २५ आहेत. बाकीचे सर्व उपजाति, वंशस्थ वगैरे लहान वृत्तांतील आहेत. त्याच कथानकावरील मोरोपंतांच्या ६९ व्या अध्यायांत १४ श्लोकांपैकीं

फक्त एक कायतो छोट्या वृत्तांत आहे. हीं उदाहरणें कांहीं मुद्दाम निवडून दिलेलीं नसून सामग्र्यानें कृष्णविजयाकडे पाहिलें तरी हाच प्रकार दिसून येतो. कृष्णविजयांतील एकंदर श्लोकमय रचनेची संख्या ८३७ आहे. त्यांपैकीं ६०७, म्हणजे एकंदर संख्येच्या तीनचतुर्थांश श्लोक केवळ शार्दूलविक्रीडित व स्रग्धरा या वृत्तांतील आहेत. याशिवाय शिखरिणी, पृथ्वी इत्यादि वृत्तांतील श्लोकांची गणना निदान १०० तरी होईल. तेव्हां कृष्णविजयांतील श्लोकरचना बहुतेक सर्व मोठ्या वृत्तांतील आहे असें म्हणण्यास मुळींच हरकत नाहीं.

आतां नेहमींच्या संप्रदायाविरुद्ध वृत्तयोजना करण्याची जी ही पंतांची प्रवृत्ति दिसून येते ती काव्यसौंदर्याच्या दृष्टीनें विशेष उपयुक्त आहे असें म्हणवत नाहीं. कदाचित् कवीला मोठ्या वृत्तांत रचना करणें जास्त सोपें जात असेल. पण वाचकाला लहान वृत्तेंच जास्त पसंत पडतात. लांबलचक वृत्तें वाचण्याचा लवकरच कंटाळा येतो. लहान वृत्तांत कोमलता व माधुर्य हीं जास्त प्रमाणांत आणतां येतात व काव्याचें सौंदर्य श्रवणमधुरतेवर पुष्कळसें अवलंबून असल्यामुळें लहान वृत्तें नेहमीं योजणेंच जास्त इष्ट होय यांत शंका नाहीं. मोठीं वृत्तें एकंदरीनें पहातां क्वचित् प्रसंगींच शोभतात व तशींच तीं योजण्याचा प्रघात आहे. शिवाय एका पद्यांत एक कल्पना किंवा एकच गोष्ट गोवण्याची कविजनांची रीत आहे. लहान पद्यांतच अशी कल्पना आटोपशीरपणानें गोवली जाते. मोठ्या श्लोकांची योजना केली म्हणजे, त्यांत पाल्हाळास व विस्तारास बराच अवकाश सांपडण्यासारखा असल्यामुळें, निष्कारण शब्दांचें अवडंबर माजून 'बहुवचनमल्पसारं' अशा कोटींत कविता जाण्याचा फार संभव असतो.

७४ कृष्णविजयाच्या ८० ते ९० अध्यायांच्या शेवटच्या आर्याबद्ध विभागाकडे आतां वळण्यास हरकत नाहीं. वृत्ताप्रमाणेंच येथें पंतांची रचनाशैलीही पुनः एकदां बदललेली दिसते. आतांपर्यंतच्या श्लोकरचनेचा ओघ जोरदार, भारदस्त व प्रौढ असा होता. यापुढची आर्यारचना अत्यंत सौम्य, कोमल, प्रेमळ व रसिकाच्या गळीं पडून त्याचें मन वश करून घेणारी आहे. हे पंतकवितेचे अकरा अध्याय ज्यानें वाचले आहेत तो पंतांच्या काव्यरसमाधुरीची आठवण जन्मभर विसरणार नाहीं. ऐंशीव्या अध्यायापासून पंतांच्या आर्येस जी कांहीं बहार चढत चालली आहे, ती ८७, ८८ अध्यायांपर्यंत तशीच चढत जाते व आर्यांच्या कोमल नादानें व त्याहूनही मधुर व प्रेमळ अर्थानें मनुष्य वेडावून

जातो. या अकरा अध्यायांत पंतांनीं मनास वाटेल तसा विस्तार केला आहे. वेदस्तुतीचा ८७ वा अध्याय गाळून त्याबद्दल ८६ व्या अध्यायांतील कथानकाचे दोन भाग करून त्याचे दोन अध्याय केले आहेत.

७५. प्रथम ८० व ८१ या अध्यायांत पंतांनीं सुदामदेवाची कथा वर्णन केली आहे. ध्रुव किंवा प्रह्लाद यांच्या कथेप्रमाणेंच सुदामदेवाची प्रेमळ कथा आमच्या जुन्या कवींची अत्यंत आवडती होय. पंतांना देखील ही फार प्रिय होती असें दिसतें. कारण समग्र पंतकाव्यांत हिचें चारदां वर्णन आलें आहे. पैकीं कृष्णविजयांतील एक, मंत्रभागवतांतील दुसरें व बाकीचीं दोन स्फुट प्रकरणें, एक श्लोकबद्ध 'सुदामचरित' या नांवाचें, व दुसरें आर्याबद्ध 'पृथुकोपाख्यान' या नांवाचें, अशीं आहेत. या सर्वांमध्यें कृष्णविजयांतलि सुदामदेवाची कथा हीच विस्तारानें व सौंदर्यानें श्रेष्ठ आहे. मंत्रभागवतांतील सुदामदेवाची हकीकत अगदींच त्रोटक—केवळ १४ आर्या—असून धावत्या पद्धतीनें लिहिलेली आहे. ती आहे तेवढीच जरी मधुर वठलेली असली तरी काव्यसौंदर्याचा परिपाक साहजिकच इतक्या थोडक्या अवकाशांत पूर्णपणें उतरूं शकला नाहीं. श्लोकबद्ध 'सुदामचरित्र' साधारण बऱ्यापैकीं वठलें आहे. तथापि याच्याचसारखें श्लोकबद्ध जें भक्तभूषण नामक अंबरीषाख्यानावरलि वहारीचें प्रकरण आहे त्याच्याशीं याची तुलना होण्याजोगी नाहीं. पंतांचे ते लांबलचक श्लोक व विस्तृत वर्णनें जरा कंटाळवाणींशींच भासतात. यांत एकंदर ८८मोठमोठ्या वृत्तांचे श्लोक असून सुमारें ८।९श्लोकांचें एक अशीं कथाभागास अनुसरून दहा छोटीं प्रकरणें केलीं आहेत. मुळांतील सुदामकथेचे श्लोक ८६ च आहेत तथापि पंतांचीं वृत्तें मोठीं असल्यानें त्यांच्या काव्यांत मुळाचा दुप्पट विस्तार झाला आहे. या ' सुदामचरित्रां ' त, सुदामदेव आपल्या घरीं आल्यानंतर त्यास त्याची स्त्री, ' कृष्णाकडे एकंदर काय हकीकत झाली ? ' असा प्रश्न विचारीत असून, सुदामदेव त्याचें उत्तर देत आहे असा स्वरूपांत कथाभाग वर्णन केला आहे ही कल्पना पंतांनीं मोठी सुंदर केली आहे; तिच्यामुळें भागवतकारांनीं जी हकीकत तिऱ्हाईतपणें वर्णिली आहे तीच सुदामदेव आपल्या स्वतःच्या दृष्टीनें वर्णीत असतां त्यांत कसकसा मधुरिमा येतो तो आपणास येथें पहावयास मिळेल असी अपेक्षा वाचकाच्या मनांत उत्पन्न होते. पण दुःखाची गोष्ट ही कीं वाचकाची ही अपेक्षा येथें मुळींच तृप्त होत नाहीं. भागवतकारांनीं सांगितलेली हकीकत ' तो गेला ' असा तृतीय पुरुषी प्रयोगाऐवजीं

" मी गेलों ' असा प्रथम पुरुषी प्रयोग घालून जशीची तशी पंतांनीं सुदामाच्या तोंडून वदविली आहे. त्यांत वक्ता व श्रोता यांना अनुकूल असा कांहीं बदल केला नाहीं. वस्तुतः येथें पंतांनीं स्वतःची कल्पना चालवून तसा कांहीं बदल अवश्य करावयास पाहिजे होता. असो. या सुदामचरितामध्यें व कृष्णविजयाच्या ८०, ८१ अध्यायामध्यें कित्येक ठिकाणीं बरेंच विचारसाम्य व वर्णनसाम्य दिसून येतें. कदाचित् दोन्हींही प्रकरणांचा रचनाकाळ एकमेकांच्या जवळचा असूं शकेल. तथापि दोघांच्या काव्यसौंदर्याचा दर्जा बराच निराळा आहे.

सुदामकथेवरील दोन काव्यांचें निरीक्षण झालें. तिसरें काव्य ' पृथुकोपाख्यान ' नामक स्फुट प्रकरण होय. याच्या ८८ साक्या आहेत: म्हणजे हें जवळ जवळ मुळाइतकेंच विस्तृत काव्य झालें आहे व बहुतेक ठिकाणीं मुळास अगदीं अनुसरूनच लिहिलें आहे. तथापि वर्णनाची भाषा अगदीं साधी व गोड असल्यामुळें व वर्णन करणाऱ्या पंतांचें अंतःकरणच त्या कथेच्या सौंदर्यांत रंगलें असल्यामुळें या आख्यानाचा परिपाक फार उत्कृष्ट उतरला आहे. कृष्णविजयाच्यामधील जरा जास्त लांबलेल्या सुदामकथेचा आस्वाद घेण्याइतका धीर ज्यांना निंघण्यासारखा नसेल त्यांना पंतांच्या वर्णनाची गोडी याच आख्यानांत पूर्णपणें कळून घेण्यास कांहीं हरकत नाहीं प्रथमच मुळाच्या आधारें वर्णन करण्याची खुबी पहा. सुदामाच्या पत्नीचें वर्णन—

मूळ—पतिव्रता पतिं प्राह म्लयता वदनेन सा ।
दरिद्रा सीदमाना सा वेपमानाभिगम्य च ॥ भा. १०. ८०. ८.

पंतकृति—ते एकदा पतीच्यापाशीं बहु भीत भीत गेली ।
अवाङ्मुखी कंपिततनु साध्वी कर जोडुनियां ठेली ॥ पृथु. ३.

तथापि पंतांनीं मुळांत स्वतःच्या कल्पनांची भर घातली नाहीं असें नाहीं. पहा—

हरिला हृदयीं चिंतित जातां मार्ग आहुला थोडा ।
बहुधा केला हरिसंदर्शनकामप्रेमा घोडा ॥ पृथु १४ ॥

हरिदर्शनाविषयींची परमप्रीति हाच जणूं काय घोडा, त्यावर आरूढ झाल्यामुळें सुदामदेवानें मार्ग तेव्हांच आक्रमण केला ही कल्पना फारच सहृदयतेची आहे. पुढें सुदामा कृष्णाच्या अंतःपुरांत येऊन पोंचला तेव्हांच्या प्रेमळ मित्रांच्या भेटीच्या प्रसंगाचें मधुर वर्णन—

झडकरि उठला दयालु माधव वस्त्रादिक नावरितां ।
धावत आला पुढें, रमेला सांडुनि, दासाकरितां ॥ पृथु. २३ ॥
' ये ये बंधो ' ऐसें सद्गद बोलत धांवत आला ।
कडकडुनी भुजयुग्में स्वसखा हृदयीं धरिता झाला ॥ पृथु. २४.

यापुढील सर्व वर्णनही असेंच बहारीचें आहे. सर्व मनोरथ संपूर्ण होऊन कृष्णाची अगाध लीला कळून आल्यानंतर प्रसन्नचित्त होऊन सुदामा म्हणतो—

सौहृद मैत्री सख्य दास्य त्या देवाचेंचि असावें ।
जन्मोजन्मीं तद्भजनाचें प्रेम मनांत वसावें ॥ पृथु. ८४.

या पृथुकोपाख्यानाशिवाय सुदामचरित्रास अनुलक्षून पदाच्या चालीवर रचलेल्या व अजून अप्रसिद्ध असलेल्या कांहीं साक्या पंतांच्या हस्तलिखित संग्रहांत सांपडल्या त्या पुढें परिशिष्ट १ मध्यें दिल्या आहेत.

कृष्णविजयांतील सुदामचरित्र हें बाकीच्या तीहींपेक्षां सरस आहे. हें अ० ८० व ८१ यांत आलेलें असून दोन्ही अध्यायांची मिळून आर्यासंख्या १९४ आहे. म्हणजे मुळाच्या दुपटीपेक्षां याचा अधिक विस्तार आहे असें झालें. व तितका विस्तार आहे ही कवींच्या व वाचकांच्या मोठ्या फायद्याचीच गोष्ट झालेली आहे. कारण कवीला आपलें सर्व कल्पनासामर्थ्य खर्चून कथाभाग सजवण्यास त्यामुळें अवकाश झाला व वाचकालाही कवीच्या रमणीय वचःसुधेचा आतृप्ति आस्वाद घेण्याची सोय झाली. प्रस्तुत सुदामकथा ही मुळापेक्षां विस्तारलेली असल्यानें मुळास अगदीं धरून लिहिलेली नाहीं. अर्थात् स्वतःच्या कल्पनेस वाटेल तसा व वाटेल तितका स्वतंत्र संचार करण्यास पंतांनीं मुभा दिली आहे. सर्वच वर्णन सुंदर साधलें आहे. तथापि त्यांतल्या त्यांत सुदामाच्या श्रीकृष्णानें केलेल्या सत्काराचें व तो सत्कार पाहून चकित होऊन आश्चर्योद्गार काढणाऱ्या कृष्णपत्न्यांचे वर्णन ( आर्या ३७-४१ ); व रात्रभर वादळांत फिरल्यानंतर सकाळीं जेव्हां सांदीपनी गुरु भेटले तेव्हां त्यांनीं केलेला उपदेश ( अ० ६२-७१ ); या दोन गोष्टी पहिल्या अध्यायांत अप्रतिम वठल्या आहेत. ते प्रेमळ आचार्य शिष्यांच्या भक्तीनें प्रसन्न होऊन आशीर्वाद देतात. —

भजहूनि त्रिजगांत प्रख्यात यशें असाल, कविराजे ।
गातिल, कां मत्करुणार्थेंचि लोकीं न बालक विराजे ? ॥ ७० ॥

मी बहु न प्रकट जगीं म्हाक तुम्ही सर्वथा, न क्यात ।
तात क्षीरधि, परि हरचूडारूढ प्रसिद्ध तज्जात ॥ ७१

कर्मी वसा, नसो परमर्मी लोचन, असा दयाधर्मी ।
नर्मीहि मृषोक्ति न यो, शर्मी नांदा, शिरा क्षमावर्मी ॥ ६९. कृ वि. ८०.

ऐंशीव्या अध्यायापेक्षां ८१ व्या अध्यायांत आर्येला जास्त तेज चढून जास्त कोमलपणाही आलेला आहे. मंत्रभागवतांतील आर्येइतकी सफाईदार आर्या अजून वठत नाहीं. वर्षानुवर्षे अक्षर घटवलेल्या मनुष्याचें लिहिणें ज्याप्रमाणें सहज वळणदार येतें त्याप्रमाणें मंत्रभागवतांतील आर्या अगदीं घटलेली व वळणदार आलेली आहे. कृष्णविजयामध्यें किंचित् कां होईना पण अजून प्रयत्न दृग्गोचर होतो. बाकी सौंदर्यांत व प्रेमळपणांत अणुमात्रही कमी नाहीं. असो. कृष्णाच्या घरीं सुदामदेवाचा जो अपूर्व सत्कार झाला व प्रेमानें गहिंवरून येऊन त्याची जी पाठवणी कृष्णानें केली त्याचें फार सुंदर वर्णन आर्या २० ते ३५ पर्यंत आलें आहे. त्यापुढें सुदामा घरीं परत जात असतां कृष्णानें आपल्याला द्रव्य कां दिलें नाहीं याबद्दल त्याच्या मनांत आलेले विचारतरंग विस्तृतपणें वर्णिले आहेत. त्यानंतर स्वतःची सुवर्णनगरी पाहून प्रथम त्याला वाटलेलें आश्चर्य ( ६०–७४ ), पुढें त्याचें पौरजनांनीं केलेलें स्वागत ( ७५–७९ ), पत्नीची व त्याची भेट ( ७९–८९ ), त्याच्या रत्नखचित प्रासादाचें वर्णन ( ९०–१०३ ), व शेवटीं सुदामदेवाचे प्रेमळ उद्गार ( १०४-११९ ), इतक्या विषयांचें मनोहारि वर्णन या अध्यायांत आलें असून तें अतिशयच बहारीचें वठलें आहे. कल्पनासौष्ठव, भाषेची कोमलता, भावाची प्रेमळता व अलंकारांची रचना हे सर्व गुण येथें एकत्रित झालेले दिसून येतात. उतारे देणें अशक्यच आहे, तरी पण सुदाम्याच्या भक्तिपूर्ण उद्गारांपैकीं शेवटच्या दोनच आर्या देतों:—

महत्त पृथुकतंडुलकण कृपणपणें पडों न दे वेंची ।
जन्मोजन्मींहि असो मज एक प्रेम त्या सख्याचेंची ॥ ११०

कृष्णा सख्या उदारा सदया, पद या मनांत राहों दे ।
पाहों दे मग हा द्विज कर्मफळें, भवनदींत वाहों दे ॥ ११६

७६. यापुढील ८२ वा अध्याय, स्यमंतपंचकीं सूर्यग्रहणपर्वाचे वेळीं मैदळी जमली असतां तेथें सर्व यादव व गोकुळवासी नंदादि गोप यांच्या भेटीचा

प्रसंग झाला, त्याच्या वर्णनपर आहे. तोही फार प्रेमळ उतरला असून मुळापेक्षांही त्यांत गोडी जास्त आली आहे.

७७. याच्या पुढचा ८३ वा अध्याय विवाहकथाकथनाचा असून, त्यांत श्रीकृष्णाच्या अष्टनायिकांनीं व इतर स्त्रियांपैकीं एकीनें आपल्या विवाहाच्या कथा द्रौपदीस तिनें विचारल्यावरून सांगितल्या आहेत, असें वर्णन आहे. मुळांत सर्व कृष्णस्त्रियांच्या विवाहकथा अत्यंत त्रोटक रीतीनें एकेका श्लोकांतच सांगितल्या आहेत. पण पंतांनीं येथें फार मार्मिकपणा दाखवून सर्व स्त्रियांच्या विवाहाच्या कथा त्यांच्या तोंडून अति विस्तारानें वदविल्या आहेत. त्यांतल्या त्यांत रुक्मिणीची विवाहकथा तिच्या तोंडून ९१ आर्यांत वदविली असून ती अत्यंत बहारीची वठली आहे. बायकांच्या तोंडीं शोभेल अशी भाषा लिहिण्यांत व बायकांचें मनोविकार त्यांच्याच तोंडून अकृत्रिम रीतीनें वदविण्यांत पंत फार कुशल होते. त्याप्रमाणें ही रुक्मिणीविवाहकथा सर्वस्व स्त्रियांच्या बोलींनें सजविलेली व स्त्रियांना पटतील अशा उद्गारांनीं भरलेली असल्यामुळें हिला एक प्रकारचें स्वभावसहज माधुर्य प्राप्त झालें आहे. बाकी रुक्मिणीस्वयंवराची जी कथा पूर्वी अ० ५२, ५३ मध्यें आलेली आहे तीच आधारास घेतली असून तिच्यांत कांहीं फरक केलेला नाहीं.

अशाच प्रकारचें पंतांचें आणखी ' रुक्मिणीगीत ' म्हणून एक लहानसें अभंगरचित काव्य आहे. सावित्रीकथा, सीतावनवासकथा व रुक्मिणीहरणकथा या तीन अत्यंत रमणीय व आर्यस्त्रियांस नित्य पूज्य अशा कथांवर स्त्रियांनाच म्हणण्यास योग्य अशा अभंग उर्फ ओवी वृत्तांत पंतांनीं तीन गीतें रचलीं आहेत. तीं स्त्रियांना म्हणण्यास फार योग्य वठलीं आहेत. सावित्रीगीतामध्यें पंतांनीं स्वतःच सावित्रीची कथा वर्णिली आहे. पण सीतागीत व रुक्मिणीगीत या दोहोंमधील कथाभाग अनुक्रमें सीता व रुक्मिणी यांच्या तोंडूनच वदवला आहे. सावित्रीगीत सर्वांत उत्कृष्ट, गंभीर व करुणरसपूर्ण झालें आहे. त्याच्या खालोखाल सीतागीतही सुंदर साधलें आहे. रुक्मिणीगीत या दोन्हींपेक्षां जरी कांकणभर गुणांत उणें असलें तरी एकदरीनें तेंही सौंदर्यांत कमी नाहीं. कृष्णविजयामधील प्रस्तुतच्या ८३व्या अध्यायांत सांगितलेल्या रुक्मिणीस्वयंवरकथेमध्यें व या रुक्मिणीगीतामध्यें पुष्कळ ठिकाणीं बरेंच साम्य दिसून येतें. दोहोंमध्येंही रुक्मिणीनें कृष्णास पाठविलेली पत्रिका गाळली असून तिचा निर्देश मात्र केला आहे. शिवाय

शब्दरचनेचें व कल्पनांचें साम्य असलेलीं पुढील ठळक स्थळें आढळतात.—

(१) पुसतां मी सांगें अश्रुहेतु तेल । उत्तरीं गुंतेल नव्हे कधीं ॥ रु. गी. ३१.
होय सर्वांत मदुक्तें अश्रुप्रति हेतु बापुडें तेल ॥ कृ. वि. ८३. ३०.

(२) माय दे लावूनी देहाला हळद । हे हालाहलद न तो पाप ॥ रु. गी. ३९.
गळ विलेपन वाटे, लाविति अंगास जी हरिद्रा तें । कृ वि. ८३. ३९.

(३) न आले त्या दिशीं मध्ये रात्रि मात्र । चिंताज्वरें गात्र तापविलें ॥रु.गी.३४
त्या रात्रीं लागला नाहीं माझा डोळा । प्राण कंठीं गोळा झाले होते ॥३५.
चिंताज्वरांत रात्रौ माझा नाहींच लागला डोळा ।
जायासाठीं कंठीं शतवार प्राण आहले गोळा ॥ कृ. वि. ८३. ३५.

(४) या कन्यारत्नाला केली सेनापेटी । अंबिकेच्या भेटी नेते झाले ॥रु. गी. ५६
स्वसखीधात्रीजननीविप्रस्त्रीमंडळी न ती, पेटी ।
तींत मणी मी नेलें शुभविधिनें श्रीशिवेचिये भेटी ॥ कृ. वि. ८३. ५८.

(५) वीर अभीमुखप्रहारें जे मेले । अप्सरांनीं नेले वरूनी ते ॥ रु गी. ५७
स्वर्गाधि अप्सरांनीं नेले भटमणि विचित्र तें काय । कृ. वि ८३. ६१.

(६) नाचले त्या रणरंगांत कबंध । कीं पातकबंधमुक्त झाले ॥ रु. गी. ६८.
तुटलीं असतांहि शिरें डोलति नाचति रणांगणीं वीर ।
प्रभु सांगे मज कीं, 'जनिसाफल्यें मुदितचित्त हे धीर' ॥कृ.वि. ८३. ८९.

आणखी कांहीं ठिकाणीं रुक्मिणीगीतांतील साधें वर्णन घेऊन तें आपल्या कल्पनाविलासानें सजवून पंतांनीं कृष्णविजयांत समाविष्ट केलें असल्याचें दिसून येतें. उदा०—

(१) जों ऐसें मन्मन चिंतेंत रहाटे । स्फुरला पहाटे डावा बाहु ॥ रु. गी. ४६
याच डाव्या बाहूच्या स्फुरणावर कृष्णविजयांत पंतांनीं केलेली उत्प्रेक्षा—
तों प्रियकंठीं आपण पडोनि हेही सुखांत पाडावा ।
या भावेंचि स्फुरली करि माझी भुजलता कृपा डावी ॥ कृ. वि. ८३. ४०.

वर दिलेल्या समानार्थक स्थलांवरून व विशेषत: रुक्मिणीगीतांतील वर्णनें कृष्णविजयांत कल्पनांनीं सजवून वाढविलेलीं दिसतात यावरून रुक्मिणीगीत पहिल्यांदा लिहिलेलें असून त्याचीच सुधारून वाढविलेली आवृत्ति पंतांनीं कृष्णविजयांत काढली असावी हा पांगारकरांचा कयास बरोबर दिसतो. रुक्मिणीनें कृष्णाला माळ घातली त्या प्रसंगाचें सुंदर वर्णन—

प्रकटले स्वामी, लाजल्यें मी बाळा । सखी म्हणे 'माळा घालीं आधीं' ६६
ज्यांच्या तेजें रवीशशी माळवले । ते घ्याया लवले माळा माझी ॥ ६७
धरूनियां करीं स्यंदनीं वाहिलें । हें प्रेम पाहिलें कोठें कोणीं ! ॥६८॥
बैसवूनीं अंकीं उराशीं धरिलें । मज उद्धरिलें चिंतेंतूनी ॥ ६९

पहिल्या ओवींत सखीच्या वाक्यांतील 'आधीं' या शब्दामध्यें फार खुबी आहे. 'लाजण्या बिजण्यांत वेळ घालवायला सध्यां मुळींच सवड नाहीं. सध्यांची वेळ घाईची व आणीबाणीची आहे अगोदर माळ घालून आपलें कार्य उरकून घे. मग लाजण्यामुरकण्याला पुष्कळ वेळ आहे.' असा अत्यंत समुचित अर्थ आधीं या शब्दानें व्यक्त होत आहे.

केवळ मुलीबाळी व स्त्रिया यांच्या उपयोगाकरितां रचलेल्या सीतागीत, सावित्रीगीत व रुक्मिणीगीत ह्या गाण्यांमध्यें एकच लहानसा दोष दिसून येतो. तो म्हणजे स्त्रियांच्या तोंडीं न शोभणाऱ्या व स्त्रियांस न समजण्यासारख्या अवघड संस्कृत शब्दांची कित्येक ठिकाणीं केलेली योजना हा होय. रुक्मिणीगीतामध्येंच, साध्वस, घटज ( अगस्त्य ), और्व ( समुद्रांतील अग्नि ), मंदराग ( मंदरपर्वत ), तरणि, हे या दृष्टीनें आक्षेपार्ह शब्द आढळतात. मृषा, प्राज्य समाजिला ( सन्मानिला ), कीनाश, कृष्णसार असे शब्द बाकीच्या दोन्ही गीतांतही आढळतात. हा क्षुल्लक दोष सोडून दिल्यास हीं गीतें केवळ अमृतमयच आहेत.

पंतांच्या काव्यसमूहांत रुक्मिणीविवाहकथा एकंदर पांच ठिकाणीं आली आहे. कृष्णविजयाच्या ५२ व ५३ अध्यायांत मुळांतील कथाभागास अनुसरून प्रथम हा प्रसंग वर्णिला आहे त्याचप्रमाणें मंत्रभागवत दशम उत्तरार्धामध्येंही कथानकाच्या ओघांत रुक्मिणीविवाहकथा वर्णिली आहेच. मात्र तेथें ती मंत्रभागवतच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणे अगदीं त्रोटक रीतीनें वर्णिली आहे. कथेच्या ओघानें आलेल्या या वर्णनाशिवाय मुळांत जेथें सविस्तर कथा सांगितलेली नाहीं अशा कृष्णविजयाच्या ८३ व्या अध्यायामध्यें पंतांनीं ती कथा विस्तीर्ण रीतीनें वर्णिली असून तिचें आपण वर थोडेसें विवेचन केलेंच आहे. ह्याच अ० ८३ मध्यें आलेला, सूर्यग्रहणपर्वसमयीं परस्परांच्या भेटी झाल्या असतां द्रौपदीनें विवाहकथा विचारल्याचा धागा घेऊन पंतांनीं 'रुक्मिणीगीत' रचलें आहे. याप्रमाणें भागवतांतील कथेवर चार काव्यें झालीं. पांचवी रचना हरिवंशांतील रुक्मिणी-

विवाहकथेवर झाली असून ती पंताच्या हरिवंशांत यथास्थल आलेली आहेच; व तिच्या व भागवताच्या कथेमध्यें फारसा फेर नाहीं. असो; या सर्व निरनिराळ्या पांच प्रकरणांमध्यें कृष्णविजयाच्या ८३ व्या अध्यायामधील कथावर्णन निःसंदेह श्रेष्ठ आहे. सात्विक प्रेमळपणानें व कल्पनासौष्ठवानें तें सर्व रसिकांस मोहून टाकील यांत संशय नाहीं.

७८. यापुढील कृष्णविजयाचे ८४ ते ८८ अध्याय अतिशयच मनोहर असून ते वाचकांनीं मुळांतच वाचून पहावे. त्यांतील उतारे घेऊन सौंदर्याचें प्रदर्शन करणें केवळ अशक्य आहे. चौऱ्याऐंशीव्या अध्यायांत वसुदेवानें केलेल्या यज्ञाचें वर्णन आलें असून ८५ व्या अध्यायांत देवकीच्या इच्छेवरून कृष्णानें तिला पूर्वींचे मेलेले सात पुत्र परत जिवंत स्थितीमध्यें आणून भेटविले तो वृत्तान्त आहे. पुढें ८६ व्या अध्यायांत अर्जुनसुभद्राविवाहाचा वृत्तान्त आला असून तो अतिशय विनोदपर व सुंदर वठला आहे. पांगारकरांनीं आपल्या मोरोपंत-चरित्रांत त्याचें योग्य गौरव केलेंच आहे. सत्त्याऐंशीव्या अध्यायांत श्रीकृष्णाचे दोन भक्त, एक मिथिलेचा राजा व दुसरा मिथिलेंतच राहाणारा श्रुतदेव नामक गरीब ब्राह्मण, या दोघांच्या घरीं दोन निराळीं रूपें घेऊन श्रीकृष्ण भेटावयास गेले होते त्याचें वर्णन आहे तें अतिशयच प्रेमळ व सद्भावपरिपूरित असून पंतांच्या कवित्वाची येथें कमाल झाली असें म्हणावयास लावणारें आहे. आर्या-रचनेचें कौशल्य येथें शिगेस पोंचलें असून एकंदर रचनाच अतिमनोहर व कोमल झाली आहे. विशेषतः श्रुतदेव ब्राह्मणाच्या भक्तीचें जें वर्णन पंतांनीं केलें आहे तें केवळ अलौकिक आहे. त्यांतील थोडे तरी उतारे दिल्यावांचून राहवतच नाहीं. गरीब श्रुतदेवानें केलेल्या श्रीकृष्णाच्या पूजेचें वर्णन.—

विमळ उशीरसुवासित हिममधुर प्राशनासि दे तोय ।
तत्प्रेमरसतृष्णा कृष्णाला सत्य अमृत तें होय ॥ ५१ ॥
होती जीर्णा काहीं कस्तूरी लाविला तिचा टिकला ।
शोभे श्रीपतिभाळीं मधुकर इंदीवरीं जसा टिकला ॥ ५२ ॥
वाली कुशपिंजूळग्रथितपवित्रें स्वबंधुच्या बोटीं ।
मोटीं रत्नें ज्यांवरि त्या मुद्रा फार लाजल्या पोटीं ॥ ५३ ॥
बहु कोमळ तुळशीची भरीं कंठांत मंजरीमाला ।
वाला तद्भक्ति तदा वरि जाणों त्या जगत्त्रयीपाळा ॥ ५५ ॥

चरणीं कमळ समर्पी, तें जाणों आपुलेंचि हृत्कमळ ।
कमळग्रप्रभुचें मग गद्गदगळ साधु गाय यश अमळ ॥ ५६ ॥

शेवटच्या दोन आर्यांतील कल्पना किती हृद्य आहेत! पुढें श्रुतदेव श्रीकृष्णाची प्रार्थना करतो.—

आलें असेल काय प्रेमभरें या मुखा तुझें नाम ?
कीं एकाद्या जन्मीं क्षण सादर पाहिलें तुझें धाम ? ॥ ६३ ॥
होय प्रसन्न जेणें मन भजनरहस्य तें पुन्हां बोला ।
कुक्षींत क्षेत्राच्या अर्पावें बीज जों असे बोला ॥ ६४ ॥

एकंदरींत कृष्णविजयाचे ८० ते ९० अध्याय हे मूळ श्रीमद्भागवतांतील याच अध्यायापेक्षां किती तरी पटींनीं सरस वठले आहेत असें म्हटल्यास मुळींच अतिशयोक्ति होण्याचा संभव नाहीं. मंत्रभागवताचा दशमपूर्वार्ध, कृष्णविजयाचे हे ८०–९० अध्याय व भीष्मभक्तिभाग्यासारखीं भागवती प्रकरणें पाहिल्यावर

वाणी मयूरवदनीं जी न शुकातें द्विजोत्तमा यावी ।
पक्ष श्रीहरि धरि जरि काय न करि तरि अनंत मायावी ॥

असा जो रामजोशीबुवांनीं मोरोपंतांच्या भागवतकाव्यरचनेवर आपला अभिप्राय प्रकट करून ठेवला आहे तोच परम सत्य होय अशी कोणाचीही खात्री झाल्याशिवाय राहणार नाहीं. शुकाचार्यांच्या वाणीपेक्षां मोरोपंतांच्या वाणीला त्यांनीं सरस म्हटलें आहे हा कांहीं केवळ अर्थवाद नव्हे. सर्वत्र नसलें तरी पंतकृत भागवतरचनेच्या बऱ्याच भागांत पुरेपूर प्रतीतीस येणारें तें दुर्दम सत्य आहे.

७९. येणेंप्रमाणें कृष्णविजयाच्या उत्तरार्धाची रचना आहे. मंत्रभागवताची रचना याच्या उलट तत्वावर झाली आहे कृष्णविजयांत कृष्णाच्या उत्तरचरित्राचा जेथें तेथें विस्तार केला आहे तर मंत्रभागवतांत त्याच उत्तरचरित्राचा संक्षेप केला आहे. मंत्रभागवताच्या दशमपूर्वार्धांत मुळाच्या एकातृतीयांशाइतका संक्षेप केला आहे तर उत्तरार्धांत मुळाच्या जवळ जवळ एक चतुर्थांशाइतका संक्षेप केला आहे. त्यांतल्या त्यांत ८९ व ९० हे शेवटचे दोन अध्याय पंतांनीं फार विस्तृत केले असल्यानें त्याच्या पूर्वीच्या सर्व अध्यायांच्या संक्षेपाचें प्रमाण जास्तच पडतें. ८९ व ९० या अध्यायांचा पंतांनीं उगीच विस्तार केला आहे. यांपैकीं पहिल्यामध्यें श्रीकृष्णानें अर्जुनासह शेषशायी परमेश्वराकडे जाऊन ब्राह्मणाचे मृतपुत्र परत आणल्याची कथा आहे व दुसऱ्यांत कृष्णस्त्रियांचे विलास, कृष्णप्रेमानें